# सायुज्यसदननाटक.



समांकी

हा ग्रंथ

रामकृष्ण हरि भागवत

यांणीं रचिला

तो

मुंबईंत.

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत छापिला.

शके १७८९,

( हा ग्रंथ इ० स० १८४७ चा आक्ट २० प्रमाणें रजिस्टर केला आहे. )

TO

THE MEMORY

OF

**THE LATE HON'BLE JUGONNATH SUNKERSETT**

THIS LITTLE WORK

IS INSCRIBED

AS A TOKEN OF THE HUMBLE APPRECIATION

OF HIS ZEAL AND LIFE-LONG EXERTIONS

FOR PROMOTING THE WELFARE OF

HIS COUNTRYMEN WHETHER

WITH

RESPECT TO EDUCATION

OR

GENERAL ADVANCEMENT.

BY HIS ADMIRER

**THE AUTHOR.**

कैलासवासी

श्रीमंत जगन्नाथजी शंकरशेट

यांचें

देशबांधवाच्या विद्यावृद्धीविषयीं आणि
कल्याणाविषयीं आस्था, तत्परता परि
श्रम इत्यादि गुण स्मारक जें स्मरण
त्यास ग्रंथकर्त्यानें हा लहानसा
ग्रंथ आदरपूर्वक नजर
केला असे.

# प्रस्तावना.

पुष्कळ दिवसांपासून माझ्या मनांत कानाला गोड असून अंतःकरणाला सदसद्बोधानंदानें पवित्रकारक अशा प्रकारचा लहानसा ग्रंथ रचून देशबांधवांस वाचावयास द्यावयाचा उद्देश होता परंतु माझा बहुतेक वेळ जो चरितार्थ चालण्या करतां मी उद्योग करीत असें त्यांत गुंतून गेल्यामुळें त्या सद्धेतूचा अंकुर ह्रदयभूमीवर न येतां तेथच्यातेथेंच थबकून राहिला. परंतु दैवयोगें करून मोठ्या शारीर आणि मानसिक मेहनतीचें जें मी सरकारी काम करीत होतों त्यांतून मला मुक्तता मिळून निर्वाहार्थ थोडेंसें पेनशनही मिळालें; तेव्हां निर्व्यापाराचें खाजें आणि स्वस्थपणाचें पाणी पाहिजे तसें मिळतांच त्या ह्रदयभूमींत थबकलेल्या अंकुरास पालवी फुटून हा त्याचा ग्रंथरूप विस्तार झाला, यास सज्जन विद्वज्जन आपला अवधानाश्रय देऊन न्यून असेल तें पूर्ण करून सर्व व्यापी करतील अशी माझी आशा आहे.

रामकृष्ण हरि भागवत.

# उपोद्घात.

या ग्रंथाचें नांव सायुज्यसदननाटक. असें नांव ठेवण्याचें कारण. जीव मायावश होऊन कामक्रोधादिकांच्या आधीन झाला आणि स्वरूपास विसरला त्यास दम, शम, बोध इत्यादिकांनीं षड्रिपूंचा पराभव करून मायाविमुक्त केलें. नंतर तो कृतापराधाचा पश्चात्ताप करून ईश्वरास शरण जातांच सायुज्यपद ह्मणजे सायुज्यमुक्ति पावला. सायुज्य ह्मणजे सहजावस्थैक्य आणि सदन ह्मणजे घर, ज्यांत जीवेश्वरऐक्य झालें तें सायुज्यसदन. ह्मणून या ग्रंथास सायुज्यसदन असें नांव दिलें आहे. नाटक या शब्दाचा साधरण अर्थ ह्मटला ह्मणजे नृत्य किंवा खेळ असा आहे. त्याच सरणीनें या ग्रंथाची रचना गद्यपद्यात्मक असून स्थावरजंगमजगदाभास हाच जो सर्वेश्वराचा खेळ, तो या ग्रंथांत समजण्या जोगता, कानास मधुर, आणि मनास वेधक, असा वर्णन केला आहे. यांत करुणरस आणि शृंगाररस प्रधान असून वीररस ही अंगभूत आहे.

यांत कविता ह्मटल्या ह्मणजे बहुतेक श्लोकच आहेत. ते सुलभ रीतीनें वाचतां यावे ह्मणून प्रत्येक श्लोकाच्या-वृत्ताचें नांव त्या त्या स्थळीं कंसांत लिहिलें आहे. कांहीं तालसुरावर संगीत ह्मणण्या जोगतीं पदें ही यांत आहेत. तीं ज्या रागांत ह्मणावयाचीं त्या रागांचीही नांवें त्या त्या स्थळीं कंसांत लिहिलीं आहेत. कांहीं साक्या, दिंड्या,

ओंव्या, आणि अभंग आहेत त्यांची वाचण्याची रीति तर सर्वांस साधारण माहीतच आहे.

या ग्रंथांत मुख्यत्वें जीव आणि शिव ज्यांस वेदांत दोन सुपर्ण, उपनिषदांत हंस आणि परमहंस, कोठें जीवात्मा आणि परमात्मा, कोठें अधिदैवत आणि अधियज्ञ ह्मटलें आहे, तीं आहेत.

या ग्रंथांतील कथाभागाच्या रचनेचा प्रकार असा आहे कीं, जी मूलमाया किंवा मूलप्रकृति ती ईश्वराची दासी आपले बंधु काम, क्रोध, मद, मत्सर, लोभ, मोह आणि कुतर्क यांसहवर्तमान राहत असतां ईश्वराचे प्रधान बोध, दम, शम विचार, विवेक, तर्क इत्यादिकांनीं ईश्वरास त्यांचे अपराध निवेदन करून त्यांस राजनगरींतून काढून लावलें ते भवारण्यांत येऊन बलवान होऊन राहिले. पुढें ईश्वाराची कन्या शांति उपवर झाली तिचें लग्न ईश्वराचा प्रतिनिधि जीव याजबरोबर करून त्यास भवारण्यांत देहगड नामें किल्ला बांधून तेथील आधिपत्य दिलें आणि मनास देहगडांतील कारभारी नेमून शांतीसह जीवाची भवारण्यांत देहगडीं स्थापना केली. नंतर, माया आपले बंधुसह तेथें राहत होती तिणें मनाचे द्वारानें देहगडांत प्रवेश करून जीव वश करून आपलासा केला, आणि कामक्रोधादि आपले भावांला देहगडांतील सर्व कारभार करावयास सांगितलें. असें होतांच जीव अगदीं तदाधीन होऊन शांतीस, सुमतीस आणि ईश्वरासही विसरला. नंतर शांति, सुमति शोकाकुल झाल्या तेव्हां प्रभूनें बोधादि प्रधानांकरवीं कामक्रोधादिकांचा पराभव करवून त्यांस देहगडांतून हांकून दिलें, आणि जीवास मा-

याविमुक्त करून शांतीसहित सुखी केलें. नंतर जीव कृताप-राधचा पश्चात्ताप पावून अनन्यभावानें प्रभूस शरण जातांच सायुज्यसदन ह्मणजे तदैक्यत्व पावला. याप्रमाणें सेव्यसेवकत्व असून जीवेश्वरांचें ऐक्य यांत वर्णिलें आहे.

यांत योगशास्त्रास आणि शारीरास अनुसरून असें देहाच्या रचनेचें ही थोडेंसें वर्णन केलें आहे.

हा ग्रंथ करण्याचा मुख्य उद्देश हा कीं, जीवाचा ईश्वराशीं मूलसंबंध कसा होता; तो देहाधिकारी झाल्यानंतर मायावश होऊन कामक्रोधादिकांच्या आधीन कसा झाला, आणि त्यापासून कोण कोणते कसकसे क्लेश पावला; त्यास आत्मत्वाचा कसा विभ्रम झाला; नंतर बोधादिकांनीं जरी षड्रिपु इतके प्रबल तरी त्यांचा पराभव करून जीवास मायाविमुक्त कसें केलें; जीव कृतापराधांचा पश्चात्ताप करून ईश्वरास पूज्यपूजक भावानें शरण जातांच सकलापराधांची क्षमा पावून देहींच सायुज्यपद ह्मणजे ईश्वरी सहजावस्था कशी पावला; हें सर्व लक्षांत यावें.

हा ग्रंथ साधेल तितक्या सोप्या शब्दांनीं लिहिला आहे. परंतु कवितेंत वगैरे ठिकाणीं काव्यनियमास आणि यमकांस साधण्याकरितां निरुपायामुळें कठिण शब्द घालणें प्राप्त झालें, त्यांचा अर्थ प्रत्येक पृष्टाचे खालीं टिपेंत सुबोध लिहिला आहे.

यांत पात्रांचीं नांवें कोठें कोठें कानास नीट लागावीं ह्मणून व्यवहाररीतीला जुळण्यासारखीं लिहिलीं आहेत. त्यांचा अर्थ खाली लिहिल्याप्रमाणें वाचकांनीं ग्रंथ वाचतेवेळीं लक्षांत ठेवला पाहिजे.—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| शिवाजीराजा | ह्म० | ईश्वर. | मोहनाजी | ह्मणजे | मोह. |
| जीवाजीराव | = | जीव. | कुतकाजी | == | कुतर्क. |
| मायाऊ | = | माया. | बोधाजीराव | = | बोध. |
| कामाजीना० | == | काम. | दमाजीराव | = | दम. |
| राघोजीना० | == | क्रोध. | शमाजीपंत | == | शम. |
| मदाजी | == | मद. | चतुराऊ | == | तुरीया. |
| मसाजी | = | मत्सर. | तुकोजीराव | == | तर्क. |
| लुमाजी | == | लोभ. | मज्ञाऊ | == | ज्ञान. |

# सायुज्यसदननाटक.

## अंक १.

### स्थळ.

### भवारण्य.

### पात्रें.

सूत्रधार .. .. .. .. .. .. नाटक खेळ करणारा.
पारिपार्श्वक .. .. .. .. .. .. त्याचा सोबती.
विदूषक .. .. .. .. .. .. .. .. .. माधवी
राघोजी नाईक . .. .. .. .. .. .. .. मांग.
मदाजी .. .. .. .. .. .. .. राघोजीचा भाऊ.
कुलकाजी . .. .. .. .. .. . राघोजीचा सेवक

# सायुज्यसदननाटक.

प्रारंभ.

## अंक १.

मंगलाचरण.

श्लोक [ द्रुतविलंबित ]

सकलमंगलदायक सद्गुरू, ॥
विमल, भांकर, [1]स्तमसंहरू, ॥
स्मरुनि अंतरिं काव्यकुतूहला ॥
रचिन जें शमि तापहलाहला ॥ १ ॥

श्लोक ( मालिनी )

स्थिरचरनटनाथ श्रीपती सूत्रधारी, ॥
अभिनववपु, भिन्नाभास जो निर्विकारी, ॥
घटिं मठिं लघु मोठा भानुसा बिंबलासे, ॥
जगिं नगिं कनकाचे सारखा जो विलासे ॥ २ ॥

श्लोक ( स्रग्धरा )

जो श्री-वैराग्य- औदार्य- सुयश-विमलज्ञान-धैर्याब्धिवासी,॥
जो विश्वांकुरउर्वी, प्रकृतिवश, मनध्येय साऱ्यां जिवांसी, ॥

---

१ प्रकाशकरणार सूर्य.

पाताळीं, व्योमिं वा या क्षिति अणुभरही ज्याविणें ठाव नाहीं,॥
विश्वात्म्या त्या प्रभूला नमन मम असो विघ्नहें वाङ्मनांहीं॥१॥

श्लोक ( स्वागता )

आद्य वंद्य, ममपूर्वजसे● ॥
ध्वांतनाशकर, कीरणभव्य, ॥
ज्ञानमित्र, न्हृदयाब्ज-विकासी ॥
सौख्य देउ सकलां स्वप्रकाशी ॥ ४ ॥

या प्रकारें मंगलाचरण झाल्यानंतर,

सूत्रधार— ( पुढें येऊन अग्रभागीं बसलेल्या सभासदांकडे अवलोकन करून ह्मणतो. )

श्लोक ( स्वागता )

काव्यकंज- मकरंद- सुधापी, ॥
अर्थपूर्णमति, सद्गुणवापी ॥
श्रवण- सादर- साधु- गणाचा ॥
थाट, हा विलसतो निपुणांचा ॥ ५ ॥

या प्रकारेंकरून सकल योग्य गुणांनीं मंडित आणि परमस्तुत्य अशी ही साधुजनांची सभा येथें मिळाली आहे. तर आतां यासभेपुढें भागवतकुलोत्पन्न रविदास नांवाच्या कवीनें सायुज्यसदन नामक नाटक नूतन रचलें आहे त्याचा खेळ करून दाखवावा आणि कृतकृत्यता करून घ्यावी असें मनांत आहे. ( आकाशाकडे पाहून ह्मणतो. ) अहो सभासदांनो, आपली काय आज्ञा आहे !

---

१ शरीर. २ अज्ञानरूप आंधार. ३ विहीर.

### श्लोक ( स्रग्धरा )

विश्वाला पूतकारी, श्रवणपठनमात्रें मना मोदेकारी, ॥
नेत्रां आनंदकारी, अभिनवरचना लक्षितां निर्विकारी, ॥
चित्ता चैतन्यथोरी, विगलितकलुष माणि मोक्षाधिकारी ॥
होती, ऐशा प्रयोगा करुन सदसिं संतुष्टवीं आजसारी॥ ६॥

अहो, आपण असें ह्मणतां काय ! वाह्वा, अहो, हें कवडें तरी माझें दैव ।

### आर्या.

होती बहु दिवसांची इच्छा मनिं खेळ करुनि दावावा॥
युष्मन्निर्देश हि तसा होतो, किति दैवयोग वानावा॥७॥

(पड्याकडे पाहून) अरे पारिपार्श्वका, सभासदांची आज्ञा काय झाली ती ऐकिलीस ना !

पारिपार्श्वक— (पड्याबाहेर येऊन ह्मणतो ) होय महाराज, ऐकिली; पण—

सूत्रधार— पण काय ! लौकर आपले सोबती घेऊन गाण्यास आरंभ कर.

पारिपार्श्वक— बरें, फार चांगलें आहे. आरंभ करतों, पण कोणत्या प्रकारचें गाणें गावें बरें !

सूत्रधार— अरे, वेड्यासारखें विचारतीस काय ! ज्या नाटकाचा आपण खेळ करणार त्याचें गुणवर्णनयुक्त असें गाणें गाऊं लाग. पहा, शरत्कालांतील पूर्ण चांदण्यांत जसें नक्षत्रयुक्त आकाश विराजतें, तसी ही रसिक श्रोत्यांनीं युक्त गंभीर रंगभूमि विराजत आहे अशा स्थळीं दुसरें काय गावयाचें !

---

१ आनंदकर. २ स्थीरकरी. ३ पापरहित. ४ सभा.

पारिपार्श्वक— फार उत्तम. (असें ह्मणून गाण्यास आरंभ करतो.)

पद (रागधनाश्री)

नाटक सुरसाचें शिजलें ॥ धृ० ॥
निगमपयोनिधि- मंथन- नवनवनीत कर्णपुटिं थिजलें ॥ १ ॥
सरस-कवी रव-घनिं अजि सज्जन- त्द्दय- सुचीरेंहि भिजलें॥२॥
भासति रसिक मधुपानें श्रोते अर्धोन्मीलित निजले ॥ ३ ॥
रविदासें प्रभुसंतसमाजा वाक्प्रसूनें पुजिलें ॥ ४ ॥ ॥ ८ ॥

विदूषक— गायकाच्या लेंका, कायरे ह्मटलेंस हें ! बाबा, असें आहे तर आपण येथें बसत नाहीं.

पारि०— कां !

विदू०— मला बाबा भय वाटतें.

पारि०— कशाचें !

विदू०— तुझ्या गाण्याचें, आणि कशाचें !

पारि०— काय ! अरे, ज्या या माझ्या गाण्यानें सर्व सभासद आनंदांत निमग्न होऊन डोलूं लागले; त्या गाण्याचें तुला भय वाटतें ह्मणतोस ! वाहवारे !

विदू०— बाबा, भय वाटतें नको ह्मणूं तर काय ह्मणूं ! तुझ्या गाण्यानें कदाचित् कानांत लोणी थिजलें तर मी बहिरा होऊन जाईन, मला ऐकूं देखील येणार नाहीं, मग काय करूं !

पारि०—अरे मूर्खा, पंडिताच्या लेंका, म्यां गायिलेल्या पदाचा त्वां असाच अर्थ केला का ! शाबासरे.

---

१ श्रुतिसमुद्र. २ नूतन. ३ वस्त्र. ४ पुष्प.

विदू०— होय, खराच; नाहीं तर खोटा काय ? माझा बाप अरण्यपंडित होता आणि मी साक्षर पंडित आहें.

पारि०— आँ ! अरण्यपंडित, आणि साक्षर पंडित, ह्मणजे रे काय, बाबा ?

विदू०— हाः हाः हाः ( मोठ्यानें हांस्य करतो ) अरे, माझा बाप आणि मी.

पारि०— हाँ. तुझा बाप आणि तूं काय ?

विदू०— होय, माझा बाप आणि मी, समजलास ?

पारि०— होय समजलों आतां; पण त्याचा अर्थ काय ?

विदू०— तो माझा बाप आणि मी त्याचा लेंक- हा अर्थ.

पारि०— अरे तें मी समजतों, पण अरण्यपंडित आणि साक्षरपंडित या दोन शब्दांचा अर्थ काय ?

विदू०— अर्थ काय तो तूं सांग.

पारि०— बाबा, मला समजत नाहीं अर्थ.

विदू०— ( वेडें वांकडें तोंड करून ) मला समजत नाहीं, आँ ! अरे, जर माझ्या एवढ्याशा दोन शब्दांचा अर्थ तुला समजत नाहीं, तर तुझ्या तीन हात लांब पदाचा अर्थ तरी मला कसा समजेल ? मला ही समजत नाहीं. जा.--

पारि०— मूर्खा, असें बोल; ह्मणजे त्याचा अर्थ मी सांगतों तुला.

विदू०— मूर्खा, नाहीं कोण ह्मणतो ? सांग तर.

पारि०— काय हो याचें अमर्याद भाषण हें ! अरे, निगमपयोनिधिमथननवनवनीत कर्णपुटीं थिजलें, याचा अर्थ निगमपयोनिधि ह्मणजे श्रुतिसमुद्र मंथन करून नूतन नवनीत ह्मणजे उपनिषदार्थ श्रोत्याच्या कानांत

स्थिरावला, असा. यांत तुला भय तें कशाचें आणि तूं बहिरा कशानें होणार ?

विदू०— ( मान डोलवितो ) यांत काय संशय ? ( किंचित् विचार करतो) अरेरे ! हें तर दुसरें एक अनर्थाला कारण रे, बाबा ! आपण येथें बसत नाहीं. ( कांहीं मागें सरतो )

पारि०— अरे पळतोस कां ! आतां तर तुझें भय गेलेंना ? पळूं नको. ये हिकडे असा.

विदू०— ( वेंकावून) नकोरे बाबा, येथें बसणें. मी काय माझ्या जिवास कंटाळलों नाहीं.

पारि०— काय बेटा व्रात्य तरी हा ! अरे तुझ्या जीवास कोण खातो येथें ?

विदू०— बाबा, कोणी खात नाहीं, पण तुला ठाऊक आहे ?

ओंवी.

जेथें मधुपानासक्त नर ॥ तेथें नबसावें क्षणभर, ॥
नकळे केव्हां ते संव्हार ॥ करिती आम्हां परांचा ९ ॥
पहा द्वारके यादवीं ॥ चतुरीं यथेच्छ माशुन माध्वी, ॥
संव्हारली आघवी[1] ॥ निजकुलमजा ॥ १० ॥

याजकरितां बाबा, हे मधुपान करून कदाचित् माझेंच कांडात काढतील तर, माझा गरिबाचा जीव मात्र फुकट जाईल.

पारि०— अरे जडमते, शाबास आहे तुझी आणि तुझे ज्ञानाची.

---

१ अवघी.

विदू०— होय, तूं पाहिजे तें ह्मण पण माझा जीव काय मला अधिक नाहीं.

पारि०— अरे ऐक. तूं ह्मणतोसतसें; मद्यपान्यापासून भय खरें; पण माझे पदांतील मधु ह्मणजे काव्यरूप कमलांतील मकरंद माशन करून तल्लीन होऊन माना डोलवणें असा आहे. समजलास ?

विदू०— हाँ हाँ हाँ। समजलों, बाबा, समजलों. काय बेटें तीन हात पद त्याचा तेराहात अर्थ. मी तर माझ्या दोन शब्दांचा अर्थ दोन शब्दांतच सांगेन.

पारि०— सांग तर.

विदू०— ( मान वांकडी करतो ) ऐक तर. अरण्यपंडित ह्मणजे रानांत कावाड वाहणारा माझा बाप; आणि साक्षर पंडित ह्मणजे साहा अक्षरांनीं पंडित झालेला त्याचा लेंक, तो मी.

पारि०— शाबास, तुझ्या बापास तर चांगलें जाणलें आपण. पण त्याचा लेंक तूं जो साहा अक्षरांनीं पंडित झालेला तीं अक्षरें कोणतीं ?

विदू०— ( खद खद हंसतो. ) सहा अक्षरें कोणतीं तीं तुला ठाऊक नाहींत, आँ. ऐक तर मी सांगतों. मोज आतां ( बोटें घालतो ) कां हीं ये त ना हीं. हीं साहा अक्षरें, समजलास ? समजलों ह्मण.

( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठा क्रोधयुक्त शब्द होतो. )

कायरे कशाची वटवट ही ? नाटक्यांच्या पोरांनो, येथें निर्भयपणें बसून अशी निरर्थक वटवट करण्यास तुह्मास शंका वाटत नाहीं ? अरे ऐकाः—

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित )

जो रुद्रांबकज, प्रकोपित सदां, दैत्यां सुरां मारवी, ॥
जो दुःसाध्य जितावयास हृदियां ताप्यांस ही हारवी, ॥
स्वांता स्वस्थपणा कदापि हि न दे, सौख्यालयां मोडिता,।
कंपा दे अवनीतळीं प्रगटुनी शार्दूलविक्रीडिता ॥ ११ ॥
ऐशा यां प्रभुनें अह्मास दिधलें क्रीडार्थ हें कानन ॥
बंधू आणि स्वसासहीत विहरें मी एकला आनें न; ॥
अस्मच्छासनिं वर्तवीन सकळां, लीलामदीया पहा; ॥
प्राणी मात्र चिरीन बोकड जसे, बा, सावचित्तें रहा १२ ॥

( सूत्रधार आणि पारिपार्श्वक, दचकून सकंप होतात. )

पारि०— काय हो! हा कोण येत आहे! आणि बोलतो हें काय!

सूत्र०— ( मागें पडद्याकडे पाहून ) अहो, हा राघोजी नाईक मांग! स्वराज्यांत बंडाळी करूं लागला; तेव्हां शिवाजी राजानें यास नगराबाहेर काढून लावलें, म्हणून हा अत्यंत क्रुद्ध झाला आहे, आणि स्वपरित्राणार्थ या भवारण्याचा आश्रय करून बंधु स्वसा सहवर्तमान येथें रहावयास येत आहे. पहा याचें स्वरूप किती भयंकर आहे तें! शीर जसें काय काजळाच्याच पर्वताचें शिखर, आणि त्याजवरील केंश कसे वक्रोर्ध्व घोंटीच्या वेलीसारखे ताठर, डोळे तर जसें सर्पाचेंच बीळ, आणि पसरट विक्राळ तोंड जणुं काय सिंहाचीच गुहा; हा कदाचित् आह्मा सर्वांस मत्कुणासारखे चिरडून टांकील.

---

१ रुद्रनयनापासून झालेला. २ चित्त. ३ पृथ्वी ४ क्रीडा. ५ अन्य.

असा हा हिकडेसच संचार करीत आहे; तर याचे पुढें उभें राहणं आपणास श्रेयस्कर नव्हे, याज करितां चला आपण दुसरीकडे जाऊं.

( असें ह्मणून निघून जातात. )

( नंतर राघोजी नाईक पडद्याबाहेर येतो. )

राघोजी०—( चडफडत हिकडून तिकडे फिरतो आणि तोंडानें फुटफुटून मिशांवर ताव देत ह्मणतो) काय हो, हा शिवाजी राजा तर मोठा दयाळु आहे. त्यास आपण जीवजान आवडतों. पण, हा इतका आमचा घात त्या चाडखोरा सेनापतीनें केला, यांत अगदीं संशय नाहीं. राजा तर केवळ भोळा सांब, त्याच्या कानांत वारंवार चहाड्या सांगून सांगून या लुच्चानें आह्मास देशपार करविलें औं बरें, काय चिंता आहे ! जर मी खरा मांगाचा बच्चा असलों तर यालाही हात दाखवीन; या रानांत राहून वनचा राजा बनेन, आणि त्याचें सर्व राज्य उद्ध्वस्त करून टांकीन तर माझें नांव. मग ह्मणावें घे लेंका सेनापतित्व, आणि बस रडत ! कां कीं—

साक्या.

राजित भूपति जनपेद[१]पंक्ती सर्व कुशल असल्यानें,॥
धनिक विराजे जेवि निधी संन्निध त्याच्या वसल्यानें,॥१३॥
तरि जाळुन नागवून आणिन ओसाडी देशाला, ॥
भूपति कोणि न ह्मणती त्याला धाडिन वनवासाला, ॥१४॥
रडविन अटवीं[२] फिरतां, जैसा रडतों मीं आतां॥धृ०॥

---

१ प्रजासमूह. २ रान,

विदू०— त्यास रडत फिरवाल तें लांबच आहे, पण तुह्मीं मात्र तूर्त रडत फिरतां खरे.

राघो०— काय ! मी रडतों ! खबरदार, असें बोलूं देखील नको.

विदू०— मी बोलणार नाहीं; पण, जर तुह्मी रडलां नाहीं तर.

राघो०— मूर्खासारखें मातक्यान तेंच. अरे मी रडतों आहें कुठे ! उगाचं डोळ्यांनीं पाणी मात्र आलें तें काय रडें !

विदू०—रडें नव्हे तर काय हांसें !

राघो०— हा बेट्या नाटक्याच्या पोरा. तुला वीररस तो काय, हें माहीत तरी आहे ? तें काम अस्मादिकांचें.

विदू०— खरेंच बाबा. असा वीररस ( रडत रस) आपल्याला कधींच ठाऊक नव्हता, पण युष्मादिकांजवळ मात्र आज पाहतों हा.

राघो०—अरे, किती झालें तरी तूं नाटक्याचा पोर, तुला कोठून ठाऊक असणार वीररस ? ऐक सांगतों.—

## साक्या.

टपटप अस्मन्नयनांतुन अंधि पडती या जळधारा ॥
रोदन न, परी रिपुन्दन्कुमुदिनीदारक[1] तीक्ष्ण कुठारा ॥१६॥
शैली वीररसाची ऐसी असमंजस साची ॥ धृ० ॥
वीर जनाची क्रोधकटाक्षज मेघज्योती[2] जाळी ॥
अरिगणतृण[3] विगलीतंनीरसें ग्रीष्मीं दावंज्वाळीं[4] ॥ १६ ॥
शैली वीररसाची ऐसी असमंजस साची ॥ धृ० ॥

---

१ भेदकरणार. २ वीज. ३ सुकलेलें. ४ वणवा.

विदू०— हाँ, आतां मी समजलों. आपण रडत राऊत घोड्यावर बसून, तरवार मारणार खरे.

राघो०— मग यांत काय संशय !

विदू०— संशय नाहीं निःसंशय. पण प्रसंग आला पाहिजे; ह्मणजे समजेल.

राघो०— काय समजेल !

विदू०— आपला पराक्रम.

राघो०— काय माझा पराक्रम ! ही पहा ( दाखवतो ) माझी साडेतीन हात लांब तरवार, वीतभर मिशी आणि हात भर दाढी.

विदू०— होय दाढीमिशीचा भारा तर मोठाच आहे खरा, पण—

राघो०— पण काय ? वेड्या, तसाच पराक्रम ही मोठा हें तुला समजत नाहीं ! मोठ्याचें सर्वच मोठें; पहा.—

श्लोक. [ शिखरिणी ]

करी देहें मोठा तदनुरुप शक्तीहि विपुला[1] ॥
असे त्याला तैसी लघुतर अजापुत्रवपुला[2] ॥
ह्मणोनी देखाव्यावरून सकळां आंतिल गुणां ॥
कळों येतें सुज्ञां, परि न तुज तें नाट्यनिपुणा ॥१७॥

विदू०— होय, बाबा, हत्तीचें आंग तर भारीच अवजड. परवांचे दिवशीं या रानांत एक विशाल हत्ती आला होता त्याणें हीं पहा मोठमोठीं झाडें मोडून खाऊन टांकिलीं. आह्मास वाटलें, जर हा काळ येथें अधिक दिव-

१ पुष्कळ. २ बकरा.

स राहिल, तर बहुतेक रानाचें निसंतान करील आणि आह्मास लांकूड पान देखील मिळण्याची पंचाईत पडेल; पण बाबा, दैवानें लौकरच गाऱ्हाणें ऐकिलें. एवढ्याशा लहानग्या विंचूनें आपली सुईसारखी सूक्ष्म नांगी त्याच्या नाकाच्या अग्रभागीं मारतांच, जसा काय वज्रपातानें पर्वत कोसळतो, तसा गतप्राण होऊन तो जमिनीवर पडला. मग घाण पडेल ह्मणून त्याचें मुडदें ओढून बाहेर काढतांना मात्र आमचे खट्टे मोकळे झाले. हे पहा ( हातापायांचीं सालटीं गेलेलीं दाखवितो ). असा मोठेपणा, बाबा, खायाला काळ आणि धरणीला भार मात्र.

राघो०— या नाटक्याच्या पोरानें, माझ्याच तंगड्या माझ्या गळ्यांत घातल्या, बरें, काय चिंता आहे ! ( रोषानें ) अरे नाटक्याच्या पोरा, तो चतुष्पद हत्ती, त्याची आणि माझी बरोबरी करतोस काय ?

विदू०— नाहीं; चुकलों, महाराज. आपल्या दुप्पट त्यास पाय होते आणि आपल्या दसपट त्याचें नाक लांब होतें खरें. ( आपणांशीं ) पण एवढ्याशा प्राण्यानें.—

राघो०— अँः तें काय कामाचें ! नाक मोठें आणि दर्शन खोटें.

विदू०— मीही तेंच ह्मणतों.

## ओंव्या.

नाम मोठें क्षीरधी, शरीराकार निरवधी,
गर्जनागंभीर, उदारधी, आमंत्री जसा याचकां, ॥१८॥

तीरीं गेला तृषाक्रांत, करीं उदक घे मुखांत,
क्षार लागतां धिःकारीत, सान्या मोठेपणां न्या ॥ १९ ॥

राघो०— (आपणाशीं) अरे, फिरून या कारठ्यानें माझ्या आंगठ्या माझ्याच डोळ्यांत घातल्या. ( बाहेर ) अरे विचारशून्या, ऐक. उगीच वटवट करूं नको.

श्लोक ( शिखरिणी )

द्विजाच्या मूत्राचा सहज अवनीं आशय घडे, ॥
जयामध्यें रात्रींदिवस वडवाग्नी भडभडे ॥
तया क्षीराब्धीची मजसिं तुलना तूं करसि का, ॥
कसा पक्षीराजा समतुलिशि निःशंक मशका ॥ १९ ॥

विदू०— मी चुकलों; नाहीं महाराज, आपली आणि सागराची बरोबरी.

राघो०— ( किंचित रागाऊन) कायरे नाटक्याच्या पोरा, फारशी वटवट चालवलीस; उगाच बसतोस कीं नाहीं ? ( दटावतो. ) बस उगीच, नाहींतर चिरून टाकीन.

विदू०— क्षमा करा, महाराज; ( हळू आपणाशीं ) हे बोकड कापणारे सरदार आहेत, बाबा, कदाचित् माझाच समाचार घेतील.

राघो०— माग क्षमा, पड पायीं; नाहींतर समजेल कसें आहे तें, ढेंकणासारखा चिरडून टाकीन ( आवेशानें जवळ जातो ).

विदू०— हा पायीं पडतों, (आपले पाय त्याच्या पुढें करून. ) क्षमा करा; झालें आतां ?

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

---

१ पृथ्वी. २ पाणी साचण्यास आश्रय. ३ गरुड. ४ अशक.

अहो, राघोजी नाईक सांग कोठें आहे ? जर येथें आला असेल, तर कृपाकरून मला कोणी दाखवा; मी तुमचा मोठा उपकारी होईन.

राघो०— ( भयभीत होतो ) हें, रे काय ? हा कोण येथें एवढ्यारात्रीं येऊन कशाची पुसपास करीत आहे ?

विदू०— ( मोठ्यानें ) महाराज, हा कोणी तुह्मासच विचारीत आहे.

राघो०— हळू बोल, बाबा; काय मला विचारतो ?

विदू०— होय, तुह्मालाच.

राघो०— तर मग, बाबा, नाहीं ह्मणून सांग येथें.

विदू०— काय, नाहीं ह्मणून सांगूं ?

राघो०— होय, मी नाहीं ह्मणून सांग.

विदू०— पण तो मला नाहीं विचारीत; तो तुह्माला विचारतो.

राघो०— ह्मणूनच. मी येथें नाहीं ह्मणून सांग त्याला.

विदू०— मी, बाबा, खोटें नाहीं बोलणार. तुह्मी समोर उभे असतां मी नाहीं ह्मणून सांगू काय ? वाहवारे !

राघो०— तर मग, बाबा, मला येथून जाऊं दे लौकर.

विदू०— कां, कशासाठीं ?

राघो०— प्राणरक्षणासाठीं, आणखी कशासाठीं.

विदू०— तुमचे प्राणास कोण खातो येथें ?

राघो०— कोणी खात नाहीं; पण, बाबा, वेळ कठीण आहे.

विदू०— अहो, वेळ कठीण कोणास ? आह्मासारख्या गरिबांस. पण तुह्मासारख्या तलवारबाहादुरांस, मोठ्या दाढीमिशांच्या वीरांस, त्याचें काय भय आहे ?

अहो, जे तुह्मी मुकतेच आतां आपली साडेतीन हात तलवार दाखवून शिवाजी राजाच्या सर्व प्रजांची कत्तल करून देशास ओसाडी आणीत होतां, आणि पहिले मंगलाचरणींतर मलाच ढेंकणासारखा चिरडून टांकीत होतां, ते तुह्मी उगीच शब्दाच्या दराऱ्यानें इतके घाबरून गेलां आँ. वाहवारे वः, शिपायाचा बाणा तर हाच ह्मणावा.

श्लोक. [ शिखरिणी ]

कथी गोष्टी मोठ्या बसुन अबेलीं बालिशपरी, ॥
रणाची जों नाहीं नयनिं दिसली भ्यासुर परी,॥
तटांटां वीरांचीं पडति शिरपुष्पें क्षितिवरी, ॥
लपाया तैं जागा निजसदनिं कोनांत विवरी ॥ २१॥

राघो०— तुझ्या पायां पडतों. तूं पाहिजे तें ह्मण; पण एकादी गुहा बिहा जवळसार मोठीशी असेल तर सांग, बाबा, मला कृपा करून. मी आपला त्यांत जाऊन बसतों एकदां हळूच, ह्मणजे झालें.

विदू०— काय तुह्मी लपून बसणार ? अहो, तुह्मी या वनाचे राजे ह्मणवितां आणि इतके घाबरे होतां, हें काय ?

राघो०—होय, मी आपला घाबरतों; एक वेळ नव्हे, सात वेळ. मी, बाबा, नव्हे राजा. पण मला कृपाकरून लपीव कुठे तरी, नाहीं तर हा दुष्ट बहुतकरून त्या शिवाजी राजाच्या सेनापतीचा गुप्त हेर किंवा मारेकरी असेल, कदाचित् माझा प्राणघात करील.

---

१ बायकांत. २ बालक. ३ भयंकर. ४ स्थिति. ५ शोधी.

विदू०— मग काय चिंता आहे ! तुह्मीही शिपाई आहां, होऊं द्या त्यांचे तुमचे दोन हात.

राघो०— ( लडलडां कांपतो. ) नकोरे नको, तेवढें नको, मला, बाबा, जीवदान दे. लपीव कुठेतरी.

विदू०— ( आपणाशीं ) भली झाली. मला ढेंकणासारखा चिरडून टांकीत होता ते आपणचना ? ( बाहेर. ) बरें तर, या खालाटींत तालवृक्षांच्या निबीड झाडीमध्यें एक लहानशी गुहा आहे तींत कधीं कधीं चोरटे दडून राहात असतात तेथें पाहिजे तर तुह्मी जाऊन बसा. ( हातानें दाखवितो ) जा असे समोर उजवे हाताकडे.

राघो०— रामराम; मी तुमचा मोठा उपकारी झालों. पण संभाळा तुमची जीभ. तो चोरटा विचारीत येईल, तर कानावर हात ठेवा. अगदीं त्यास भिऊं नका, आणि माझा मागमोस त्याला लागूं देऊ नका. ( असें सांगून तालवृक्षांचे झाडींत निघून जातो. ) वः, ही जागा मज सारख्यास लपून राहण्यास फारच सोईची आहे. पहा येथें वृक्षांची छाया इतकी निबीड आहे कीं सूर्यदर्शन देखील होणार नाहीं, मग मी येथें घुबडासारखा जरी बारा वर्षे दडून राहिलों तरी कोणाच्या बापासही समजणार नाहीं. खाण्यापिण्याची सोई ह्मणावी, तर हे पाहा पाण्याचे झरे कसे चहूंकडून सारखे वाहात आहेत. मोहाचीं झाडें आणि तालवृक्ष तर पुष्कळच आहेत, यांपासून आपणास माध्वी इत्यादि ही यथेच्छ पिण्यास मिळेल. ( अशा आनंदानें गुहेंत प्रवेश करूं लागतो, इतक्यांत गुहेच्या दाराजवळ कोणी बसला आहे असें पाहून मागें सरतो. )

मदाजी.— दादा, या पुढें या.

राघो०— (दचकून आपणाशीं.) मी या गुहेंत दडून राहाण्यास ह्मणून आलों आणि येथें ही हें रे काय लचांड, बाबा ! ( उगीच विचार करीत उभा राहातो. )

मदा०— अहो, विचार काय करतां ? मी तुमचीच वाट पहात बसलों आहें.

राघो०—( मनांत. ) आतां मागें तर जाववत नाहींच. बरें, काय होईल तें खरें. ( तलवार सांवरून बाहेर ) कायरे, तूं कोण आहेस, बोल; नाहीं तर हीं ( तलवार पुढें करतो ).

मदा०— असें काय करतां. दादा ? मी तुमचा भाऊ मदाजी, इतक्यांतच विसरलां काय !

राघो०— कोण मद्या ? कायरे, तूं कुठें हिकडे ?

मदा०— तुह्मीं आलां तसाच मी आलों.

राघो०— शाबास, पण तुझ्या हातांत रे कायतें ?

मदा०— दादा, तुह्मीं तान्हेलां असाल ह्मणून हें ताजें मद्य काढून आणलें आहे तुमच्या करतां. (मद्याचा घट पुढें करतो ). घ्या हें थोडेंसें पिया.

राघो०— भले शाबास, याल्लाच भाऊ ह्मणावें. ( मद्याचा घडा तोंडास लावतो. ) वाहवा ! हें अगदीं गोडें आहे. ( मिटक्या मारतो ). मद्या ! घे हें थोडेंसें तूं पी. ( मद्य घट त्याच्या हातांत देतो ). मग आपण सुखदुःखांच्या वार्ता करूं.

मदा०— ( अवशेष मद्य पितो. ) दादा, खुशाल तर खरे!

राघो०— मी तर आहेंरे सुखी येथें. पण त्या चाडखोरा

बोधाजी रावानें आतां कशी काय मसलत चालविली आहे ?

मदा०— तें विचारूं नका, दादा.

राघो०— कां, असें तें काय आहे, बाबा ?

मदा०— दादा तुह्मांला तर ठाऊक आहेना ? सेनापति, कोतवाल, आदिकरून सर्व दरबारी एकमत झाले आहेत.

राघो०— होय, तें तर मला कधींच ठाऊक आहे.

मदा०— आमचा मोठा दादा कामाजी नाईक पेंढाऱ्यांचा सरदार आहे नव्हे ? तो त्यांच्या डोळ्यांत रात्रंदिवस खुपतो.

राघो०— कां, कशाकरतां ?

मदा०— कशाकरतां ह्मणजे काय; त्याचें सुंदर शरीर, सरस भाषण, चपळ वर्तन, हीं सर्व राजास आवडतात यामुळें; अंतःपुरांतील व्यवस्था पाहाण्याचें कामही राजानें त्यासच सांगितलें आहे. राजा कधीं कधीं राणीबरोबर एकांतीं असतांही आमच्या दादास तेथें जाण्यास आडखाटी नाहीं. या अशा सर्व कारणांवरून मंत्रिजनांच्या पोटांत दादाविषयीं बराच हेवा उत्पन्न झाला आहे.

राघो०— हां, असें काय ? पण त्यांच्या हातानें दादाचें काय होणार आहे ?

मदा०— होणार काय ह्मणा ! पण ते दादाच्या कांहीं वाईट वर्तणुकी राजास दाखवून खोटाऱ्या चहाड्या सांगून एकदां दादास काढून लावावा, अशी मसलत घाटतात ह्मणून नगरांत दाट आवई उठली आहे.

राघो०— कोठून ? राजसौधांतून ?

मदा०— राजसौधांतून असतें, तर कोण भीत होता ?

राघो०— तर कोठून ?

मदा०— राज्यांतून. ह्मणून पंचाईत.

राघो०— छिः, असें कसें होईल ? आमची मायाऊ आका आहेना तेथें ?

मदा०— आहे, पण काय ? असून नसून सारखीच.

राघो०— वेड्या, असें कां ह्मणतोस ? जर ती तेथें आहे तर सर्व आमचें आहे.

मदा०— जर असें होतें, तर मग तुह्मी कां परागंदा झालां ?

राघो०— अरे, माझी गोष्ट वेगळी. मी जरा हेकटखोर आहें, पण कामाजी दादा जरा मिळ्या स्वाभावाचा आहे.

मदा०— अहो, तुमचा वडील भाऊ तो; तुह्माहून कांकण भर अधिक.

राघो०— पण तो राजाचा मोठा आवडता आहे.

मदा०— ह्मणूनच हें असें झालें.

श्लोक ( भुजंगप्रयात. )

करी भूप मोदा, जना दे न शांती ॥
जगद्विट् स्वयें होय तो दर्शि कांती ॥
विधूंची जसी क्षीण मानाधिकारें ॥
करूं इच्छिती त्यापरी त्यास सारे ॥ २२ ॥

---

१ आनंद. २ प्रजांचा शत्रू. ३ अमावास्येस. ४ चंद्राची.

राघो०— हाँ; असें झालें काय ! त्या लुच्चांनीं आमच्या दादाबरोबर देखील अशी दाली मांडली आँ. बरें काय चिंता आहे ? आपणही मांगाचे बच्चे आहों. उगीच तर बसणार नाहींच. पण, तूं आपले मायाऊ आकाचें काय ह्मटलेंस तें, मद्या ?

मदा०— अहो ह्मटलें काय ! मायाऊ आका काजकाम करत्ये; पण हुकमत नाहीं पहिल्यासारखी.

राघो०— कां बरें ? राजाच्या सेवेस तर आका चुकत नाहींना !

मदा०— तसें कांहीं नाहीं. पण, राजेसाहेब राणीबरोबर विलासांत फारच निमग्न असतात. आकाच्या वांटगीस देखील येत नाहींत.

राघो०— हाँ. मी तेथें नाहीं ह्मणून, असें झालें वाटतें. अरेरे घात झाला. राजाची आणि राणीची इतकी प्रीति होऊं द्यावयाचीच नव्हती. ही आमच्या आकाची मोठीच चूक.

### श्लोक ( शिखरिणी )

नृपाळांचीं चित्तें चपळ पवनाहून असती, ॥
स्थिरावाया त्यांला चतुर सतिहूनी हि असती; ॥
त्रपाहीना क्रीडा सुरत करुनी भाषण मधू ॥
करीती वाग्गामी, अधरपुटिचें पाजुन मधू ॥ २१ ॥

असें असून, राजेसाहेब आकाच्या हातून असे सुटले

---

१ पतिव्रता. २ वारांगना. ३ लज्जा ४ आज्ञांकित ५ ओठाचें. ६ अमृत.

हें मोठें नवल आहे. आमची आका कांहीं अशीतशी बायको नव्हे; सगळ्या जगतास कंवटाळून धरणारी.

मद्या०— पण करत्ये काय ! राणीचें तरुणपण, आणि प्रधानाची शिकवण.

राघो०—जाऊं दे रे, त्या प्रधानाची बढाई बोलूं नको. त्यांला जर कंठस्नान घालीन, तरच मी मांगाचा पोर होईन; नाहींतर थू माझ्या तोंडावर. (थुंकतो.) मद्या, चल गड्या आपण त्या गुहेंत जाऊन निजूं ह्यासे.. तूं कांहीं भिऊं नको हो. त्याचा सूड घेऊं, आपण आतां वचने राजे आहों, सर्व रान आपलें आहे. (मद्यपानीच्या गुंगींत कांपत कांपत गुहेंत जाऊन निजतात.)

(नंतर फिरून पड्याआंत शब्द होतो.)

अहो, स्थळवासी, हांका मारून मारून माझा कंठ शुष्क झाला. तुह्मी कोणीच उत्तर देत नाहीं हें काय ! अहो, तुह्मीं सर्वच बेहेरे आहां काय !

विदू०—(किंचित् भयभीत.) कायरे, बाबा, हें काय आणखी लचांड ! एक मोठ्या दाढीमिशीचा आला त्याला तर वाटेस लावलें, आतां हा दुसरा कोण येतो आहे ! (इतक्यांत हातांत दांडका घेऊन कुतकाजो येतो.)

कुतर्का०— अरे ! हे सगळेच बेहेरे आहेत मला वाटतें; कोणाला ऐकूं येतच नाहीं. जसे अरण्यांतील वृक्ष तोडून नेल्यावर त्यांचीं खुंटें अवशेष राहतात, तसे हे सर्व बसले आहेत मात्र.

विदू०—(पुढें होतो.) रामराम. अहो तुह्मी कोण ! आलां कोठून, आणि जातां कुठे !

## साकी.

कोण तुह्मी कोणाचे, सांगा कारण आगमनाचें ॥
येथें स्थळ हें वेधक मानस असतां सूरिजनांचें ॥ २४ ॥

कुतका०—( ऐकून मनांत. ) अरे ! हें काय ? मी आलों कुठे ? हें स्थळ कोणतें ? हा येथें ताडवृक्षासारखा कोण उभा आहे ? आणि माझें नांव गांव कशाकरतां बरें विचारतो आहे ? कदाचित् असें तर नसेलनां झालें ? दैवांची गति विचित्र आहे.

## श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

व्याधांची शरभीति चित्तिं ह्मणुनी घोरीं वनीं संचरे, ॥
दुर्दैवें हरिचेया गुहेंत मृग कालग्रस्त तोही भरे, ॥
होता फार-दिन क्षुधार्त पळही नोपेक्षि तो प्रार्थितां, ॥
भक्षी तत्क्षणिं प्राप्त भक्ष्य प्रगटी शार्दूल विक्रीडिता ॥ २५॥

तसा, मी पुढील प्राप्त होणाऱ्या भयास टाळण्याकरितां ह्मणून निघालों तो, अकस्मात् त्याच प्राणसंकटांत येऊन पडलों तर नाहींना ? असो, आतां घाबरून काय होतें ? जो प्रसंग येईल, तो युक्तीनें टाळला पाहिजे; कां कीं—

## आर्या.

समयज्ञ युक्ति शोधुन, संकटनीराब्धि तरुन जाती ते ॥
रात्रीतें विधुहीना, व्यापारति सजुनि तेलवातीतें, ॥ २६ ॥

---

१ पंडित २ पारधी ३ सिंहाच्या. ४ भुकेला ५ क्रीडा.
६ समय जाणणारे ७ चांदणे नाहीं अशा.

तर आपण आपलें खरें स्वरूप येथें प्रगट न करून, सरळ स्नेहभावाच्या गोष्टी बोलून याचा भेद घ्यावा, आणि जसा रंग दृष्टीस पडेल तसे ढंग करावें ह्मणजे कदाचित् आपला निभाव होईल. ( बाहेर. )

ओव्या.

पुसल्यावांचून कुशलासी, कोण कोठून आलासी, ॥
ऐसें जरी विचारसी, नव्हे तस्कर तरी आह्मी. ॥ २७॥
हें खरें वेधकस्थळ, सूरि मानसाचें निर्मळ, ॥
मिथ्या नव्हे स्वामीजवळ, वसते आह्मी सर्वदां॥ २८ ॥
पावोनि प्रभुनिदेशा[1], विहरूं आलों या देशा. ॥
संपादाया उद्देशा, मानसींच्या, २९॥

विदू०—( आपल्याशीं ) हा कोणी राजमंडळांतील गुप्त हेर असावा असें ह्या ह्याच्या भाषणावरून वाटतें. (बाहेर. ) काय, तुह्मी राजसेवक आहां ?

कुतका०— नव्हे तर काय चोर आहों ?

विदू०—( मनांत. ) गड्या, कांहीं काळें धोळें दिसतें. ( बाहेर. ) पण रात्रीचे कीं दिवसाचे ?

कुतका०— ही आतां रात्र कीं दिवस ?

विदू०— ही तर रात्र, बाबा.

कुतका०— तर रात्रीचे.

विदू०— कोण ?

कुतका०— तुह्मी विचारतां कोण ?

विदू०— कोण ह्मणजे सावकार कीं चोर ?

कुतका०— प्रसंग येईल तसे; दोघेही.

---

१ आज्ञा.

विदू०— आतां कोणता प्रसंग आहे ?

कुतका०— तुह्मी कोणता ह्मणतां ?

विदू०— रात्रीचा.

कुतका०— तर आह्मी रात्रीचे.

विदू०— ( खदखदां हांसतो.) रात्रीचे सावकार, आणि दिवसाचे चोर आँ. उभे देखील राहूं नका येथें· तुह्मी उपल्ये दिसतां.

कुतका०— ( मनांत ) अरेरे ! घात झाला. म्यां मूर्खानें काय हें असें केलें ?

श्लोक. ( पृथ्वी. )

रमूनि, रजनीं परीं[१] रति[२] पतीचिये मंचकीं ॥
निजे अवगता[३] न जी सखिजनास ही वंचकी,॥
सुषुप्ति[?]त कथी स्वकीयकृतं[४] दुष्कृता[५] शासनीं ॥
पडे पति नृपाचिये कुमति जेवि ते कामिनी ॥३० ॥

तसा, मी येथें भलतेंच बरळून आपणास संकटांत घालून घेतलें. असो; कांहीं दुसरी युक्ति करून या लबाडास ठकवितों. ( बाहेर ) बसायास द्या, ह्मणजे नाहीं उभा राहात.

विदू०— काय, बसायास देऊं ? आह्मास गरज नाहीं.

कुतका०— पण आह्मास आहे.

विदू०— तर बसा.

कुतका०— कुठे बसूं ?

विदू०— मनास येईल तेथें.

---

१ परपुरुषीं २ सुरत ३ ठाऊक. ४ आपणकेलेलें. ५ पाप.

कुतका०— येथेंच मनास येतें. ( असें ह्मणून खालीं बसतो. )

विदू०— अहो, तुह्मी कोण ? कशाकरतां येथें आलां ?

कुतका०— मी राजसेवक ह्मणून मघांच तुह्मांस सांगित-लेंना ? कांहीं गुप्त कार्यासाठीं येथें आलों आहें. पण हळूच, मोठ्यानें बोलूं नका. काम फार नाजूक आणि गुप्त आहे. कदाचित् परिस्फुट झाली असतां घात होईल.

विदू०— कोणाचा ?

कुतका०— आमचा; आणखी कोणाचा ?

विदू०— तर माझें काय गेलें. होऊं द्यानी, उद्यांचा आ-जच.

कुतका०— हाँ; माझें काय गेलें आँ! गोष्ट फुटली की झालेंच दोघांचें ही.

विदू०— काय ?

कुतका०— तळपट.

विदू०— बाबा, दोघांचें कोणाचें ?

कुतका०— तुमचें आणि माझें.

विदू०— ( घाबरून. ) इडा पिडा टळो अमंगळ जळो. तु-मचेंच होऊं द्या, बाबा. मला नको तें. ( मागच्या पा-यीं मागें सरतो. )

कुतका०— ( मनांत. ) आमचें व्हावयाचा वेळ आलाच होता, पण चुकला.( बाहेर ) पळूं नका, या असे हिकडे.

विदू०— मी नाहीं; मला भय वाटतें बाबा.

कुतका०— भिऊंनका; विचारतों तें सांगा मात्र, ह्मणजे झालें.

विदू०— जों पर्यंत तुह्मी दोघांचें तळपट होईल असें ह्मणतां तोंपर्यंत मी एक पाऊल देखील घालणार नाहीं, मी आपला येथेंच राहीन

कुतका०— ( आपणाशीं ) बरीच नरम आली. ( बाहेर.) अरे ऐक भ्याडा, तुला ठाऊक आहे ?

श्लोक. ( वंसततिलका. )

पार्थीव मंत्रें नकरी कवणास जाण ॥ .
सेवा विशारद अनूचर तो सुजाण ॥
झाला कदाचित जरी श्रुत साह कानीं ॥
तो लागलाच करतो पर आप्त हानी ॥ ३१ ॥

ह्मणून, हा राजमंत्र बाबा, कोणास सांगूं नये. सांगितला असतां मात्र तळपट होतें. नसांगितला असतां, मग कांहीं भय नाहीं त्यापासून.

विदू०— मी शपत घेतों, असें आहे तर. ( जिभेस कुरचा घेतो. ) मला कांहीं सहा कान नाहींत. ( आपले कानांस हात लावतो ) हे पाहा, दोनच आहेत.

कुतका०— मी तुह्माला सहा कान आहेत असें ह्मणत नाहीं. सहाकानीं ह्मणजे तिसऱ्यास कळूं नये. इतकेंच.

विदू०— मग; येथें आपण तर दोघेच आहों; तेव्हां तिसऱ्यास कसा कळेल ?

---

१ मसलत.

**कुतका०—** ह्मणूनच, विचारतों तें नीट सांगा; भिऊं नका पण गुप्त ठेवा, हो.

**विदू०—** होय, गुप्त ठेवीन, बोला काय तें ?

**कुतकाजी—** श्लोक (शिखरिणी.)

प्रभूनें रोषानें स्वपुरिपरिघांतून महिलो[1] ॥
झुगारीला क्रौर्यें ह्मणवि दुबळा कृष्ण[2] अहिला ॥
शरीराकाराने विटप[3] सम जो कज्जलगिरी ॥
शिरी, आस्यीं[4] जिव्हा क्रकच[5] सम वा पुछ मगरी[6] ॥३२॥
असे रानीं कोनीं गिरितळवटीं तालतरुच्या ॥
निबीडा छायेला सहज बसला दृष्टि तुमच्या ॥
जरी पाहीयेला करुण मजला होऊन कथा ॥
पथा स्थानाच्या त्या करिं अनुचरा या गतव्यथा ॥ ३३॥

(हिकडे राघोजी आणि मदाजी यथेच्छ मद्यपान करून तालवनांत निजले होते ते श्लोकांतील कांहीं शब्द ऐकतात.)

**मदाजी** (निद्‌सुरेपणांत घाबरतो) अरे ! घाला रे घाला.

**राघो०—** (झोंपेंत.) मद्या; कोणावर घाला ?

**मदा०—** आपल्यावर, दादा.

**राघो०—** अरे काय घाला ! लांकडें कीं माती (चुरमुरत.) काय वेड्या सारखा बरळतो, निजना कसा घडीभर स्वस्थ ?

**मदा०—** दादा; ही निजावयाची वेळ नव्हे. अहो उठा.

---

१ पृथ्वीला. २ कृष्णसर्पाला ३ वृक्ष. ४ तोंडांत ५ करवत ६ मगरमत्स्य.

राघो०— अरे, डोळ्यांत झोंप भरली आहे ही पाहा. आणि तूं निजावयाची वेळ ही नव्हे काय ह्मणतोस ?

मदा०— अहो, तो पहा. कोणी आह्मास शोधीत आला.

राघो०— बस वेड्या; भ्याडा मुका. कोण आला; कुठे आहे, दाखव पाहूं ?

मदा०— अहो नव्हे. मी आतांच निजेंत ऐकिलें तुह्मास कोणी विचारतो, तें.

राघो०—अरे मूर्खा, निजेंत ऐकिलें तें स्वप्न. वेड्या तें काय कुठें खरें होतें ?

मदा०— मी पण कांहीं सुस्त निजलों नव्हतों.. निद्सुरा मात्र होतों.

राघो०— त्यालाच स्वप्न ह्मणतात. समजलास ? असा वनचरासारखा होऊं नको. भित्रा कुटचा. सगळा दिवस मनांत भयच कंत्रटाळून राहिलेला; तेंच भय स्वप्नांत आणखी काय. असे मनीं; तें दिसे स्वप्नीं. ( डोळे पुसून दीर्घ जांभई देतो. )

मदा०— दादा. पण, तुह्मी जागे झालां ?

राघो०— अरे होय. हा जागाच आहें. ( आंगमोडा देतो.) काय ह्मणतोस तूं ?

मदा०— मी आतांच ऐकिलें. कोणी तुमचा शोध करीत होता.

राघो०— पण, तूं कशावरून ह्मणतोस ? तो माझाच शोध करीत होता असें. अरे, या रानांत असे शेंकडों येतात, आणि जातात.

मदा०— अहो तसें नव्हे ? तो तुह्मासच अनुलक्षून बोलत होता.

राघो०— कसा ? काय बोलत होता ? सांग पाहूं. ( उठून बसतो. )

मदा०— ऐका नीठ; तो ह्मणाला, तें. ( पूर्वोक्त श्लोक ह्मणतो. )

### श्लोक.

प्रभूनें रोषानें स्वपुरिपरिघांतून महिला ॥
झुगारीला क्रौर्यें ह्मणवि दुबळा कृष्ण अहिला ॥
शरीराकारानें विटप सम जो कज्जल गिरी ॥
शिरी अस्यीं जिव्हा क्रकच सम वा पुछ मगरी ॥

राघो०—( शरीरास न्याहाळून पाहतो. ) अरे ! खराच म. ह्या पुढें कृष्णसर्प काय ? तृणवत् (जीभ बाहेर काढतो.) ही पहा माझी जीभ, हिच्या पुढें तलवार काय करती. सांपडेल त्याची चटणी करीन; तूं काय समजतोस !

मदा०— होय, तुह्मी चटणी करा मग; पण तो आणखी काय ह्मणाला तें ऐका.

राघो०— काय ह्मणाला ?

मदा०— ( दुसरा श्लोक ह्मणून दाखवतो. )

### श्लोक.

असे रानीं कोनीं गिरितळवटीं तालतरुच्या ॥
निबीडा छायेला सहज बसला दृष्टि तुमच्या ॥
जरी पाहीयेला करुण मजला होउन कथा ॥
पथा स्थानाच्या त्या करि अनुचरा या गतव्यथा ॥

राघो०—( घाबरतो. ) अरे, तो नाटक्याच्या पोर घात तर नाहींना करणार ? बरें, काय चिंता आहे! मद्या! अरे,) हा कोणी सोधतो खरा मला. पण काय ? आपण दोघे

आहों; त्या एकट्याचा समाचार नाहीं घेववणार, आ-
मच्यानें!

मदा०— होय; तो एकटाच असला, तर आह्मी त्याचा समाचार घेऊं; पण कोण जाणे, एकटा आहे कीं दुकटा आहे, तें?

राघो०—अरे, तूं जाणतोस? हें त्या दुष्टा सेनापतीचें काम असेल; गुप्त दूत पाठवून मला घाबरें करावयाचें, पण, मी त्याच्या बापाला देखील मिळणार नाहीं. मला चांगलें ठाऊक आहे, शिवाजी राजा कांहीं आह्मावर मनापासून वांकडा नाहीं. मला त्याणेंच तर हिकडे पाठवलें.

मदा०—तें खरें दादा, पण हे प्रधान मंडळी सर्वच आपणावर रुष्ट आहेत. कोणत्यावेळीं आमचा जीव धोक्यांत घालतील हें समजत नाहीं.

## साकी.

नृप चंदन खल पन्नग[१] वेष्टित कैसे सौख्यद होती ॥
साधाया निज वांछित अन्याचे कां प्राण न घेती॥२४॥

राघो०—तें बरीक खरे. कारभारी तर आपल्याला पाण्यांत पाहतात. पण, मद्या, तुला ठाऊक आहे, आपण कोण आहों तें? राजाचेच लेंकवळे. जर ते कारभारी असें कांहीं करूं लागलेच; तर आह्मी ही आपली तलवार जागविण्यास मागें सरूं काय? आह्मी काय बांगड्या भरल्या आहेत? ( मिशांवर हात फिरवून बाहू थोपटतो. )

---

१ सर्प.

### श्लोक. ( पृथ्वी. )

करीन समरीं महाप्रलय क्षात्र केली असीं ॥
कधीं श्रुत न या क्षितीतळवटींत केली असी ॥
अवध्य सुर बोलती निजमुखें अहा मांग हा ॥
असें करिन माखवीं असृजपंक पृथ्वी पहा ३५ ॥

आणखी ही.

### आर्या.

सुर सात्विक तंतूचें झालेले आह्मि रजत लोहाचे ॥
काचे ते धैर्याचे पाहुन मत्पौरुषा लपति खांचे ॥ ३६ ॥

ते काय माझ्या पुढें उभे राहाणार ?

**मदा०**— तें खरें- पण आपल्याच्याने तरी तसें कसें करवेल- ? आपली मायाउ आका आणि कामाजी दादा तेथें आहेत त्यांच्या हातांत. नाहींतर, या कारभाऱ्यांचें तेल काढण्यास उशीर किती होता ?

**राघो०**—अरे, आपल्या मायाउ आका विषयीं तर काळजी करावयासच नको- तिला कांहीं राजाच्याने सोडवत नाहीं; समजलास ?

**मदा०**— पण, या कारभाऱ्यांची शिकवण आहेना ?

**राघो०**— अरे, जरी शिकवण असली, तरी आमच्या आका प्रमाणें राजास दुसरी उपांगना ती कोण मिळणार; आका ह्मटली, ह्मणजे.—

### साकी.

सदैव यौवन तरुणा जरि जी असंख्य बाळें व्याली ॥

---

१ युद्धांत २ क्रीडा. ३ तलवारीनें. ४ रक्ताच्याशिखाने. ५ पराक्रम.

अश्रम सबला भोगीं सुखदा अरिगणहनना व्यालीं॥३७॥

**मदा॰**— होय. तें तसें आहे खरें. पण आपला कामाजी दादा तेथें आहे; त्यास गांजतील, मग काय करतां?

**राघो॰**— जाऊं द्यारे. त्यांच्या पासून आमच्या कामाजी दादाचें कस्पटा इतकें देखील वांकडें होणार नाहीं. तीं काय करतात माजरें; त्याणीं जरी आमच्या दादाचा किती हेवा केला, तरी तो त्यांस पुरा पडेल- त्याचें राजाच्या अंतःपुरांत देखील सर्वदां जाणें येणें आहे, तेथें कारभाऱ्याचें काय चालतें? कदाचित् तसें कांहीं झालें; तर आह्मी सर्व मिळून आपलें राज्य येथेंच स्थापन करूं ह्मणजे झालें.

( इतक्यांत पडद्या आंत मोठा शब्द होतो- )

अहो, सकल सुर सिध्दमुनिजन हो; शिवाजी राजाच्या साम्राज्यांत कित्येक मांग, रामोशी, पेंढारी, आदिकरून लुटारू; जे जनास उपद्रव करून नागवीत असत; त्या कित्येकांस राजाच्या आज्ञेने बोधाजीराव सेनापती याणीं देश पारकरून लावलें. अद्यापि ही जे कांहीं राज्यांत जनाला उपद्रव करणारे आहेत; त्यांला हीसेनापती देशपार करण्याच्या बेतांत आहे. परंतु, त्यां सर्वांमध्यें जो प्रमुख कामाजी नाईक, तो राजाधिकारी आणि राजप्रीतिपात्र असल्यामुळें दुर्जय असून सांप्रत युक्तायुक्त न पाहतां सर्वत्रांस जीवित धनासुद्धां नागवून फस्त करीत आहे, तर; याचे कृतापराध शिवाजी राजास निवेदन करून याला योग्य शासन करण्याविषयीं

---

१ सर्पिणी.

राजाज्ञा होई तावत्काल पर्यंत सावधान राहा. साव-
धान राहा.

( सर्व घाबरतात. )

मदा०— ऐकतांना दादा. काय मंत्र चालला आहे तो!
राघो०— होय, ऐकतों. हे चाडखोर आमच्या दादाला शिक्षा करवणार आँ. अरे, जो तुह्माला अवध्य त्याचें तुह्मी रे काय करणार! मद्या, आणरे ती माझी तलवार हिकडे; पाहुंदे एकदां, कसें काय आहे तें!
मदा०— (तलवार पडदळा सहित आणून देतो.) दादा, पाहिलेंतना! मघांपासून मी ह्मणतों तें. तुमचा कोणी शोध करीत येत आहे ह्मणून.
राघो०— ह्मणूनच. तयार होऊं दे बाबा; कदाचित् आलाच वेळ तर!
मदा०— मी खचित सांगतों; त्या द्वाडा सेनापतीने पाठविलेला कोणी गुप्तचार या अरण्यांत संचार करीत आहे.
राघो०— तसें असेल खरें. ( उजवा बाहु फुरफुरतोसें दाखवतो. ) हा पाहा, माझा दक्षिणबाहु, लवकरच युत्ध प्रसंग येणार असें मला दर्शित करतो.
मदा०— तर दादा, तुह्मी हत्यारें घेऊन तयार रहा. मी असा बाहेरून शोध ठेवितों, कोणी आलाच तर;
राघो०— जा. चांगली सावधगिरी ठेव; नाहींतर गाफील राहाशील. हा मी सायुध होतों. ( तलवार गळ्यांत लटकावतो आणि ह्मणतो. )

### श्लोक (वसंततिलका)

या माझिये असिनें मी शतहेर कोटी ॥
कापून घालिन अचेतनें भूमिपोटीं ॥
सेनापती सहचमू जरि येथ आला ॥
धाडीन त्यास हि परत्र पहावयाला ॥ ३८ ॥

( आपले भुज अनुलक्षून )

माझे उद्दंड भुजदंड फुरारताती ॥
शत्रूगणां चरचरां रणिं कापताती ॥
हे अंतरीं ममनोगत दूत मातें ॥
मोदाकरा सुचविती नरसत्तमातें ॥ ३९ ॥

( आणखी तलवारीकडे लक्षपूर्वक अवलोकन करून तिला संबोधितो. )

### दिंडया.

जया पासून हा वीरदेह झाला ॥
तया रायें विपिनांत टाकियेला ॥
हाति तुजला देऊन रक्षणाला ॥
उपेक्षा तूं न करिं गे या क्षणाला ॥ ४० ॥
आज्ञा वीरांची तूंच माय साची ॥
विजय भिक्षा देणारि पायसाची ॥
समरकेलीच्छु तुजलागिं मी न सोडीं ॥
जशी सोडि न मायेचि शिशु पसोडीं ॥ ४१ ॥

( या प्रकारें तलवारीचें स्तवन करून तिचें मुखाने

---

१ तलवारीनें. २ चेतनारहित. ३ वीर. ४ युध्दक्रीडाइच्छि-णारी. ५ पदर.

चुंबन करतो, आणि वीररसाने गुंग झालेला हिकडून तिकडे फिरत आहे. )

( इतक्यांत पडद्याआंत मोठा शब्द होतो. )

अहो सर्व सभानायक, बोधाजीराव दाभाडे सेनापती याणी विज्ञापना केल्यावरून श्री मन्महाराज शिवाजीराजे यांची स्वारी सभेस येत आहे. तर; सर्व सभासदांनी आप-आपल्या कामीं संलग्न असून सेवेंत तत्पर असावें. आणि, ज्या कोणांस आपले राज्यांत दुष्टांपासून पीडा होत असेल, त्याणींही, ती निवेदन करण्यास सादर असावें. राजेमहाराज सर्व ऐकून घेऊन योग्य बंदोबस्त करतील.

( हिकडे कुतकाजी राघोजीचा शोध करीत होता तो, हा शब्द ऐकून घाबरतो, आणि आपणाशीं फुटफुटतो. )

**साक्या.**

कुपित जरी प्रारब्धचि झालें शरण कोणाला जावें ॥
त्राणासाठीं जावें तेथें अवचट संकट यावें ॥ ४२ ॥
विपरित गति दैवांची, ह्मणती सज्जन ते साची॥ धृ० ॥

( मनांत ) माझा धनी संकटग्रस्त होऊन आला; त्यास शोधीत असतां, तो न मिळून आतां जर, राजाची स्वारी येथें येईल, तर मग; आपण कुठे लपावें ?

**साकी.**

प्रभुकार्याला आला ज्या तें राहियलें अरधेंची ॥
वल्ली चित्तीं प्राण भीतिची अधिकाधिक वरधेंची ॥ ४३ ॥
आतां काय करावें, वेगी निबिडोटविं जावें ॥ धृ० ॥

---

१ वाढे. २ घोरवनांत.

तर आतां स्वपरित्राणार्थ निबिड वनांत संचार करावा. कांकीं.—

### श्लोक. ( अनुष्टुप् )

टाळाया राजभीतीला, संचरे निबिडा वनीं, ॥
रक्षणा न दुजा यत्न दीसतो राहुनी जनीं ४४ ॥

बरें; ही येथें तालवृक्षांची झाडी दिसती योत जाऊन बसाव- ( तिकडे जाऊं लागतो. ) अरे तो कोणी उभा आहे सा दिसतो तेथें. (न्याहाळून पाहातो. तों, हातांत ढालतरवार घेऊन, मोठा भयंकर वीरपुरुष हिकडून तिकडे फिरतांना दृष्टीस पडतांच भयभीत होतो आणि कांपत कांपत हळूहळू चालतो. )

मदा०— ( त्यास पहातो आणि धांवत राघोजीपाशी येतो) दादा. तो पहा, सेनापतीचा गुप्त हेर आपणास शोधीत येत आहे तो; पाहिलातना ?

राघो०— होय तो एकटाच हळूहळू येत आहे तोचना ?

मदा०— होय; तो एकटाच दिसतो. पण, त्याच्या मागें कोण जाणे किती सैन्य असेल ?

राघो०—तसें असेल खरें. तो बेटा टेहेळ्या असेल सें वाटतें. त्यापासून काय व्हावयाचें आहे ?

मदा०— तो अशस्त्र आहे ह्मणून ह्मणतां ?

राघो०— ह्मणून किंचित् विचार. नाहींतर, एकघाय आणि दोनतुकडे लागलींच केलीं असतीं; बेट्याचीं.

मदा०— तर काय, त्याला तुह्मी जिवंत सोडणार ?

राघो०— तर कसें करावें. ? कांकीं.—

चुंबन करतो, आणि वीररसाने गुंग झालेला हिकडून तिकडें फिरत आहे. )

( इतक्यांत पडद्याआंत मोठा शब्द होतो. )

अहो सर्व सभानायक, बोधाजीराव दाभाडे सेनापती याणी विज्ञापना केल्यावरून श्री मन्महाराज शिवाजीराजे यांची स्वारी सभेस येत आहे. तर; सर्व सभासदांनी आप-आपल्या कामीं संलग्न असून सेवेंत तत्पर असावें. आणि, ज्या कोणांस आपले राज्यांत दुष्टांपासून पीडा होत असेल, त्याणींही, ती निवेदन करण्यास सादर असावें. राजेमहाराज सर्व ऐकून घेऊन योग्य बंदोबस्त करतील.

( हिकडे कुतकाजी राघोजीचा शोध करीत होता तो, हा शब्द ऐकून घाबरतो, आणि आपणाशीं फुटफुटतो. )

## साक्या.

कुपित जरी प्रारब्धचि झालें शरण कोणाला जावें ॥
त्राणासाठीं जावें तेथें अवचट संकट यावें ॥ ४२ ॥
विपरित गति दैवांची, ह्मणती सज्जन ते साची॥ धृ० ॥

( मनांत ) माझा धनी संकटग्रस्त होऊन आला; त्यास शोधीत असतां, तो न मिळून आतां जर, राजाची स्वारी येथें येईल, तर मग; आपण कुठे लपावें ?

## साकी.

प्रभुकार्याला आला ज्या तें राहियलें अरधेंची ॥
वल्ली चित्तीं प्राण भीतिची अधिकाधिक वरधेची ॥ ४३ ॥
आतां काय करावें, वेगी निबिडोटवि जावें ॥ धृ० ॥

---

१ वाढे. २ घोरवनांत.

तर आतां स्वपरित्राणार्थ निबिड वनांत संचार करावा. कांकीं.—

श्लोक. ( अनुष्टुप् )

टाळाया राजभीतीला, संचरे निबिडा वनीं, ॥
रक्षणा न दुजा यत्न दीसतो राहुनी जनीं ४४ ॥

बरें; ही येथें तालवृक्षांची झाडी दिसती योत जाऊन बसाव- ( तिकडे जाऊं लागतो. ) अरे तो कोणी उभा आहे सा दिसतो तेथें. (न्याहाळून पाहातो. तों, हातांत ढालतरवार घेऊन, मोठा भयंकर वीरपुरुष हिकडून तिकडे फिरतांना दृष्टीस पडतांच भयंभीत होतो आणि कांपत कांपत हळूहळू चालतो. )

मदा०— ( त्यास पहातो आणि धांवत राघोजीपाशी येतो) दादा. तो पहा, सेनापतीचा गुप्त हेर आपणास शोधीत येत आहे तो; पाहिलातना !

राघो०— होय तो एकटाच हळूहळू येत आहे तोचना ?

मदा०— होय; तो एकटाच दिसतो. पण, त्याच्या मागें कोण जाणे किती सैन्य असेल ?

राघो०—तसें असेल खरें. तो बेटा टेहेळया असेल सें वाटतें. त्यापासून काय व्हावयाचें आहे ?

मदा०— तो अशस्त्र आहे ह्मणून ह्मणतां ?

राघो०— ह्मणून किंचित् विचार. नाहींतर, एकघाय आणि दोनरुंढें लागलींच केलीं असतीं; बेट्याचीं.

मदा०— तर काय, त्याला तुह्मी जिवंत सोडणार !

राघो०— तर कसें करावें. ? कांकीं.—

## ओवी.

अशस्त्र आणि सन्यासी, अबला बाला रोग्यांसी,
दूतां, आल्या शरणागतासी, वधी रौरव त्या होय॥४५॥

मदा०— ( आपले दांत चावतो. ) शाबास. मग या साडे-तीन हात लांब तलवारीचा उपयोग तो कुठे करणार तुह्मी !

राघो०— उपयोग कुठे करणार ! ऐक सांगतों.

## श्लोक. ( वसंततिलका. )

जे शस्त्रभृत्समरिं भीडति त्यांस पाहीं, ॥
बंधूसुह्रत्सुत मनीं न गणून कांहीं, ॥
खड्गें वधूं उसणिया अशि क्षात्ररीती, ॥
स्वीकारतो सुख परत्रि हि ते वरीती, ॥ ४५ ॥

मदा०— तें सारें खरें. पण.—

## अभंग.

दूतमुखें ऐकुनियां वर्तमान ॥
अपार घेउन दळभार ॥ १ ॥
येती ते धांउन कापतील गळा ॥
घालतील घाला रात्री दिवसा ॥ २ ॥
बांधितील जेव्हां करिति विटंबना ॥
परत्र निधाना पाविजे तई ३ ॥ ४७ ॥

राघो०— तर मग तुझें काय ह्मणणें आहे, मद्या ?

मदा०— **ओव्या.**

भावी अपायाचें बीज, आहे दूत हा ऐकें गूज ॥

---

१ नरक. २ शस्त्रधारी. ३ परलोकीं. ४ पुढेंहोणारा.

यास वधितां सहज, सर्व अरिष्टें निर्मूळती ॥ ४८ ॥
जरी केली याची उपेक्षा, शाहण्या क्षात्रनीतिदक्षा,
तरी व्हावया जीवितमोक्षा, संशय नाहीं तिळमात्र ॥ ४९ ॥

**राघो०**— तर काय यास येथेंच मारावें ह्मणतोस !

**मदा०**—यांत काय, संशय ! ठार मारावें यास, हेंच श्रेयस्कर. यास मारून टाकलें, ह्मणजे मागें वर्तमानच जाणार नाहीं. पण गपचूप केलें पाहिजे काम.

**राघो०**— कां ! गपचूप कशासाठीं !

**मदा०**—याच्या मागें कुणी असेल आणि तो याची आरोळी ऐकून सेनापतीकडे धांवत जाईल. यासाठीं ह्मणतों.

**राघो०**— इतकेंचना, फुसरे; तें माझें काम, त्याला बोलूं कशाला देतों मीं ! आपण मांगाचे बच्चे. घरचें कसब.

**मदा०**— मी हा असा आडवा जातों त्याला. तुह्मी समोरून या, तलवार घेऊन, आणि द्या सपाटा मुकाट्यानें. पण संभाळा, चकार शब्द बोलाल तर.

**राघो०**— अँः, तें कांहीं मांगाच्या पोरास शिकवायास नको. ( असें ह्मणून दोहीं कडून दोघे जातात. त्यांजकडे तिकडून कुतकाजीची दृष्टि पोंचती. )

**कुतका०**— ( मनांत. ) अरे, प्रारब्धा ! हें रे काय संकट ! हे कोणी तलवार घेऊन माझ्याकडेचस येताहेत. हे मला खचीत मारणार. आतां तरणोपाय काय करावा ! आपणापाशीं कांहीं तलवार नाहीं, कीं त्यांचा समोर होईन. तर, मागें पलायन करावें ह्मणजे गरीब ह्मणून कदाचित् वांचलों तर वांचलों. नाहींतर शंभर वर्षें भरलींच आहेत. ( मागच्या पायीं मागें पळूं लागतो. )

**मदाजी.**— ( त्यास पळतांना पाहतो आणि राघोजीस संज्ञा करतो. ) हूं हूं हूं.

**राघो०**— ( तलवार हातांत घेऊन त्याजवर वार करावयास धांवतो. )

**कुतका०**— ( खालीं पासला पडून दीनवाणीनें प्रार्थना करतो. ) अहो, वीरपुरुष हो, मी राजदूत आहें. कांहीं चोर नाहीं. दूतास मारूं नये असें शास्त्र आहे.

**राघो०**— ( क्रोधाचा आवेश आणून त्याजवर तलवारीचा छपाटा मारतो तो चुकवून कुतकाजी जवळच खांच होती त्यांत घसरतो. ) घे, लेंका. तूं राजदूत ह्मणूनच तुला मांगाच्या हातानें पूतमरण आलें. जा लेंका; मर आतां. ( मनांत तो मेला असें समजतो. )

**मदा०**— ( जवळ येऊन ) दादा, बरोबर केलें ना ? पहा नीट. कांहीं शेष असेल ?

**राघो०**— काय शेष ? माझ्या राघोजीच्या हातानें ? तर मग मांगाचा बच्चाच नव्हें मी. अरे, एक घाय आणि दोन तुकडे लागलेच. तूं ऐकिला नाहीं काय त्याचा आवाज झाला तो, खाचेंत पडला तेव्हां ?

**मदा०**— हांय. मेघगर्जनेसारखा ध्वनि झाला, तो मी कसा नाहीं ऐकणार ?

**राघो०**— बरें, आतां तूं काय ह्मणतोस, मद्या ?

**मदा०**— दादा, ज्या हातानें तुह्मी शत्रुवध केला, तो हा तुमचा सशस्त्र बाहु सर्वदां विजयी असो, आणि सर्व अरिष्टांपासून आमचें रक्षण करो.

**राघो०**— ( विजयमदानें फुगून. )

श्लोक. [ भुजंग प्रयात. ]

अरीमर्दनां वर्धती शक्ति माझी ॥
तुला सांगते झोंप घे स्वस्थ आजी, ॥
अरी सैन्य अक्षौहिणी येथ आलें ॥
भुजंगप्रयातींच तें जाण मेलें ॥ ५० ॥

[ असें ह्मणून सर्व निघून जातात. ]

अंक पहिला समाप्त.

---

पहिल्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पदे. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४ | ३ | ९ | २ | १० | १ | १ | ५० |

# सायुज्यसदननाटक.

## अंक २.

### स्थळ.

### राजसभा.

### पात्रें.

शिवाजी महाराज .. .. .. .. .. सार्वभौमराजा.
मायाऊ .. .. .. .. .. .. .. त्याची दासी.
बंधाजीराव दाभाडे .. .. .. .. .. .. सेनापति.
दमाजीराव घाटगे .. .. .. .. .. .. .. कोतवाल.
शमाजी पंत .. .. .. .. .. .. .. कारभारी.
मसाजी .. .. .. .. .. .. .. मायाऊचा भाऊ.
विचारराव .. .. .. .. शिवाजी राजाचा प्रधान.
कामाजी नाईक. मायाऊचा भाऊ आणि पेंढाऱ्याचा सरदार
मोहनाजी .. .. .. .. .. .. .. त्याचाभाऊ.
विवेकराव .. .. .. .. शिवाजीचा दुसरा प्रधान.

# सायुज्यसदननाटक.

## अंक २.

( नंतर पडद्याआंत मोठा शब्द होतो. )

पद. ( रागजोगी. )

झाला दुर्बल कैवारी, प्रभु सद्गुणराशी ॥ धृ॰ ॥
मारुनि जनतापक दुष्टांस दाता स्वांतेप्सित इष्टांस ॥
नासूनिज, जनपद कष्टांस क्षितिपृष्ठासरंचता ॥
सकल हि कल्याणाचें धाम, पुरवी निष्कामाचा काम ॥
करितें अनघचि ज्याचें नाम, मुनिविश्राम, धवलयशी ॥ २॥
व्हा शरणागत जन तुह्मी त्यास, अगणित निर्मल सुखदात्यास॥
रविदास प्रभु श्रुतिवेत्यास शिव नित्यास हर्षानें ॥ ३ ॥ १ ॥
( नंतर अर्धांगी निवृत्ति राणी, चरणकमळीं मायाऊ दासी ज्याच्या असा राजा शिवाजी येतो. )

श्लोक. [ शिखरिणी ]

निवृत्ती अर्धांगीं असि करिं सुविद्या विलसतो, ॥
जणो विद्युत्तेजाधिक अभिनव द्योतें दिसतो, ॥
प्रभा झांकी कोटी द्युमणि वपुची पादकमळीं, ॥
प्रवृत्ती दासेयी मधुप जसि होऊन रमली. ॥ २ ॥

( सर्व उठून उभे रहातात. )

---

१ तलवार. २ कांति. ३ सूर्य. ४ दासी.

शिवाजी० ( सर्वत्र अवलोकन. ) कोण आहे रे ? बोधाजीराव दाभाडे सेनापति कुठें आहेत ते पहा लौकर.

बोधाजी० ( हात जोडून. ) स्वामीचा आज्ञाधारक हा सन्निधच उभा आहे.

शिवा०— बरें, दमाजीराव घाटगे कुठे आहेत- ?

दमाजी०— ( जमिनीस हात लावून प्रणाम करतो. ) जी महाराज, हा अपला सेवाभिलाषी सेवेंत तत्पर आहे.

शिवा०— हाँ, सेवेंत तत्पर आहां ? तर मग, सांप्रत नगरचे लोकांचा मनें उद्विग्न झालेलींसीं कां बरें दिसतात ? त्यांस कशाची भीति उत्पन्न झाली आहे ?

दमाजी०— ( बोधाजीच्या मुखाकडे टकटकां पाहून किंचित् स्तब्ध राहतो. )

मायाऊ.— ( पायांस हात लावून, ) क्षमा असावी; ही दासी आज्ञा होईल तर, याचक्षणीं पायांपाशीं निवेदन करील.

शिवा०— ( दमाजीचे मुखाकडे अवलोकन करून. )

श्लोक. ( अनुष्टुप्. )

विधात्यानें मौन्य वस्तु अमूल्य जगिं निर्मिली, ॥
मूर्खां दोषकरीं अन्यायाच्छदीं[1] ती स्विकारिली. ॥ ३ ॥

( मायाऊ कडे अवलोकन करून. ) बोल, तूंही स्वामीची परिचाराच आहेस त्यापक्षीं.

---

१ अपराधी.

**मायाऊ.**— ( सानंद आणि सस्मित ) लोकांचीं मनें उद्विग्न होण्याचें कारण ह्मणाल तर सरकारच.

**शिवा०**— काय, मी कारण ? त्यांचीं मन उद्विग्न होण्यास ? काय मी त्यांजबरोबर अनीतीनें वागतों ? किंवा त्यांस विनापराधें छळितों ? तसें तर मजपासून कधींही घडलें नाहीं, कांकीं जो मी.—

### श्लोक. ( भुजंगप्रयात. )

सदां वर्ततों होउनी नीतिगामी, ॥[1]
जगत्पोषणा लालनाचा लगामी ॥[2]
दिल्हा कायें अन्यायगामी कुठीयां, ॥[3]
स्वयें संचरें सर्वदां सर्व ठायां ॥ ४ ॥

### आणखीही. ( शिखरिणी. )

तुझ्या संगें हिंडें नगरिं वनिं आणी गिरिकडे ॥
निवृत्ती ठेवोनी कधीं घडिभरी ही पलिकडे ॥
अकर्माकर्मातें करिं क्षितिवरी नीतिनयें हा ॥
सुरोर्षीं, अश्वासीं ह्मणून सुजनानंदित रहा ॥ ५ ॥

**मायाऊ**— तें खरें; पण, या चरणचुरणारीचे विज्ञापनाकडे जरा अवधान असावें.

### ओव्या.

आपली कृपा मावली, सुनीती- नय प्रसवली ॥
तेणेशीं हीं जीववलीं, जनपदकुळें ॥ १ ॥

---

१ अनुलक्षून चालणारा. २ स्वाधीन. ३ शरीर. ४ शिक्षाकरावयास. ५ न्याय.

स्वामी कृपामृताचे डोहो, सर्वस्वेच्छा ओलावों, लाहों ॥
परि प्रधानमगरसमूहो, वसते स्थळीं इये ॥ २ ॥
यास्तव स्वामी कृपापीयूष, संपादितांही घडे दंश ॥
हें सुचविणें या दासीस, अयोग्य, अश्रेयस्कर ही ॥ ३ ॥
परी सेवितों पादधूली, ह्मणोन कथणें आलें कपाळीं ॥
रक्षणें, मारणें करतलांजुळीं, स्थित मासोळी तसी, प्रभो॥४॥

( हें ऐकतांच दमाजी राव बोधाजीच्या कांनीं लागतो. )

**दमाजी**०— काय हो ! ही बटीक सर्व उघडें करणार असें दिसतें.

**बोधाजी**०— होय, असें दिसतें खरें बटीनें घात केला कीं हो ?

**दमाजी**०— बरें; आतां आपण कांहीं बोलूं नये. स्वामी पाशीं ही आणखी काय सांगती तें ऐकूं या.

**बोधाजी**०— होय; तसेंच करूं या.

( असें ह्मणून मायाऊचे भाषणाकडे आपलें केवळ दुर्लक्ष्य आहे असें दर्शवून उगे बसतात. )

**शिवाजी**.— ( मायाऊस उजव्या करांगुलीनें कानांत भाषण करण्याविषयीं खूण करतो. ) ये अशी हिकडे, ( तिजकडे आपला कान करतो. )

**मायाऊ**.— तोंडावर रुमाल धरून शिवाजीचे कानांत. ) चार दिवस झाले महाराज, दंवडी पिटली त्यास.

**शिवाजी**.— काय दंवडी ? कोणी पिटली ?

**मायाऊ**.— सेनापतींनीं, दुसऱ्या कोणी.

**शिवा**०— सेनापतीनें ह्मणतीस ! खरेंच कीं काय ?

माया०— आपले पाय साक्ष. ही दासी अनृतभाषणी नव्हे.

शिवा०— दंवडी कशाची होती बरें ? तुला ठाऊक आहे ?

माया०— सरकार मी प्रत्यक्ष माझ्या कानांनीं ऐकिली.

शिवा०— हाँ, त्वां ऐकिली खरी. पण त्यांत मजकूर काय होता ? कां कीं, सांप्रत आठ चार दिवसांत कोणत्याही प्रकारची दंवडी पिटण्याविषयींची आज्ञा मजकडून झालेली मला स्मरत नाहीं; ह्मणून ह्मणतों.

माया०— तर काय त्यांणीं आपल्या आज्ञेशिवायच हें काम केलें ?

शिवा०— असें व्हावयाचें नव्हे, पण कोण जाणें ?

माया०— कोण जाणे ? अजूनही संशयच असेल तर, त्या बोधाजीरावास बोलावून समक्षच पुसावें ह्मणजे झालें; काय, तो नाहीं ह्मणेल ?

शिवा०— अगे, नाहीं ह्मणणार नाहीं. पण माझ्या मनांत त्यास असें विचारावयाचें नाहीं.

माया०— स्वामीस संकोच वाटतो, मला वाटतें.

शिवा०— वेड्ये, संकोच कशाचा ? तो आपला आज्ञाधारक आहे. तो काय कोणी परकी आहे, त्याचा संकोच धरूं तो ?

माया०— हाँ, मी समजल्यें आतां. तो आपला अतिप्रीतिपात्र ह्मणून, त्याचें मन दुखवावयाचें नाहीं इतकेंच, मग कोणी मरो, कोणी जगो, कांहीं कां होईना ?

शिवा०— अगे, तसें नव्हे; ज्या पक्षीं मला अश्रुत अशी

दंवडी त्याणें फिरविली त्यापक्षीं, दुसरींही कित्येक कामें त्याणें माझे आज्ञेशिवाय केलीं नसतील क-शावरून ? ह्मणोन हा सर्व शोध बारकाईनें त्याला अश्रुत असा करावा असें माझे मनांत आहे. आणखीही:—

श्लोक. ( स्वागता )

गौप्यै मंत्र नृपती जरि ठेवी ॥
अन्यनश्रुत धनी निज ठेवी ॥
त्यापरी मग जयास न तोटा ॥
हो अमित्रजित कीर्तिवसोटा ॥ १० ॥

याजकरितां हें काम जितकें गुप्त रीतीनें होईल तित-कें करावयाचें ह्मणून या कारभाऱ्यांनीं कशाची दंवडी फिरवली याची सकल वार्ता ऐकण्यास मी अति उत्कंठित आहें, समजलीस ?

मायाο— जो, सरकार समजल्यें. आज्ञा होईल तर को-णास तरी नगरांत शोधास पाठविल्यें. दंवडीचें पत्र कदाचित कोठें चिकटवलेलें सांपडेल तर,

शिवाο— हाँ, पाठीव पण, त्वरा कर. ( असें ह्मणून निघून जातो )

मायाο— ( या गुप्त आणि अविलंबित कार्यास कोणास योजावें असा विचार करीत आहे. इतक्यांत मसा-जी पाठीमागें येऊन उभा राहतो. त्यास पाहून. ) कोण मसाजी ? वाहावा; शाबास; योग्य वेळेवर

---

१ गुप्त. २ धनवंत. ३ ठेव. ४ स्थान.

आलास. अशासच योग्य सेवक ह्मणावें; नाहीं तर.—

### श्लोक. [ वसंततिलका ]

पाचारितां मग करें नयनास चोळी, ॥
सुप्तार्धसा[1] हळुच टेंकुनि पाणि[2] भाळीं[3] ॥
पीळी शरीर, महिं[4] जानु उठावयास ॥
टेंकी; कुसेवक न योग्य नृपालयास[5]. ॥ ११ ॥

बरें, मसा खुशाल तर आहेस?

**मसाजी.**— होय, आका, तुझ्या कृपेनें. पण कांहीं अधिकोत्तर तर नाहीं ना? नगरांत तर दाट वदंता उठली आहे.

**माया०**— काय ह्मणून?

**मसाजी.**— देशपार करणार ह्मणून.

**माया०**— कोण?

**मसा०**— कोण ह्मणजे? राजा.

**माया०**— कोणास?

**मसा०**— आपणास. आणखी कोणास?

**माया०**— आपणास? हा वेड्या; असें होईल तरी कसें? काय मी आजच रांडावल्यें?

**मसा०**—आका! पण पहा! माझें काळीज कसें उडतें आहे तें; हें ऐकिल्यापासून, माझे पाय लडलडां कांपूं लागले; तरी मी संदेवासा जीव धरून तुझे जवळ आलों, हें सांगावयास.

---

१ अर्धानिजलेला. २ हात. ३ कपाळ. ४ भूमी. ५ राजघर.

**माया०**— होय; तसें करण्याची मंत्रीलोकांनीं मसलत घाटली खरी.

**मसा०**— तर मग काय ! ते आह्मास देशपार करतील !

**माया०**— नाहीं. तेच देशपार होतील कदाचित्; भिऊं नको.

**मसा०**—( संतोष पावून ) तें कसें काय, आका, झालें.

**माया०**— कसें काय, हें काय विचारतोस ! अरे.—

**श्लोक. [ जलोद्धतगति ]**

नृपाळ- मति- नीरंगा[1] भलतसी ॥
वळे वळवित्या करीं हवितसी, ॥
परीं[2] मतरणें जरी भरविली ॥
जलोद्धत गती तसी फिरविली ॥ १२ ॥

**मसा०**— शाबास, आका. राजाचें मन आपणाकडे खरेंच वळविलेंसना ? आतां आपण परागंदा तर होणार नाहीं ?

**माया०**— आपण नाहीं होणार, पण कोणीतरी होईल, कदाचित्.

**मसा०**— वाहवा. हिलाच भगिनी ह्मणावें. ( किंचित् नाचूं लागतो. )

**श्लोक. [ पृथ्वी. ]**

असी सुभगिनी जगत्रयिं दिसे न कोणी मला; ॥
स्वबंधु पर[3]-तीरदा तरि[4] अपाय- तोयाब्धिला ॥

---

१ नदी. २ अन्यानीं. ३ परतीराला पोंचवणारी. ४ नौका.

ह्मणूं, परि तदाधिका; पवननाविकावांचुनी ॥
विहारकरि, कार्यकृत्सुगति स्वैरे पृथ्वींतुनी. ॥ १३ ॥

आज तूं आह्मांस प्राणदान दिल्हेंस. आतां माझ्या पायांस पाहिजे तितका जोर आला. हे पाहा, माझे पाय कसे मुसळाचे सरासारखे सरळ आणि धष्ट पुष्ट दिसतात ते. आतां सांगशील तर, सेनापतीची नरडी येथेंच मुरडतों.

**माया०**— मूर्खा, असा रानटी मूर्खपणा येथें कामाचा नाहीं; मी सांगत्यें इतकें कर, ह्मणजे त्याची नरडी त्वां मुरडल्याशिवाय, आपें आपच मुरडेल.

**मत्सा०**— मग तर सोन्यापेक्षांही पिवळें. हा पाहा, मी एका पायांवर तयार आहें, तें करायास. सांग लौकर.

**माया०**— राजे साहेबांनीं, पौरजनांचीं मनें सांप्रत उद्विग्न कां झालीं असें दमाजीरावास विचारलें; त्याचें उत्तर द्यावयास त्यास कांहींच सुचेना; त्याची अगदीं गाळण होऊन गेली. राजेसाहेबांचें मुख मध्याकांसारखें जेव्हां त्याणें पाहिलें, तेव्हां त्याचे डोळे जणो झांपूनच गेले; तो खालीं पाहूं लागला. अशी संधी पाहून, मी नेहमीची सलगीचीच, मला भय तें कशाचें ? लागलोच विनंती करून क्षमा मागितली, आणि सांप्रत सेनापतीनें नगरांत दंवडी फिरविली ह्मणूनच नागरिक अस्वस्थ झाले आहेत असें सांगितलें. मग काय पुसतां ? कल्पांतानलाप्रमाणें राजेसाहेब लाल होऊन मला ह्मणाले, "माये, त्या दंवडीचा कागद

---

१ वारा. २ स्वछंद.

कोठें तरी नगरांत सांपडेल, तर लौकर गुप्तपणें आणीव, ह्मणजे पहातों, कसें आहे तें. ”

**मसाजी.**— तर, तें काम माझें. हा मी असाच चाललों. पण आका, ती दंवडी राजेसाहेबांचे आज्ञेनें फिरवली होतीना ?

**मायाउ.**— छी. राजेसाहेबांस मुळींच ठाऊक नाहीं.

**मसाजी.**— तर काय. हा सर्व सेनापतीनें तोतयाच केला, आह्मांभोंवता ?

**माया०**— होय, तोतया नव्हे तर काय ? तोतयाच.

**मसा०**— मिशांवर ताव देतो. ) असें आहे तर, सेनापतीस मोठें शासन झालेंच पाहिजे; नाहीं बरें !

**माया०**— तें आपेंआपच होईल. झालें पाहिजे ह्मणावयास नको.

साकी

शासन अपराधाचे मागें नीरें जसें निम्नातें ॥
अनपेक्षित न आवर गतिनें अनलक्ष धांउन येतें ॥१५॥

**मसा०**— तें तर खरेंच; पण, त्वां मनावर मात्र घेतलें पाहिजे.

**माया०**— मेलें मनावर तें काय घेणार. तें माझे हातांतलें काम आहे. सरकार विलासाचे भरांत येतात, तेव्हां जरा जीभ हालवली पुरे; ह्मणजे झालें.

**मसा०**— तर मग, अगदीं सोपें आहे, आका. खचीत तूं तसें करच; चुकूं नको. या सेनापतीचें आणि कोतवालाचें निसंतान करून टाक.

---

१ पाणी. २ खलवटभूमी.

**माया०**— ( विनोदानें. ) कदाचित् तसें झालें, तर मग सेनेची आणि शहराची व्यवस्था पण कोण करील ?

**मसा०**— काय, आका, तुझे आह्मी सहाजण गुलाम एकाहून एक खंबीर असतां तूं असें ह्मणतीस ! जर तूं सांगशील तर आह्मी.—

### अभंग.

आकाशही आणूं गुंडाळून खालीं, ॥
बसवूंही टाळी दिग्गजांचीं ॥ १ ॥
करांजुळीं शुष्क करूं हा सागर, ॥
जिंकूं महीधर[1] पाताळींचा ॥ २ ॥
रवि शशि करूं गृहींचे दीपक, ॥
बाहुंचें कौतुक दाऊं तूतें ॥ ३ ॥ ॥ १५ ॥

( असें ह्मणून भुज थोपटून उभा राहतो आणि ह्मणतो )

### श्लोक. ( शार्दुलविक्रीडित )

राघोजीस वरूथिनीपति[2], मला पौरार्तिहंता[3] करीं, ॥
संव्हारूं त्वदरी ससैन्य अटवीं[4] शार्दूल जैसा करी[5], ॥
कामाजी सुकुमार भूपसदनीं अंतःपुरीं ठेविजे, ॥
अन्या तींसहि कार्यकार नृपतीद्वारा पुढें योजिजे ॥ १६ ॥

**माया०**— शाबास मसाजी, त्वां तर फारच उत्तम योजना केली. तुह्मी मोठे मोठे सरदार बनलां; पण, मलारे कोणती कामगिरी ! काय, मी बगीकपणाच करीत राहूं ?

**मसा०**— ( एका गालानें किंचित् हांसून. ) काय ह्मणतीस, आका ! तुला काम ! तें सांगणार कोण ? अगे,

---

१ शेष. २ सेना. ३ कोतवाल. ४ वन. ५ हत्ती.

तूं तर सर्वांची स्वामिनी; तुला नमस्कार करावयास दिवसांतून तीन वेळ आम्ही तर काय पण सर्व देवगणही येतील. मग तूं पट्टराणीच दुसरी होशील नागे ! राजेसाहेब तर तुझ्या अर्ध्या वचनांत आणि हातांत आहेतच; मग काय पहावयाचें आहे ! जिकडे तिकडे आकासाहेब आकासाहेबच होईल.

**माया॰**—तें खरें, पण; कोण जाणे काय होईल. राजा ह्मणूं नये आपला आणि साप ह्मणूं नये झोंपला. शत्रु मोठे संधानी आहेत, एकादेवेळेस भलतेंच करतील. कदाचित् आपण जें येथें बोलतों हें हळूच उभे राहून ऐकण्यास देखील चुकणार नाहींत. [ किंचित पाटमोरी फिरून ] अरे ! तो रे कोण त्या खांबाच्या मागें उभा राहून लक्षपूर्वक ऐकत आहेसा दिसतो तो !

**मसा॰**—( हळूच पुढें सरून पाहतो- ) होय आका. कोणी आहे खरा.

**माया॰**— तर मग पहातोस काय ? धांव लौकर.

**मसा॰**— मेल्यास ठारच करून टाकतों एकदम- ( असें ह्मणून आवेशानें धांवतो. )

**माया॰**—( धांवून त्याचा हात धरत्ये ) वेड्या, असें काय करतोस ? अकार्य करून काय आपला घात करून घेणार !

**मसा॰**— नाहीं आका. जशी तुझी आज्ञा.

**माया॰**— माझी आज्ञा ? तर जा लौकर; आणि दंवडीचा कागद शोध करून आण, उगाच वटवट करीत उभा राहूं नको, एकादें भलतेंच करशील.

( किंचित् सभय होऊन )

साक्या.

आणून डिंडिमपत्रा, करिं श्रेयस्कर अरिसत्रा ॥ धृ ॥
धांवा धांवा चौघेहि तुह्मी चार कोणी धांवा हीं ॥
श्रुत नाहीं जों अरिला झाला अस्मत्कृत कावा हो ॥ १ ॥
आरूढुनि संचारीं कांचीं पवनतुरंगा पाठीं ॥
मार्ग, जनालय, देहुडि, दिंडी, धुंडीं अचल कपाटीं ॥ २ ॥
आणूनि डिंडिमपत्रा, करिं श्रेयस्कर अरिसत्रा ॥ धृ ॥
लोभवुनी जन धनमानानें पूर्ण अर्थ संपादीं ॥
गुप्त दूत संयोजीं शोधा पण्यविथिकामादीं ॥ ३ ॥
आणूनि डिंडिमपत्रा करिं श्रेयस्कर अरिसत्रा ॥ धृ ॥
साग्र न लब्ध तरी शतचूर्णचि संपादुन आणा हो ॥
तोषउं दावुन रिपुकृतकलुषा मन्मोदक राणा हो ॥ ४ ॥
आणूनि डिंडिमपत्रा करिं श्रेयस्कर अरिसत्रा ॥ धृ ॥

मसा०— ( प्रणाम करून. ) हा मी चाललों आका ? तूं स्वस्थ ऐस- भिऊं नको.

श्लोक. ( पृथ्वीवृत्त. )

नभीं न करिं काळजी तव पदास वंदूनि हा, ॥
निदेशअनुवर्ति मी करिं त्वदुक्ति तथ्यीं पहा ॥
सबंधु सदनीं वनीं कुवलयीं[११] खें[१२] पाताल ही ॥
क्रमोनि जननी-पदाजवळ येतसें याअहीं ॥ २१ ॥

---

१ दवंडीचाकागद. २ शत्रूमाकरयज्ञ. ३ मसलत. ४ नगर. ५ बाजार. ६ समूह. ७ संपूर्ण. ८ अपराधरूपपाप. ९ आज्ञेप्रमाणेवर्तणारा. १० सत्य. ११ भूतल. १२ आकाश. १३ दिवसीं.

**मायाऊ.**— हळूजा- तुझा विजय असो; कृतकार्य होऊन लौकर ये. ( असा आशीर्वाद देत्ये. )

**मसा०**— तथास्तु ( ह्मणून चालता होतो. )

( इकडे दमाजीराव घाटगा खांबाचे आड राहून हें सर्व वृत्त ऐकत होता, तो घाबऱ्या घाबऱ्यानीं धांवत बोधाजी राव दाभाडे सेनापति बसले होते त्यांजपाशीं येतो. )

**बोधाजी०**— कसें काय, दमाजीराव ?

**दमाजी०**— घर बुडालें, महाराज ! ( असें ह्मणून मूर्छा पावतो- )

**बोधा०**— ( त्यास सांवरून धरतो. ) कोण आहेरे ? थंड पाणी भरून झारी आणा लौकर ! अहाहा. काय दुर्दैव हें ? अहो दमाजीराव सावध व्हा, सावध व्हा.

( सेवक थंड पाणी भरून झारी आणतो, आणि दमाजीच्या नेत्रांस लावून आंगावर सिंचन करतो. ) ( दमाजी किंचित् सावध होऊन फिरून खालीं पडतो. )

**बोधा०**— ( त्यास सावध करून ) कोण आहे रे, शमाजी पंतास लौकर बलावून आणा.

( सेवक शमाजी पंताकडे जाऊन त्यास घेऊन येतो. )

**शमाजी०**— अहो हें काय ? यांस काय झालें ?

**बोधा०**— हा दुर्दैवाचा फेरा. दुसरें काय ह्मणावयाचें !

**दमाजी०**— ( सावध होऊन वर अकाशाकडे पाहून ) हे दुर्दैवा, त्वां अशी विटंबना करावीस त्यापेक्षां एकदमच मारून टांकावयाचें होतें.

**बोधाजी०**— अहो, तुह्मी असे अधीर होऊन हें काय करितां ? झालें तरी काय तें आह्मास सांगा ? तुह्मी

मोठे धैर्यवान, राजकार्यधुरंधर असून असें करूं लागलां तर, मग कसें होईल ?

शमाजी०— हें, राजकारस्थान्यास तर अगदींच योग्य नव्हे; असें केल्यानें पुढें कसें होईल ? दमाजीराव ! अद्याप आपणास दूर जाणें आहे; असें असतां, तुह्मी एव्हांच पाय गाळतां हें काय ?

दमाजी०— सर्व होऊन गेलें- आतां व्हावयाचें राहिलें तें काय ?

शमाजी०— झालें काय तें ऐकूं द्या तर खरें ?

दमा०— आजपर्यंत राजसेवा केली त्याचा शेवट असा व्हावा काय ? अहो, या मांगिणीनें राजाचे कानाशीं लागून आमच्या चहाड्या सांगून असें करावें काय ? हा दुर्दैवा ! तूं आह्मास या मांगांचे हातानें मारविणार, आँ ! हरहर;

बोधा०— काय, ते मांग आह्मास मारणार ? कशा करितां ?

दमा०— दंवडी पिटली त्याकरितां; आणि कशा करितां ?

बोधा०— आँ, खरेंच कीं काय ? राजानें आह्मास मार ; ण्याचा हुकूम केला ?

दमा०— केला नाहीं; पण करणार.

बोधा०— हा दुर्दैवा ! ( असें ह्मणून मूर्छा पावतो. )

शमाजी.— ( त्यास सावध करून ). अहो, तुह्मी सेनापति असून असें काय करतां हें । भिऊं नका. धीर धरा, सावध व्हा.

बोधा०— ( सावध होतो. ) अहारे कर्मा !

शमा०— अहो दंवडी आपण राजाज्ञेनेंच फिरवली होती ना? मग काय?

दमा०— ( उश्वास टाकून. ) तसें असतें, तर मग इतकें कां झालें असतें !

शमा०— ( बोधाजीकडे पाहून. ) तर काय राजाज्ञेवांचूनच आपण हें वर्तन केलें?

बोधा०— ज्या पक्षीं, राज्यभार सर्वच आपणावर आहे, त्यापक्षीं करावें लागतें.

शमा०— हाँ, करावें लागतें; पण.—

श्लोक. ( उपजाति )

नृपांकितें आणि पतिव्रतेनें ॥
पतिनिदेशा[1]विण श्लाघतेनें ॥
न वर्तणें; धर्मविहीत ऐसा ॥
उल्लंघिला नीतिनिपूण कैसा ॥ २२ ॥

आणखी राजांची मनोवृत्ति ह्मणावी तर.

श्लोक. ( भुजंगप्रयात )

परस्वार्थकारी, न कांहीं विचारी ॥,
नसे स्थीर, विद्यु[2]त्परी माणदा[3]री, ॥
न कौशल्य युक्तीन राहे निवांती, ॥
भुजंगप्र[4]यातें तशी चित्तवृत्ती. ॥ २३ ॥

बोधा०— त्या सर्व गोष्टी खऱ्या; परंतु, यःकश्चित कार्यार्थही आज्ञेची अपेक्षांकरून स्वामीस श्रम देणें हें सुज्ञ सेवकास योग्य नव्हे. सेवकाचा धर्म ह्मटला

---

१ आज्ञा. २ वीज. ३ विदारणकरी. ४ सर्पाचेगमन.

ह्मणजे, परोक्ष किंवा अपरोक्ष स्वामीचें अभिष्ट चिंतावें आणि करावें, त्याप्रमाणें मी केलें. यांत मजकडून दोष तो कोणता घडला ? मंत्रीजनाचा धर्मच हा आहे.—

### अभंग.

चित्तानें चिंतावें, कायेनें करावें ॥
सचिवें सर्वभावें स्वामीहीत ॥ १ ॥
तया अनन्यासी रायानें मानसीं ॥
निज ताता ऐसी भक्ती ठेवीं ॥ २ ॥
जैसें मायोमन पाजावया स्तन ॥
याचील्यावांचून बाळीं धांवे ॥ ३ ॥
तैसें सारथ्याचें आणि सचीवाचें ॥
रथ्या नृपाळाचे हीतीं मन ॥ ४ ॥ ॥ २४ ॥

आणखीही.—

### श्लोक. ( उपजाति )

नसांगतां नेत्र हि पापण्यांसी ॥
त्या सर्वदां रक्षिति; बा, धण्यासी ॥
सत्सेवकें तेवि यथामतीनें ॥
संरक्षिजे मंत्रमनें, वपूनें ॥ २५ ॥

असें असतां, अशा सन्मार्गवर्ती सेवकाचा तिरस्कार प्रभूनें नीच- प्रेरणा- प्रकुपित होऊन केला, तर तेथें उपाय काय ?

**दमाजी.**— उपाय काय ? असें ह्मणून फळ नाहीं. कसें-

---

१ आई. २ मसलत.

ही मोठें संकट प्राप्त झालें तरी पुरुषानें प्रयत्न सोडूं नये. प्रयत्न कर्त्या पुरुषांचीं कार्यें कालें करून तरी सिध्दीस जातात. आणि जे पुरुष प्रयत्नच करीत नाहींत त्यांचीं तीं आरंभींच वितुळतात.

**शमा०**— दमाजीराव ह्मणतात हें सयुक्तिक असें मला वाटतें.

**श्लोक. ( भुजंगप्रयात )**

प्रयत्नें नरा, प्राप्त अप्राप्त होतें, ॥
प्रयत्नाविणें प्राप्त अप्राप्त हो तें, ॥
प्रयत्नें करी वन्यही जन्य होतो, ॥
जगीं मान्य ऐसा प्रयत्नज्ञ हो तो ॥ १६ ॥

**बोधा०**— तें खरें. प्रयत्नानें सर्व कांहीं सिध्द होतें; परंतु दैव अनुकूळ असलें तर. जर दैव प्रतिकूळ आहे, तर पुरुषाचे प्रयत्न सर्व निर्फळ होतात.

**दमाजी.**— होय; पण दैव अनुकूळ किंवा प्रतिकूळ; हें तरी उद्योग केल्याखेरीज कसें समजेल ?

**बोधा०**— आतां समजणार तें काय ? समजून चुकलें. जो प्रयत्न आह्मी विहित ह्मणून केला, आणि त्याचा परिणाम हा असा भयंकर पुढें उभा दिसतो; याजवरून आपणास दैव अनुकूळ किंवा प्रतिकूळ हें स्पष्ट दिसतें.

( जसा! )

**ओवी.**

नर दुर्भग[1] क्षुधे पीडिला, मृगयार्थ अटवीं[2] निघाला, ॥

---

१ दुर्दैवी. २ अरण्यांत.

अंगणींच चरणीं रूतला, कंटक प्रतिकूळ दैव जया ॥२७॥
तृषार्ती शमना लागीं, मृग धांवत तडागीं ॥
तों दावानळ अग्रभागीं, ग्रासी प्रतिकूळ दैव जया ॥ २८ ॥

**शमा०**— होय, पुरुषास कृतोद्योगाचें फळ व्हावयाचें, तें कदाचित् उद्योगारंभींच सूचित होतें.

**दमा०**— हें तुमचें बोलणें सर्व पोकळ- यांत कांहीं जीव नाहीं. अहो, जे भ्याड, अशक्त, आळसी, त्यांणीं हे असे विचार करून कपाळास हात लावून रडत बसावें. जे बुद्धिमंत आणि विमलकीर्तिरूप ध्वज उभवूं इच्छिणारे, ते तर, आपला सदुद्योग कधींही सोडीत नाहींत- कां कीं—

### श्लोक (शिखरिणी)

अनुद्योगी रोगी सतत मनशंकीत नर ते ॥
परापेक्षी दैवागत अशन भक्षून करते ॥
स्वकाळक्षेपातें कधिं न वरती कीर्ति कमळा ॥
सदां सेवूनीयां असति अघदैन्योद्भव मला ॥२९॥

ह्मणून-

### श्लोक. (स्रग्धरा.)

श्री विद्या शुद्ध कीर्ती सुख विपुलधन स्त्रीसुतादी गृहातें ॥
यानां, मानोपणातें, जय रुचिरें अलंकार सद्विग्रहातें ॥
दाता क्षोणीपतित्वा, अनुपम फलदोद्योग विश्वास देव ॥
अस्म त्स्वांतेंमिता तो पुरविल भजतां त्यास आह्मी सदेवं॥३०

१ तळें. २ वणवा. ३ लक्ष्मी. ४ वाहन. ५ सुंदर. ६ शरीर. निरंतर.

( इतक्यांत पडद्या आंत गंभीर ध्वनि होतो.

अहो सूरिजनहो! तुह्मी राजनीतिनिष्णात असून, असे केवल अबलांसारखे कपाळास हात लावून रडत कां बसलां? तो दुष्ट दुरात्मा तुह्मास अपकार करावयासाठीं तुमचें दंवडीपत्र आणावयास गेला आहे. हें तुह्मांस अवगत आहेना? कदाचित् तो कृतकार्य होऊन आला, तर मग, तुमची दशा काय होईल? तुह्मी कुठे लपाल? काय कराल? तुमच्या ह्या शुष्क कल्पना कांहींतरी तुह्मांस कामीं येतील काय? तर, उठा; त्वरा करा. आणि कोणीतरी नगरांत संचार करून त्या दुष्टाचे परिश्रमास अपकार करा—

[ सर्व कान देऊन ऐकतात. ]

बोधा०— हा कोणाचा बरें ध्वनि असावा? दमाजीराव जें कांहीं ह्मणतात, त्यास अगदीं अनुलक्षून आहे.

शमा०— होय, कांहीं भाग्योदय होण्याचें चिन्ह दिसतें खरें.

दमा०— ( पडद्याकडे पाहून. ) अहो! हे आपले विचारराव येत आहेत.

शमा०— आँ; खरेंच का.

बोधा०— ( किंचित् सभय होऊन. ) तेचना [1] पहा नीट; नाहींतर—

( नंतर विचारराव येतो. )

विचार०— साकी.

कां कंपित साशंकित होतां क्षेम पुसाया आलों ॥

वार्ता अरुचिकर ऐकुनियां चित्तीं फारचि भ्यालों ॥ ३१ ॥

---

१ वाईट.

बोधा०— अहो, हे तर खरेच आपले विचारराव.

दमा०— अहो यावें, यावें. शाबास, धन्य आजचा दिवस, कीं तुमची भेट झाली.

शमा०— ( विचाररावाचा हात धरून, ) स्वस्ति क्षेम आहेना ?

विचार०— बोधाजीराव कुशल असले ह्मणजे, आह्मी क्षेमरूप आहोंच.

शमा०— त्यांला तर कुशल आहे. येथें ते आपली मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत.

विचार०—(बोधाजीरावाचे सन्निध जाऊन प्रणाम करून) खुशाल आहांना ?

बोधा०— मला कुशल आहे, तुमचे आगमनानें.

विचार०— असें कां ह्मणतां, बोधाजी राव ?

बोधा०— नाहीं तर, राजसेवकांस कुशल कोठून असणार ?

### श्लोक. ( उपजाति. )

राजाश्रिताचें अणि तस्कराचें[1] ॥
पलार्ध हो जीवित नाहिं साचें ॥
नदीतटीं झाड जसें उंसाचें ॥
पडे शरें जीवित पाडसाचें[2] ॥ ३२ ॥

विचार०— तें तर खरेंच. परंतु, जसें कमळिणीचें पत्र कर्दमजळीं असून लिप्त होत नाहीं तसे, आपणासारिखे सुज्ञ पुरुष राजसेवा करून तद्बाधक क्रियेपासून अगदीं अलिप्त असतात.

बोधा०— ( डोळ्यांत आंसवें आणून. )

---

१ चोर. २ हरण.

श्लोक.

अहाहा रे दैवा पहसि आमुचा अंतच कसा ॥
तुझ्या नैष्ठुर्यांची करि न गणना कोणि सहसा ॥
( इतकें ह्मणून मूर्छा पावतो. )

विचार.- सावध व्हा, बोधाजीराव, सावध व्हा; धैर्य धरा.
( असें ह्मणून त्यास सावध करितो. )

बोधा०— ( सावध होऊन उत्तरार्ध ह्मणतो. )
सुधीपान्यां मृत्यू अमरपण देशी गरपित्या ॥
स्वलीलेनें कालास हि नमन तूतें दरपित्या ॥ ३२ ॥

दमाजी.— दैव अनुकूल अथवा प्रतिकूल हें, अभ्रच्छाये-सारखें असतें.

विचार. — होय. ज्याप्रमाणें रात्रीमागें दिवस येतो आणि दिवसामागें रात्र येती, त्याप्रमाणें सुखामागून दुःख आणि दुःखामागून सुख, हीं स्वाभाविकच येत असतात.

बोधा०—सुख किंवा दुःख प्राप्त होईल तें, पुरुषास अवश्य भोगणें आहेच; परंतु, प्रभुचरणाचा आश्रय केला त्याचा असा परिणाम व्हावा काय ? ह्या नटकीच्या सांगण्यावरून सर्वज्ञ प्रभूच्या मनांत आह्मांविषयीं इतकें वैमनस्य यावें काय ?

( उस्सास टाकतो.)

विचार.— हा प्रभु सर्वत्र समदृष्टा आहे. याच्याठायीं भेदाभेदच नाहीं

श्लोक. ( भुजंगप्रयात )

न उच्चत्व नीचत्व मानापमान ॥

---

१ अमृत पिणारा राहु. २ विष पिणारा सांब. ३ भय देणारा.

सुर्वक्तृत्व मौनत्वं ही त्या समान ॥
शुची निष्कलंकी विरागी उदासी ॥
चमूस्वामि त्या सारखीं आणि दासी ॥ १४ ॥
जसें काचपात्रामध्यें कृष्ण नील॥
दिसे भिन्न रंगी सुपानीय लोल ॥
तसा भूपतीसंसृतीसंग मात्र ॥
सुखासूखआभास लोकांस पात्र ॥ १५ ॥

याजकरितां, बोधाजीराव, आपण आतां औदासीन्य सोडून द्या, आणि, तो दुष्ट ज्या शोधार्थ गेला आहे, त्याचा मुद्दाच नाहींसारखा करून टाका. मी सर्वदां राजसेवातत्पर आहें- तेथें सर्व तजवीज सुविचारानें होईल. समजलां ? त्वरा करा.

**बोधा०**— फार उत्तम- आपले येण्यानें आमचे प्राण प्रस्तुत तर वांचले. ( दमाजीस हांक मारतो. )

**दमा०**— हा मीं जवळच आहें. आज्ञा मात्र असावी.

**बोधा०**— विचाररावांनीं सांगितल्याप्रमाणें तजवीज लौकर झाली पाहिजे, ह्मणजे आपले प्राण बांचले असें समजूं.

**दमा०**— आज्ञा महाराज. हा मी स्वतःच जातों त्या कामास; आणि त्याचा गळाच कापून टाकतों परता- मग, मुद्दा मुळींच गेलासा होईल कीं नाहीं ?

**बोधा०**—दमाजीराव, तुह्मी चुकतां. असें केलें तर, आपण स्वामिद्रोही होऊं.

---

१ बोलकेपणा. २ मुकेपणा. ३ सेनापती. ४ काळें. ५ पाणी. ६. कारण.

दमा०— यांत स्वामिद्रोह तो कशाचा, त्या दुष्टाचा गळा कापला ह्मणून ?

बोधा०—स्वामिद्रोह कशाचा ? अहो, तो जरी दुष्ट आणि अपकारी आहे तरी० स्वामिसेवक असून निदेश पावून स्वामिकार्याकरितां जात आहे, त्या पक्षीं त्याचा घात केला तर आपण स्वामीचा आज्ञाभंग आणि द्रोह या दोन्हीही दोषांस पात्र होऊं.

## आर्या.

आज्ञाभंग प्रभुचा, तद्वध समदोष जाण करत्याला ॥
नृवरद्रोही भोगी, सद्यचि शासन अघोर नरकाला ॥३६॥

दमा०— जर असें आहे, तर जशी आज्ञा होईल तसें.

बोधा०— जी दंवडी आपण नगरांत फिरवली, त्याविषयीं कागद चवाठ्यावर वगैरे चिकटवलेले असतील, ते नाहींसे करून टाकले ह्मणजे आपेंआपच मुद्दा नाहींसा झाला.

शमा०— वाहवा ! ही मसलत मात्र उत्तम खरी. गळा कापला की खोकला गेला.

दमा०— जी आज्ञा; तसें करण्यास हा मी स्वतःच चाललों ( असें ह्मणून निघून जातो ).

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो. )

अहो विचारराव, आपले श्रीमन्महाराज शिवाजी राजे कांहीं नाजूक आणि गुप्त मंत्राकरितां तुह्मांस बलावीत आहेत, तर चलावें सत्वर.

विचार०— काय ? राजेसाहेब मला गुप्तमंत्राकरितां बोलावतात ? असा गुप्तमंत्र तो कोणता असावा बरें ?

( पुनः शब्द होतो. )

दिंडी.

नगरवासी अस्वस्थ लोक सारे ॥
कासयासी सैन्यादि हे पसारे ॥
काय कीजे न्हायांस जनपदांसी ॥
सुखी ऐसें योजीत नृपउदासी ॥ ३७ ॥

विचार०— तर, आतां आज्ञेप्रमाणें लौकर गेलें पाहिजे.

(असें ह्मणून, निघून जातो.)

(इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो.)

अरे! त्वां आजपर्यंत आपले कुशाग्र आणि कपट-बुद्धीनें जो जो आह्मास अपकार केला, त्यांच्या स्मरणें करून अत्यंत क्रुद्ध झालेला असा हा मी सायुध रणांगणीं तुझें उसणें फेडायास आलों- तर आतां लंडीपणा सारखा पळून जाऊं नको, उभा राहा.

श्लोक. [ स्रग्धरा. ]

मंत्रें भोंदून राजा मम अनुजें सखे धाडिले त्वां वनासी ॥
मिथ्यारोपून दोषा कपटभय गुहीं घातियेलें जनांसी ॥
अस्मत्प्राणापहारा नगरित दंवडी त्वांचकीं नादंवीली ॥
आतां माझ्या करें घे तव निधन विधी सांगतों अंतराळीं॥३८

(सर्व कान देऊन ऐकतात, आणि भयभीत होऊन ह्मणतात.)

काय हो हें अरिष्ट ओढवलें! हा असा भयंकर आणि उद्धत भाषण करीत कोण येत आहे बरें?

(फिरून शब्द होतो.)

---

१ प्रजा. २ मसलत. ३ भाउ. ४ पिटवली. ५ मृत्यु. ६ दैव. ७ आकाशी.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

जो मानसीं विहरि चारे जयास नाहीं ॥
तीं लोकिं ही विकृतिकार सुरांसुरांही ॥
वेडावतो निमिष दांउनियां स्वलीला ॥
तो पुष्पचापं अरिमर्दक हा कि आला ॥ ३९ ॥

शमा०— अहो तोच हा; आला हो आला घातकी.

बोधा०— कोण ?

शमा०— हा क्रूरकर्मा पेंढारी, जो निमिषार्धांत हजारों प्राणी, जसा पारधी मृग विंधितो तसा संहार करणारा; हातांत धनुष्यबाण घेऊन मळयानळासारखें ज्याचें मुख आणि डोळे, असा हा हिकडेसच येत आहे असें वाटतें, आतां, धडगत दिसत नाहीं.

बोधा०— कोण, कामाजी नाईक ?

शमा०— होय; तोच चांडाळ.

श्लोक. [ वसन्ततिलका.]

जो दर्शनें सुकृतें वित्त समग्र हारी ॥
जो मीनकेतु परि विश्व जया अहारीं ॥
गेलें जिरोन बलियांस हि जो न मोजी ॥
भूपां रतिप्रिय जया ह्मणती नमोजी ॥ ४० ॥

बोधा०— अरे रे ! आह्मी केलेली गुप्त मसलत याला समजली तर नसेल ना ?

शमा०— समजल्यावांचून तो अशीं छप्पी, आणि उद्दामपणाचीं भाषणें, कधींही करणार नाहीं.

---

१ संचार करी. २ बंधन. ३ काम. ४ शत्रु. ५ पुण्य. ६ हरणकर्ता.

बोधा०— तसें ह्मणूं नका. जो स्वाभाविकच क्रूरकर्मा, त्याचीं भाषणेंही तदनुरूपच असतात.

शमा०— होय, हा क्रूरकर्मा तर, जगजाहीरच आहे. आणि आपणापासून आजपर्यंत सर्व सोसलेले अपकार त्याणें उच्चारून दाखविले; याजवरून मला वाटतें, तो घातकी या समयीं काय करील याचा भरंवसा नाहीं. याजकरितां, आपण येथून क्षणभर एकीकडे जाऊन बसावें, हें बरें.

बोधा०— या वेळेस त्याला पराङ्मुख व्हावें, तर लोक काय ह्मणतील तें पहा आधीं; नाहीं तर, आपण या कीं हो कमर बाधूं ? काय आमच्यानें त्या चोरास शासन नाहीं करवणार ?

शमा०— तो चोर कसा ? राज्याधिकारी आहे; कदाचित्, राजाज्ञेनेंच आला असला, तर मग ?

बोधा०— ( घाबरतो ). तसें असेल तर मग कठीण.

( इतक्यांत पडद्यापलीकडे भयंकर शब्द होतो. )

अहो, सैनिकादि प्रधानमंडळी! आतां तुह्मी कोठें लपाल? तुह्मी चांगले सांपडलां. असूया आणि कृत्रिमरूप पडदा, ज्याचे आश्रयानें तुह्मी लपत होतां तो, उडून गेला. आतां, वांचण्याची आशा वृथा कशास बाळगतां ? अहो, आजपर्यंत राजाच्या आज्ञेवांचून जीं जीं आह्मास अपकारकारक कृत्यें केलीं आहेत, तीं सर्व उघडकीस येण्याचा समय आला आहे, आणि त्यांजविषयीं निःपक्षपातानें न्याय होणार. पहा, ही जी दंवडी तुह्मी नगरांत फिरवून जनपदांस भीतिरूप आणि राजास संशयरूप समुद्रांत टाकलें; ती उपलब्ध झाली. तुह्मी आह्मांस जो प्रतिकार

करण्यासाठीं कोतवाल आज्ञापिला; तो तर या लोकीं नाहींच; पण, तुह्मांकरितां जागा पाहण्यास परलोकीं गेला. आणि तुह्मीं उदयीक सूर्योदयीं त्यास भेटावयास जाल- काळजी करूं नका.

( हें ऐकून बोधाजी आणि शमाजी अत्यंत घाबरतात.

शमा०— आहारे, विपरीतगतिदा दैवा ! शेवटीं, त्वां इतक्या पल्यावर गोष्ट आणली, आँ !

बोधा०— अहो दमाजीराव ! हें काय केलें ! शत्रूंच्या. हातांत मला एकट्याला देऊन तुह्मी परलोकास गमन केलें; आतां, मी काय करावें ? कोठें जावें ! ( असें ह्मणून मूर्छा पावतो. )

शमा०— ( त्यास सावध करतो, परंतु सावध होईना असें पाहून त्यास उचलून एका अश्वत्थवृक्षाचे निबिड- छायेंत सीतळ मंदवायु वाहात होता, तेथें घेऊन जातो. ) कोण आहे रे ! गार पाणी घेऊन या, लौकर. ( हिकडे तिकडे पाहून. ) जवळ कोणीच नाहीं काय ? अरे कर्मा ! [ असें ह्मणून, आपण स्वतः जाऊन आंगावरचा चंदेरीशेला पाण्यानें भिजवून आणून बोधाजीचे मस्तकावर आणि ह्र्दयावर ठेवितो. ] बोधाजीराव सावध व्हा; सावध व्हा;

श्लोक. [ शिखरिणी ]

जसे गेहा स्तंभ प्रभुसहित आह्मा तुह्मि तसे ॥
सुजन्या सौख्याचे तरु- फलद मेघांबु कण से ॥
नका दावूं ऐसी अपरिहर लोकां मति गती ॥

---

१ घर. २ वृक्ष. ३ फल देणार. ४ तुषार.

अमित्रां दे तोषा स्वजननयनां जी रडविती ॥ ४१ ॥

( ढळढळां रडूं लागतो. )

**बोधा**.—( सावध होऊन. ) अहो दमाजीराव ! कोठें गेलां ? मला टाकून एकट्यानें जावें, हें तुम्हांस योग्य नव्हे. जावयाचें होतेंच तर, आपण दोघेही बरोबर गेलों असतों. [ असें ह्मणून शोक करतो. ]

## साक्या.

मित्रवर्य नृपकार्यधुरंधर कां ऐसा रुसलासी ॥
टाकुनि मातें परलोकातें एकाकी गेलासी ॥ १ ॥
अमित्रदमनीं मर्द भो परी आजि कसें हें झालें ॥
अश्रुत दर्दुरबाळें पन्नगमस्तक विदीर्ण केलें ॥ २ ॥
परि दुर्दैवें फोल बोल तो साच आज केला कीं ॥
अहहा प्रखरकराला कैसा ध्वांत सकीरण झांकी ॥ ३ ॥
तुजवांचूनी शून्य भासतें लोकत्रय हें मातें ॥
एकवेळ ये संगें दोघे साधूं निज नेमातें ॥ ४ ॥
हास्ययुक्त निजआस्य दाखवीं विधुहुनि सीतलकारी ॥
जें प्रभुहितकर- भाषण करितें प्रकुपित रिपुसंव्हारीं ॥ ५ ॥
बा रे आलिंगन देऊनियां शांत करीं ये दाहा ॥
कैसें संचित हें ओढवलें कायकरूं मीं आहा ॥ ६ ॥
अहहा दैवा तव निष्ठुरते हालाहल ही लाजे ॥
जें सह्य श्रीशंभुस परि तूं असह्य सकळांला जें ॥ ७ ॥ ४८॥

( याप्रकारें शोक करून ढळढळां रडतो. )

---

१ शत्रु. २ एकटा. ३ बेडूक. ४ सर्प. ५ सूर्य.
६ अंधार. ७ तोंड. ८ विषविशेष. ९ सोसण्यास योग्य.

( इतक्यांत मोहनाजी तापसाचा वेष घेऊन येतो आणि एकटाच आपणाशीं औदासीन्य दर्शित बोलतो. )

अहहा! कायहो ही काळगति, किती विलक्षण आहे ! पाहा, जो साधुमानसमराळ, जो आनंदवनवसंत, जो तापसांला संतोषघन, त्याजवर असा प्रसंग यावा काय ! ज्या वृक्षाच्या शीतळ आणि सुखकारक छायेच्या आश्रयरूप आरामवाटिकेंत विश्रांति घ्यावी, अशा अत्युत्कंठेनें हा तापसी आला असून त्या वृक्षाचें समूल उन्मूलन होऊन याचा असा आशाभंग व्हावा काय ? ( कान देऊन ऐकलेंसें करून.) पण, हा रोदनाचा ध्वनि कोठून येत आहे बरें ? अरेरे ! कोणी खरोखरच रडत आहे खरा. पाहा, जसा ऊंस चरकांत घातला ह्मणजे त्याजपासून भयंकर ( करकर ) असा ध्वनि निघतो; तसा हा कोणीतरी सत्पुरुष दुर्दैवाच्या चक्रांत सांपडल्यामुळें एवढया रात्रीं येथें रोदन करीत असावा, असें वाटतें. पण, कदाचित् हें आपणावर तर येणार नाहींना ! कांकीं हें काळचक्र सर्वदां कुलालचक्राप्रमाणें फिरतें आहे; बाबा, आपण येथून दूर जावें- ( मागच्या पायीं जरा मागें सरून मातक्यान ) अरे ! हें काय करितों ! केवढा हो हा मोह; मी तापसाचा वेष तरी कशासाठीं धारण केला, जर माझ्यानें अशा दुःखेंकरून तापलेल्यांस गंगोदकसम शीतळ शब्दांनीं यथामति कुशल विचारून शांत करवत नाहीं तर !

### श्लोक.

आपगासीतलांबूनें छायेनें पादपोत्तम ॥

---

१ नदी. २ वृक्ष.

हरीती परतापां वांगमृतं मुनिसत्तम ॥ ४९ ॥

( असा, मोठ्यानें बडबडत जेथें बोधाजीराव आणि शमाजीपंत बसले होते, तेथें त्यांच्या समीप जातो, आणि त्यांस विचारतो. ) कोणरे, बाबा तुह्मी, एवढ्यारात्रीं कशाकरतां येथें रडत बसलां ?

बोधा॰ शमा॰—( अश्रुनीर पुसून ) यावें मुने; आज आपण अशा प्रसंगीं आह्मावर कृपा केली, हें आमचें परम भाग्य.

तापसी.—प्रसंगानुरूपच आलों खरा; नाहींतर, कोठून येणार ?

शमा॰—हे तपोनिधे, असें कां ह्मणतां ? हें राज्य आपल्या सारख्यांस सुख होण्यासाठींच आहे.

बोधा॰—या राज्यांत आपल्या सारख्या तपोनिधींचें वास्तव्य सदैव असावें असी प्रभूची उत्कंठा आहे.

तापसी.—( आपणासीं ) यांस बराच विश्वास येत चालला असें दिसतें- तर आतां, आपण आपला काय साधण्यास आळस करूनये- ( बाहेर ) प्रभूची उत्कंठा होती असें ह्मणा- पण, आहे असें अगदीं ह्मणूं नका.

बोधा॰—भगवन्, शिवाजी राजा खरोखरच साधुप्रिय आहे, बरें.

शमा॰—हे मुने, आमचा प्रभु केवळ साधूंचा पोषकच आहे.

---

१ वाणी.

नें कसा पाहवेल ! मुळींच तेथें उभें देखील राहवेना; ह्मणून अरण्याची वाट धरिली आणि येथें आलों. इतक्यांत रोदनाचा ध्वनि कानीं पडतांच पुढें पाउल देखील घालवेना. अंतःकरण अगदीं दयेनें भरून आलें, ह्मणून पाहूं लागलों, तों ( उस्सास टाकुन- ) तेच तुह्मी येथें शोकग्रस्त बसलां हें पाहाणें माझे कपाळास आलें; याहून आह्मा तापसांस दुसरें अधिक दुर्दैव तें कोणतें ? ( कपाळास हात लावतो.. ) अरे कर्मा, हें पाहणें माझे कपाळास आणिलेंसना ? ( इतकें बोलून अगदीं खिन्न झाल्यासारखें दाखवितो. )

**बोधा० शमा०**— ( गहिंवरून तापसाचे पायांस मिठी मारतात- ) हे भगवन् ! आतां आह्मास ह्या चरणांवाचून दुसरा तरणोपाय नाहीं.

**तापसी.**— अरे दैवा, आतां काय करावें ! अरे, आह्मी तापसी परमार्थसुखाचे दाते आहों खरे, पण, या राजाचे जुलमाचें निवारण करण्यास, काय आह्मापाशीं शिवबंदी आहे !

**बोधा०**—हे मुने, आपण परलोकाचे मार्गदर्शी आहां; तर, या अपवित्र मरणापासून जो दुर्गति प्राप्त होणार, ती चुकविण्याचें साधन सांगून सन्मार्गास लावणार आपण समर्थ अहां.

**शमा०**— आपण कृपाकरून आह्मांस अपूत मरणरूप समुद्रांतून पारत्रिक परतीरास पोंचविण्यास नौका दाखविली पाहिजे. यासमयीं आपले सारख्या सत्पु-

श्याचें दर्शन झालें, हेंच भावी भाग्याचें सुचिन्ह आहे.

तापसी.— अरे, परलोक तर आमचें वतनच आहे. तेथें, आह्मी कोणास ही नेऊन सुखी करूं, परंतु, बाबा, या राजाज्ञेच्या पाशांतून सुटण्यास ह्मणाल तर, एकमात्र उपाय आहे. त्याशिवाय दुसरा कांहीं आमचे हातांत नाहीं.

बोधा०— हे प्रभो, जो उपाय आपण अनुग्रह करून सांगाल, तो या मंदभाग्यांस या अशा विपदार्णवांत तरणोपायच होईल.

शमा०— स्वामिन्, आतां अनुग्रह झालाच पाहिजे.

तापसी.— आह्मां तापसांस कोणाचीही प्राणहानि करण्याचा उपाय सांगणें ह्मटलें ह्मणजे अयोग्यच. परंतु तुह्मी दुःखार्त आणि मोक्षेच्छु असून विचारतां ह्मणून मात्र सांगतों.

### श्लोक. ( पृथ्वीवृत्त. )

अपूत[1] मरणाहुनी हुतवहीं[2] स्व कायाहुती ॥
समर्पुनि शुचिष्मती[3] त्वरित मोक्ष ही पावती ॥
चुके वपुविटंबना अशुचि[4] हातिं होणार जी ॥
बुधोक्त[5] अशि युक्ति ही विपदिं सेविती चार जी ॥ ५० ॥

बोधा०— धन्य आमचें भाग्य, कीं आज आपलें अनायासानें येथें आगमन होऊन आह्मांस सन्मार्गदर्शी झालां.

---

१ अपवित्र. २ अग्नि. ३ पवित्र. ४ अपवित्र हातानें. ५ श्रेष्ठानी सांगितलेली.

तापसी.—अहो, जें आह्मांस अवश्य कर्तव्य, त्यापेक्षां मी यांत कांहीं अधिक केलें असें नाहीं.

शमा०— हे साधो, आपला संचार परोपकारार्थच आहे.

तापसी.— यांत परोपकार तो कशाचा? हें आमचेंच कार्य आहे- ( आपणासीं. ) अरेरे, घात केला- ( जिभेस कुरचा घेतो ) आह्मा सारख्या तापसांचें.

शमा०— ( बोधाजीरावास ) महाराज, काष्ठराशि करविण्यास आज्ञा सांगावी. आतां विलंब करून फळ नाहीं.

बोधा०— होय, विलंब कशास पाहिजे- कोण आहेरे, लौकर काष्ठराशि तयार करा.

शमा०— महाराज, येथें परिचार कोणीच दिसत नाहीं- आज्ञा होईल तर स्वतः मीच काष्टें सांचविण्यास जातों.

बोधा०— कायहो ही दैवगति ! ज्याच्या आज्ञेनें सर्व राज्य चालणार, त्याजपाशीं अशा प्रसंगीं एकही परिचार असूं नये काय ?

## ओव्या.

ज्याणे संतर्पिलें विप्रांलक्षां, नमिळे तयामुष्टि भिक्षा ॥
प्रारब्ध करी जैं उपेक्षा, तैं सहजची घडे ऐसें ॥ ५१ ॥
जो अर्बुदसेनानायक, तया व्हावें लागे पायीक[1] ॥
उपेक्षाकरी प्रारब्ध एक, तैं सहजची घडे ऐसें ॥ ५२ ॥
सेवा तत्पर जन कोटी, शोधितां नये एकही दृष्टी ॥
जैं प्रारब्ध करी पाठी, तैं सहजची घडे ऐसें ॥ ५३ ॥

---

१ पादचारी.

( शमाजीपंतास ) आपण स्वतःच श्रम घेतले पाहिजेत. विलंब केल्यानें, कदाचित् दुसरें एकादें विपरीत होऊं लागेल.

तापसी. —( आपणाशीं ) आतां मात्र आपला मतलब चांगला साधला. हे दोघेही, आपेंआपच जळून मरती-ल. मी जरा एकीकडे जाऊन पाहा कसा काष्ठराशि करून अग्नि प्रदीप्त करतों तो. ( बाहेर ) आतां, मी येतों. आह्मा सारख्या तापसांनीं येथें राहणें नीट नव्हे. ( असें ह्मणून निघून जातो. )

शमाजी.—( बोधाजी रावास. ) रावजी, हा मी काष्ठराशी करावयास जातों. पण पाहा, माझा उजवा डोळा लवतो; हा कांहीं शुभ सुचवितो असें वाटतें.

बोधा॰— जा; त्वरा करा. हा मीही, सुस्नात शुचिर्भूत होऊन येतों. ( असें ह्मणून उदकतीरीं जातो आणि तेथें प्रज्वलित झालेला हुताशन पाहून ह्मणतो ) पहा, हा वैश्वानर मला कसा बोलावितो आहे, तो.

श्लोक. ( वसंततिलका. )

विप्रां करें धन- प्रति- ग्रहणार्थ बाही ॥
जैसा उदार मज आत्मिय ज्वालेंबाहीं ॥
वन्ही करोनि वर बोलवितो पहा हा ॥
हे धन्य भाग्य मम वानु किती अहाहा ॥ ५४ ॥

( शमाजी पंतास हांक मारून. ) अहो, संपूर्ण जगता-स पूत करणारा, हा वैश्वानर आपले ज्वालारूप हात वर

---

१ बोलावी २ ज्वालारूप हातानी.

करून आपणास लौकर बलावितो आहे; तर, स्नान करून या लौकर इकडे.

शमा०— हा मी असाच आलों. अहो, आपण स्वामिकार्य तत्पर जे ते सदा पूतच आहों; आणि सुस्नात काय व्हावयाचें? हा प्रत्यक्ष हुताशन पाहा कसा आपण पूत ह्मणून आपणास आमंत्रीत आहे, तो.

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

आत्मज्ञान- सुआपगा[1] हिजमध्यें हें सत्य पाणी वसे
सच्छीलें[2] सुघटें तटें मिरवती ऊर्मीदया जे असे
जो सुस्नात अशांत होउन बसे त्या अन्यपाणी कशा
स्नाना जें मळतें मळें करुनिया स्पर्शों न आह्मी तशा ५५

बोधा०— तर मग, हा मी पहिल्यानें आपला काय अग्नीला अर्पण करितों.

शमा०—महाराज, जरा धीर धरा; आपण असें शरीर जाळणें योग्य नव्हे. तर समंत्रक अग्निप्रवेश करणें योग्य; तो मी पहिल्यानें करतों आणि आपण मागाहून करावा.

बोधा०—छी छी! असें नाहीं. मी अगोदर दमाजी रावास भेटावयास जातों. मागाहून तुह्मी यावें.

शमा०—(ढळढळां रडतो.) हे अग्निनारायणा, ज्याच्या पराक्रमें करून हें राज्य अकंटक चालत आहे; ज्याच्या सामर्थ्याचे योगें करून सकल देवांस त्रैलोक्य अभिवंदन करीत आहे, तो हा बोधाजीराव; जो, शिवाजी राजाचा सेनापति, तो अकृत्रिम निर्दोषी असून आ-

---

१ गंगा २ चांगलेंशील ३ लाटा.

पला काय तुला अर्पण करीत आहे, याचें संरक्षण कर.

( असें ह्मणून वर आकाशाकडे पाहतो. )

( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठा भयंकर गलबला होतो. )

**शमा०—** ( अत्यंत भयभीत होऊन बोधाजी रावास ह्मणतो.) बोधाजीराव, त्वरा करा. हा मोठा भयंकर गलबला त्याच दुष्टाचा आहे, असें वाटतें. तर, तो चांडाळ येऊन पोंचला नाहीं तों आपण अग्निप्रवेश करावा.

**बोधा०** [ अगदीं घाबरतो, आणि अग्नीच्या सन्मुख हात जोडून उभा राहतो ]

## पद. ( रागसोनी. )

हे प्रभो नित्य निरामय मातें अवसरीं या न उपेक्षीं रे. ध्रु०
ये करुणांबुघना अनावरत[1] वर्षत चातकपक्षी रे
हामि पिपासापीडित तळमळि तव आगमनानुलक्षीं रे. १
दीनदयाल कमलायतलोचन कांसव- दृष्टीनें लक्षीं रे
अंडज मी तव पक्षिणि तूं मज पोषवि स्वीय गे पक्षीं[3] रे २
श्रांता मला विश्रांतिस बैसवि कृपा कटाक्ष कक्षीं[4] रे
कालहि शक्य न पाहाया जैं जनां रविदास- प्रभु- पक्षी रे ३

(शमाजीपंतास.) अहो! जरी, मी हा मार्ग अवलंबन केला तरी प्रभुचरणाची भक्ती माझ्या अंतःकरणांतून अगदीं दूर होत नाही; तर, तुह्मी कृपाकरा आणि माझे अनुयायी होण्याअगोदर राजास माझा इतका शेवटचा निरोप सांगा.

## श्लोक. ( शिखरिणी.

निघेना आझूनी तव चरणकंजीं हरपली ॥
मदीया राजेंद्रा मनभ्रमरि काया करपली ॥

---

१ अनिवार २ लाहान ३ पंख ४ गवस.

जरी वन्ही माजी तरि ह्मणुनि कारुण्य लहरी
असापन्न्या ठेवीं सुखद करुणाकोशकुहरीं ६७

शमा.— अहो बोधाजीराव, मी आपला जरी आज्ञानुवर्ती आहें, तरी मला क्षमा करा. माझ्यानें आपल्या पाठीमागें एक निमिषभरही काळ कंठवत नाहीं. तर, कृपा करून मला आपल्याबरोबर घेऊन जा. आपण उभयतां समागमें जाऊं. (टपटप अश्रु ढाळतो.

(इतक्यांत पडद्यापलीकडे गलबल्यानंतर मोठा शब्द होतो.

अहो, राजसभासदानो, पाहा, ज्यास शत्रूंनीं विटंबना करून जिवंत मारून टाकण्याची मसलत केली असून जो जिवंत राहिला; जो, रिपुकरिसमूहशार्दूल, जो सकल लोकांस नियमन करणारा, तो हा शत्रूंच्या कृत्रिमकृत कलुषसंकटसमुद्रास्मत स्वबाहूंनीं पोंहून सुखोन्नतपरतोरामत पावला होत्साता येत आहे तर, उगाच घाबरूं नका. जर, तुह्मां कोणास बोधाजीराव दाभाडे सेनापति कोणे ठिकाणीं आहेत तें ठाऊक असेल तर सांगा. त्यांच्या खुणा विचाराल तर आणखी कोणत्या सांगूं? जें मुख्य उपलक्षण आहे, तें सांगतों.

## ओव्या.

आवांकूनी गुप्त भेद- मंत्रा, संव्हाराया साही-अमित्रां ॥
आरंभिलें डिंडिमसत्रा, ज्याणें जो प्रभुप्रियतम ॥ १ ॥
जो कामाजीचा वैरी, ज्याणें राघोजीस बाहेरी ॥
दवडून काननी थोरी, लोकांमाजी मिरवली ॥ २ ॥

---

१ योजून. २ षड्रिपु.

उन्मूळाया मूळमाया, ज्याचे मनीं सदां असूया ॥
त्याचें समाधान करावया, इच्छितसें मी यथेच्छ ॥ ३ ॥
अशा लक्षणीं युक्त तो जी, वरूथिनी- पती बोधाजी ॥
दाखवून आशा माजी, सफळ करा कोणी हो ॥४॥ ॥६१॥

शमा०— अरे कर्मा, काय संकट हें ! अहो बोधाजीराव, आतां काय पाहातां ? उठा लौकर. हा पाहा, तो दुष्ट दुरात्मा कामाजीनाईक; अहो, हा इकडेसच येत आहे. आतां, आपली दशा कशी होईल ? अरे दैवा ! तूं किती तरी निष्ठुर हा ! शेवटीं, या एवढ्या सत्पुरुषाची या दुष्टा मांगाचे हातून विटंबनाच करणार काय ? अहो, त्वरा करा. चला अग्नींत तरी प्रवेश करूं लौकर.

बोधा०— ( झटकन पुढे उभा राहतो. ) अहो शमाजीपंत, भिऊं नका. येऊंद्या त्या दुष्ट चांडाळास. येथेंच आहे कीं नाहींसा करून टाकतो. कोण आहे रे ! आणा तें माझें खड्ग लौकर हिकडे. अरे काम्या दुष्टा, तूं त्या मायेच्या जोरानें फार माजला आहेस नव्हे ! तूं सर्वांस गांजून सर्वस्वीं नाडून टाकलें आहेस; तर ऐक, तुला सांगतों.—

श्लोक. [ वसन्ततिलका ]

चीरूनियां तव वपू मम या असीनें ॥
बाष्पोदकें जनपदांचि करें पुसीन ॥
वीं काय हा ज्वलनिं जाळिन या क्षणांत ॥
क्षोणीपती यश विवर्धिन तीं जगांत ॥ ६२ ॥

---

१ उपटून टाकावयास. २ सेनापती. ३ तलवारीनें ४ अथवा.

बोधा०— असें कसें होईल ? काय मी इतका चकलों ?

शमा०— होय, तुह्मी चकलां; खचित चकलां- अहो हा कामाजी नव्हे. हे दमाजीराव.

दमा०— हे सेनापते, दमाजी तोचमी- जो आपल्या आज्ञेनें मनोगत करायास गेलों होतों. तो कृतकार्य होऊन आलों.

बोधा०— ( हळूच मिठी सोडून नेत्र पुसून त्याजकडे निरखून पाहातो. )

दमा०— ( त्यास नमस्कार करून ) स्वामीचा जयजयकार असो.

बोधा०— ( त्यास प्रेमानें आलिंगून ) सख्या दमाजी, धुरानें आणि पाण्यानें डोळे भरले होते ह्मणून मी तुह्मास ओळखिलें नाहीं. पण आतां खरेंच आपण जिवंत आहांना ?

श्लोक. [ इन्द्रवज्र. ]

जीवंत आहेस खरा किं मित्रा ॥
गेलास विध्वंस करूं अमित्रा ॥
माझ्या निदेशें प्रतिकारकारी ॥
तो तूंच मन्मानस मोदकारी ॥ ६३ ॥

दमा०— महाराज, तोच मी दमाजी. आपण आमच्या शिरावर असतांना आह्मास कळिकाळापासून ही भय नाहीं, मग दुसऱ्यापासून कसें होईल ?

शमा०— ही गोष्ट सत्य आहे. पण पाहा कसा घात झाला होता तो. काय हो हें त्या दुष्टाचें असें गौडबंगाल जें आमचा प्राणच हरण करीत होतें।

दमा०— तुह्मास त्या दुष्टानें फार घोळांत घातलें असें

ऐकतांच त्याच्या मुसक्या बांधवून मी धांवत तुह्मा-
पाशीं आलों.

बोधा०— काय, त्या मांगाच्या पोरांनीं हा सर्व तोतया करून आह्मास आपेंआप जाळून टांकण्याची मसलत केली होती, अँ !

( इतक्योत विवेक येतो. )

विवेक.— सेनापते, विचाररावांनीं तुह्मास कुशल विचारलें आहे. आणि सांगितलें आहे कीं ज्यांणीं मतरणा करून तुह्मांस संकटांत घातलें, त्यास योग्य शिक्षा होण्याविषयीं राजाच्या कानावर वर्तमान घालून तजवीज उदयीक होईल, आपणास फार श्रम झाले आहेत तर आतां स्वस्थ विश्रांति घ्यावी.

बोधा०— विचाररावांस आमचे प्रणाम सांगा, आणि या चांडाळांस योग्य शासन उद्यां करण्याविषयीं राजाज्ञा झाली पाहिजे ह्मणून माझी नम्र विज्ञापना सांगा. कांकीं:—

## ओवी.

दुष्टांला योग्य शासन, आणि साधु संत पोषण ॥
राजाश्रितां भूषण, याहूनी मोठें अन्य नसे ॥ ६७ ॥

[ असें ह्मणून सर्व निघून जातात. ]

## अंक दुसरा समाप्त.

दुसऱ्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंडी. | ओंव्या. | अभंग. | पदे. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४ | १ | १२ | १ | १३ | ३ | २ | ६७ |

# सायुज्यसदननाटक.

## अंक १.

### स्थळ.

### उपवन.

| | |
|---|---|
| लुमाजी नाईक .. .. .. .. .. | मायाऊचा भाऊ. |
| मोहनाजी .. .. .. .. | मायाऊचा दुसरा भाऊ. |
| मसाजी .. .. .. .. .. | मायाऊचा तिसरा भाऊ. |
| कामाजी नाईक. .. .. .. | मायाऊचा चवथा भाऊ. |
| बांधाजीराव दाभाडे .. .. | शिवाजी राजाचा सेनापति. |
| शमाजी पंत .. .. .. .. .. .. .. | कारभारी. |
| दमाजीराव घाटगे .. .. .. .. .. .. | कोतवाल. |
| विवेकराव .. .. .. .. .. .. .. .... | प्रधान. |
| विचारराव .. .. .. .. .. .. | दुसरा प्रधान. |
| शिवाजी महाराज .. .. .. .. .. | सार्वभौमराजा. |
| निवृत्ति.. .. .. .. .. .. .. .. .. | त्याची राणी. |
| मायाऊ .. .. .. .. .. .. .. .. | त्याची दासी. |

# सायुज्यसदननाटक.

## अंक १.

( नंतर हातांत ढाल तलवार घेऊन लुमाजी नाईक येतो. )

मला मायाऊ आकानें आपला मसाजी दादा, आणि मोहनाजी, यांच्या समाचारास पाठविलें. पण त्यांस आतां कुठेतरी शोधूं? जिकडे पाहावें तिकडे चिपचिप आणि खबरदार असे शब्द होताहेत. ज्यास विचारावें तो कानावर हात ठेवितो. हें आहे तरी काय? बरें; तो मोठा मनुष्यांचा मेळा जमलेला दिसतो, तेथेंतरी जाऊन विचारून पाहूं या, कांहीं ठिकाण लागेल तर. ( किंचित पुढें जातो. ) अहो, हें काय! येथें तर कोणी कांहींच बोलत नाहीं- कदाचित् आपण कांहीं बोललोंच, तर नाकावर तर्जनी ठेऊन डोळे वटारतात, हें आहे तरी काय? ( पुढें कांहीं लोक एकत्र जमून गोष्टी बोलत होते त्यांजपाशीं जातो. ) अरे! हे तर सर्वच डोळे पुशीत बसले आहेत! येथें काय यांचा बापदादा मेला कीं काय, हे असे रस्त्यांत मोठ्या समारंभानें एकत्र जमून शोक करिताहेत ते? पण, आपण त्यांजपाशीं जाऊन विचारूं तर या खरें, काय ह्मणतात तें. ( जवळ जाऊन ) कायहो, आज या नगरांतले लोक असे घाबरलेले कां दिसतात बरें? आणि तुह्मीतर रडतच बसलां, हे कशाकरतां? ( वर आकाशाकडे पाहून. ) हाँ, असें काय! तुमचा बोधाजीराव सेना-

पति रात्रीं अग्निप्रवेश करून मेला ह्मणून जिकडे तिकडे चापचूप होत आहे; आणि तुह्मी ही त्याच्या साठींच हे इतके रडतांना? आतां मी समजलों. बरें, झालें तें नीटच झालें; बिचारा अबरू. घेऊन गेला. नाहींतर काय होतें कोण जाणे? शाहाण्याची बलाय दूर, ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. पण, तो आतां आपला मोहनाजीदादा मला कुठे भेटतो, ज्याणें ही मोठी पारध साधली तो? एकदां त्याच्या पायांस मिठी मारीन, आणि तोंडानें शाबास शाबास बोलेन. ( कांहींसा पुढें जातो. ) बरें, तो त्या पिंपळाच्या झाडाखालीं कोणी तापसीसा बसलेला दिसतो त्यास जाऊन विचारूं या, कांहीं समाचार मिळेल तर. कांकीं गोसांवी, भणंग, भिकारी, आणि तापसी, यांचा सर्व प्रकारच्या लोकांबरोबर संबंध असल्यामुळें, त्यांस असल्या बारीक गोष्टींची चांगली माहितो असती. ( त्याच्या जवळ जाऊं लागतो. ) अरे! हातर चतुर्भुज स्वयंभुच दिसतो; हा कोणी पिशाच तर नव्हेना? ( किंचित् मनांत दचकतो. ) अँ:, आपण कशासाठीं त्यास भिणार? तो काय करतो बेटा? मला पक्कें ठाऊक आहे कीं त्याच्यानें आतां कांहीं हाल चाल तर करवणार नाहीं, असें त्याला गच्च बांधुन टांकलें आहे. ( अगदीं जवळ जातो. ) अरे, हा तर आपला मोहनाजीसा दिसतो. कायरे मोहनाजी! हें रे काय?

मोहना०—कोण तो? लुमाजी दादा? शाबास, ठीक वेळावर आलास हो. नाहींतर मेलों होतों आज.

लुमा०- छी, वेड्या, असें अभद्र भाषण बोलूं देखील नको. तो मात्र मेला खरा.

मोहना०— कोण ?

लुमा०— जो त्वां मारला तो; आणखी कोण ?

मोहना०— हाँ खरेंच काय तो मेला ? पण दादा, हें तुला कळलें तरी कसें ? अरे, माझे हातपाय सोड आधीं, मला जरा मोकळा होऊं दे.

लुमा०— ( तलवारीनें बंधनें तोडतो. नंतर एकमेकांस दृढालिंगन देतात. ) शाबास मोहन्या ! शाबास! पण तुला असें बांधून रे कोणी टाकलें ?

मोहना०—अँ, तें कांहीं नाहीं. अरे त्या रांडलेंका कोतवालाचे आणि माझे दोन झपाटे झाले.

लुमा०— मग; त्याला त्वां जीवंत ठेवला, कीं ठार केला ?

मोहना०— त्या मुरदाडानें माझे हात बांधले रे; नाहीं तर दाखविली असती त्याला कशी आहे ती.

श्लोक. ( अनुष्टुप्. )

ज्याणें स्ववाणिलीलेनें सेनानी होमिला असा ॥
त्या या मत्कुणसा माराया दुष्टा भार कायसा ॥ १ ॥

लुमा०— मोहनाजी तूं तर हें मोठेंच काम केलें खरें; अरे पण, मला आधीं सांग, तूं खरोखरच तापसी झा-लास कीं काय ?

मोहना०— छी वेड्या, असा कोणी तापसी होतो काय ?

लुमा० — तर काय, तूं तापसी नव्हस ? मला तर, बाबा, तूं हुबेहूब तसाच दिसतोस.

मोहना०— रानांत भीक न मिळाली म्हणजे वानराडु-

---

१ जाळला.

कडाप्रमाणें, झाडांचा पाला आणि मुळ्या खाऊन रानांत भडकतात, उन्हांत सुकून मरतात, आणि काळवंचना करतात, तसा तापसी कांहीं हा नव्हे.

श्लोक. ( उपजाति )

हा तापसी तापद[1] आणिकांला[2] ॥
स्वयें तपेना ठकवी न काला ॥
वाणी असीचे[3] परि तापकारी ॥
याची तसी त्याचिं[4] परोपकारी ॥ २ ॥

लुमा०—तर बाबा, हा तुझा तापसीपणा मोठा चमत्कारिक वर्णन करण्या जोगाखरा. अरे, हातांत शस्त्र ही न घेतां एवढा महावीर एका क्षणांत जाळून टांकलास तरी कसा ?

मोहना०— कसा तो तुला काय सांगूं ? पाहा, जीं कार्यें बुद्धीनें आणि मंत्रानें होतात, तीं साहित्यानें आणि शस्त्रानें देखील होत नाहींत, समजलास ?

लुमा०— तें खरें; पण, हा पाहा, तूं खरोखर भिकारीसा दिसतोस. आणि यांत त्वां तुझी बुद्धी शलाका कशी चालविलीस व मंत्र तो काय केलास ? हेंच, बाबा, मोठें नवल वाटतें.

मोहना०— ( गर्वानें फुगून. )

ओवी.

हा वेश दिसे भिकारी, परी ऐकें याची थोरी ॥
जैसी शुका नळिका दोरी, वंचक अरीला तैसा हा ॥ १ ॥

---

१ तापदेणार. २ अन्याला. ३ तलवार. ४ खऱ्यातापसाची.

माझी जरी पाहाशी शैली, नृपाळासही घाळीन भूली ॥
क्षणांत नाचवीन बाहुली, जैसा नाचवी सूत्रधार ॥ २ ॥
याच वेळें पाहा राया, चुकतों कीं काय ठकवाया ॥
प्रगटवून आत्मीय माया, वश तया ही करितसें ॥ ३ ॥
या माझ्या मोहजाळीं, त्रैलोक्य-जीवडीं मासोळी ॥
निःशेष विपलांत कंवटाळीं, तरी झोळी रिक्तची पहा ॥ ॥६

लुमाजी.— खरें बाबा, तूं तर ह्मणशील तें करशील. माझी खात्री झाली; पण पाहा, मायाऊआका तुझ्यासाठीं आणि त्या मसाजीसाठीं फारच काळजी करीत बसली आहे. तर तूं सत्वर जाऊन आकास भेटून हें आनंदकारक वर्तमान तिला सांग. मला वाटतें, हें ऐकतांच तिला हर्षवायु होईल. मी मसाजी दादास भेटून त्यास घेऊन हा असाच आलों.

मोहना०—(आनंद पावून) हा मीं चाललों पाहा. तूं मसाजीस घेऊन लौकर ये. वेळ लावूं नको हो ? कामाजीदादास ही मी अगोदर जाऊन भेटतों. (असें ह्मणून निघून जातो.)

लुमा०—(आपाशीं) असो, मायाऊआकानें मोठ्या पहांटेस उठून मला कामगिरी सांगितली ती तर मी बजावली. बरें, दैव ह्मणावें तर आह्मास (मांगाचे पोरांस) अनुकूळच आहे. पाहा या मोहनाजीदादानें भिकारी होऊन त्या सेनापतीस नाहींसें करून टांकलें. आतां आपणास इतकेंच करावयाचें आहे कीं मसाजीदादास हें आनंदाचें

---

१ आपली. २ जीव ३ सर्व.

वर्तमान सांगून त्यास बरोबर घेऊन मायाऊआकाजवळ जावयाचें, ह्मणजे झालें. मग मी राजा. मला मायाऊआका कांहीं तरी बक्षीस देईलच. पण पहिल्यानें ती ह्मणेल. लुम्या! तुला कायरे बक्षीस पाहिजे? तेव्हां बरें आपण काय मागावें? लाडू, जिलब्या, घिवर, अशीं उंचींउंची पक्वान्नें पागावीं ह्मणजे झालें, खुशाल खाऊन निजूं. (मनांत) छी. वेड्या, आपण काय ब्राह्मण आहां, असें अधाशीपणानें खाऊन निजूं ते? नको रे बाबा, तें असलें खाणें ओंगळवाणें. बरें तर, आपण मोठा भरजरीचा मंदील, शेला, धोत्रजोडा, असा उंचा पोषाक मागूं परता; ह्मणजे शरीर शृंगारून, चारदिवस नगरांत हिकडे तिकडे फिरावयास तरी सांपडेल. (मातक्यानें मनांत ह्मणतो) कायरे, मी काय असा अगदीं मूर्ख आहें? जसे उजळ ठक चांगले चांगले पोषाक करून लोकांस नाडून फजिती करून घेतात, तसा मी असले ढंग करण्यासाठीं भलतेंच मांगूं? नाहींरे बा आपण तसें कधीं नाहीं मांगणार. आपण मांगभाई; गुढगी चोळणा नेसून, आंगावर घोंगडी घेऊन, सगळी दुनया लुटणार. अशा आह्माला तें लांबट खटलें कशास पाहिजे? तर गड्या, आपण आतां काय बरें मागावें! हाँ, बरी याद पडली. आपण कोशपालाचें काम मला दे असें ह्मणावें. पण आका तें देईल ना मला? (वर पाहून) होय, खचीत देईलच देईल. मग सगळी संपत्ति आपण बळकावून बसूं. सोन्याची पलंगडी करून त्याजवर

( हातांत घेतो ) ही माझी काळी घोंगडी घालून खुशाल निजेन. आणि कोणाचा जरी प्राण गेला, तरी एक अर्धी देखील कोशागारांतून मी काढूं देणार नाहीं. मग माझी वाहवा वाहवा, शाबास, अशी होईल. आणि राजेसाहेब तर मला जीवजान समजतील. कां कीं—

## आर्या.

बहु द्रव्यार्जन कारी, अल्पव्ययकारि कुशल मानवतो ॥
अल्पोपभोगकारी कोशप[1] भूपाल-मतिस मानें[2]नवतो ॥ ७ ॥

तर हे सर्व गुण मजध्यें आहेत. लोकांस लुटून पैसा जमा करणें, हें तर आह्मा मांगांचें स्वकर्मच. कोणाचा प्राण गेला तरी कवडी खर्च करणार नाहीं हा माझा जातिस्वभावच. उपभोग ह्मणावा तर ढोंगाला चोळणा, आणि खांद्यावर घोंगडी. मग राजाचा तर मी जिवलग गडी होईन. आणि राज्यकारभारी मांगच मांग करून टांकीन. धन्य मांगांचें कुळ आमचें असें होईल मग.

( इतक्यांत डाव्या हातांत एक कागद आणि उजव्या हातांत तलवार घेऊन मोठ्यानें आरोळ्या मारीत समोरून मसाजी येतो. )

**मसाजी.**— खबरदार. धरा, जाऊं देऊं नका. पळून जाईल. सोडूं नका. ( असें ह्मणत तलवार परजतो. )

**लुमा०**— ( त्यास पाहून अत्यंत भयभीत होतो, आणि

१ जामदार २ आवडतो.

हिकडे तिकडे पळावयास पाहतो ) अहारे दैवा, हें काय केलें ! अरे आतां लपुंतरी कुठे ? हा जीवंत काळासारखा येत आहे तरी कोण ? आतां काय करूं ! ( असा विचार करीत घाबरेपणें सैरावैरा धांवतो. इतक्यांत. )

मसाजी.— ( मोठ्याने. ) खबरदार; लंडी पळतोस कुठे, उभारहा.

लुमाजी,— अरे; हा रांडलेंक तर अगदीं जवळ आला. ( घाबरून. आतां पळून तर परिणामच नाहीं. गड्या आपण मेल्याचें सोंग घेऊन येथेंच पडावें. हा कोणी वीरपुरुष दिसत आहे- कदाचित् जवळ आलाच तर हा कोणी मेलेला पडला आहे असें समजून चालता होईल. मग आपण उठून जाऊं ( असें ह्मणून रस्त्याचे बाजूस लहानसा चर होता. त्यांत आंगावर घोंगडी पांघरून मेल्या प्रमाणें उपडी पडतो. )

मसा०— ( लुमाजी अकस्मात अदृश्य झालासें पाहून. )

श्लोक. [ वसंततिलका ]

रे तस्करा ठक बकाहुन मीनं कायी ॥
वांचे न घाविंत शिरोन अथांव तोयीं ॥
जो सोडिना उपरि येवरि मीनतीरा ॥
त्या भक्षिल्याविण तसा मि तुला अधीरा ॥ ८ ॥

( असें ह्मणून पुनः मनांत विचार करतो. ) अरे; हा चोरासारखा किंवा गुप्त हेरासारखा अकस्मात् दृष्टीस अगो-

१ मासा. २ अंत नाहीं असे. ३ पाण्यांत. ४ म्याड.

चर झाला. हा कोण बरें असावा ? चोर असेल तर जाऊं द्या बेटा गरीब. पण जर त्या दुष्टा सेनापतीचा कोणी गुप्त हेर असेल, तर मात्र त्यास कंठस्नान घातलें पाहिजे. त्या लबाडानें असे हेर धाडूनच आजपर्यंत आमची नागवण केली. बरें, काय चिंता आहे ! आतां त्याचा समाचार चांगलाच घेतों. ( डाव्या हातांतील कागदाकडे अवलोकन करून. )—

श्लोक. ( वसन्ततिलका. )

अस्मत्कुलद्रुम समूल खणावयाला ॥
ही शर्वेला निपजवीलिधमा तयाला ॥
( उजव्या हाताकडे अनुलक्षून. )
ही हेति सव्यकरसंस्थ चिरील जेव्हां ॥
होती मदीय नयनें अतिथंड तेव्हां ॥ ९ ॥

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

अहो सकल परिचार जनहो, सावधान चित्तें श्रवण करा. महाराज शिवाजी राजे आरामवाटिकेंत उपवनकेली करावयाकरितां गेले होते. तेथें विलासानंदांत निमग्न होऊन निद्रावश झाले आहेत; तर कोणी कांहीं गडबड न करितां आपापल्या कामीं तत्पर असावें. राजमार्गांत गलबा, दांडगाई इत्यादि न होई असा बंदोबस्त ठेवावा. राजेसाहेब निद्रोत्थित झाल्यानंतर सर्व राजकाज चालेल; तावत्काळपर्यंत सर्व स्वस्थता असावी.

लुमाजी.— ( शब्द ऐकून. ) मला वाटतें आजुन रात्र

---

१ शस्त्र.

आहे- काय राजेसाहेब आरामवाटिकेंत उपवनकेली करावयास गेले आहेत ! तर, आपली मायाऊ आका तेथें समागमें गेलीच असेल- राणी साहेब तर गृह सोडून कधींही बाहेर जात नाहींत; त्यांला असलें हें रतिसुखाचें ढंग फारसें आवडतच नाहीं. म्हणून आमची आका नेहमी बागांत राजेसाहेब जातात तेव्हां समागमें असती. वाहवा ! कायहो हें दैव ! मला वाटतें, आज आपलें सर्व कार्य करून घेतल्याशिवाय मायाऊ आका राजास मिठी मारील ती सोडणारच नाहीं, शाबास ! धन्य माझी ( आपण लपून राहिल्याची विस्मृति होऊन नाचूं लागतो )! वाहवारे ! मी झालों कोशपाल, मी झालों जामदार, मी झालों सरदार, सर्व कांहीं मी झालों. ( थैथैथैथै नांचतो. )

### अभंग.

धन्य धन्य आजि आमचें हें दैव, ॥
सकळ वैभव आलें हाता ॥ १ ॥
आलें हाता मायाऊचे सर्वराज्य, ॥
तिहीं लोकीं पूज्यता पावली ॥ २ ॥
पावली ती पट्टमहिषीचा[1] पदा, ॥
आमची आपदा दुरावली ॥ ३ ॥
दुरावली आशा शत्रूंची समूळ, ॥
सौख्याचा सुकाळ आम्हां झाला ॥ ४ ॥
झाला रविदास उदास संसारीं, ॥
प्रभुगुण, थोरी गातां गातां ॥ ५ ॥ १० ॥

---

१ मुख्यराणी.

मसाजी.— ( आपणाशीं ) राजेसाहेब उपवनकेली करावयास गेले ते तेथें निद्रिस्थ आहेत तोंपर्यंत सर्व राजकाज बंद आहे ह्मणतात काय ? तर मायाऊ आका ही समागमें गेली असेल. कांकीं, तिजवांचून ते उपवनकेली कशी करतील ? मला पक्कें ठाऊक आहे आकानें राजास असा चटका लावला आहे, कीं तिच्या शिवाय एकक्षण ही त्यांस सुखास पडत नाहीं. ते वारंवार ह्मणत असतात.—

पद.

मजला कोण मिळे अशि दासी ॥ धृ० ॥
नयननिरीक्षणिं मोहित अंतर जरी मीं आहें उदासी ॥ १ ॥
श्रांत न जी विश्रांतिस मज दे सेवी सतत पदांसी ॥ २ ॥
शांतमना नंदित हृदया जी करी विस्मृति स्वपदासी ॥ ३ ॥
शर्व- गर्व- संहरणीं कुशला पाहे न परि रविदासीं ॥ ४ ॥

तर आतां सर्वप्रकारें आपलें दैव चांगलेंच दिसत आहे. मायाऊ आकानें वचन दिल्याप्रमाणें ती सर्व पार पाडील, आपण काळजी ती कशाला करणार? बरें, तो लठ्या नाचतो आहे कोण ? जरा पुढें जाऊन पाहूं द्या तर खरा. ( किंचित् पुढें जातो. ) अरे, हा तर मघांचाच चोर. हा रांडलेंक, माझ्याच भोंवता लागला आहे असें वाटतें. एकदां जाऊन त्याचा समाचार घेऊं या परता, ह्मणजे झालें. (पुढें जातो ).

लुमा०— ( तो आपणाकडे येतो असें पाहून, ) अरेरे, मसलत फसली. आनंदाचे भरांत नाचूं लागलों आणि या चांडाळाचे दृष्टीस पडलों. आतां काय करावें !

हा पाहा, तलवार नाचवीत तो क्रूर हिकडेसच येत आहे. अरे विपरीत गतिदा दैवा, असें कसें झालें ! मी माझ्याच कर्मानें बुभुक्षित सिंहाचे बिळांत जसा ससा शिरतो, तसा याचे समोर आलों. अहारे कर्मा ! ( हिकडे तिकडे अवलोकन करून पळूं लागतो ).

**मसा०** — ( चपल गतीनें त्याचे पाठीस लागतो. )

**लोभाजी.** — ( आपणास धरावयास अगदीं जवळ येऊन टेंकला असें पाहून आडबिर्दीत उडी मारतो. )

**मसा०** — [ त्यास धरावयास लगट करितो. ] खबरदार, आतां कुठे पळतोस, लंडी ?

**लुमा०**— ( वर पाय करून बिर्दीत पासला पडतो, ) हेवीर पुरुषा, ऐक; तुझी पवित्र तलवार उगाच विटाळूं नको. अरे मांग मी.

**मसा०** — लुच्चा काय ह्मणतोस मला ? मांग ? तूं मांग.

**लुमा०**— बरें, मांग तर मांग. तसें कां होईना ?

**मसा०** — ऑं काय मी ? तूं मांग.

**लुमा०** — अरे पण तसेंच ह्मणतो मी; मांग.

**मसा०** — मूर्खा? काय ह्मणतोस तूं, मांग ? मी नाहीं. तूं मांग.

**लुमा०**— ( अगदीं घाबरून. ) अहो, सरदार, मीही तसेंच ह्मणतों तुह्माला, मांग.

**मसा०** — दुष्टा ! ( डावे पायानें लत्ताप्रहार करायास जातो. ) मला मांग ह्मणतोस ? तूं मांग आतां जीवदान पाहिजे तर. पण तुला जिवंत सोडतों कुठे ! ( असें ह्मणून तलवारीचा झपाटा मारतो तो चुकून पाय निसटून आपणच खालीं पडतो ). सांभाळ, सांभाळ.

लुमा० — भली झाली, सांभाळलें आतां; मांगाच्या पोरांस दैव अनुकूळ कसें आहे तें तुला ठाऊक नाहीं वाटतें. (आपली तलवार इकडे तिकडे सोधूं लागतो ती सांपडत नाहीं तेव्हां हातांत एक मोठा दगड घेऊन मसाजीचे कपाळावर घालावयास धांवतो.) घे, रांडलेंका, जा आतां त्या सेनापतीचे भेटीस.

### श्लोक. (शार्दुलविक्रीडित)

जा माझ्या अनुजें अशस्त्र मतिनें मंत्रौषधा[1] सोमला ॥
पाजूनी अनली चमूपतिस त्या एकेक्षणी होमिला[2] ॥
त्याला तूं अपकार जासि करुं हें साहेल कैसा विधी[3] ॥
भेटायास तयास जा दवडितों मी सिद्ध तुझ्या वधीं ॥ १२॥

मसा० — (मनांत ह्मणतो) अहो, हें काय? कांहीं सुवर्तमान ऐकूं येतें; हा आहे तरी कोण, जो सेनापतीचा गुप्त हेर समजून मीं यास ठार मारीत होतों? बरें विचारुं तर खरें. अरे, तूं कोण आहेस? आणि सेनापतीचें ह्मणतोस, तें काय?

लुमा० — हाँ; आतां तूं कोण आहेसआँ, मी तुझा बाप लागलों आहें आतां. सेनापति तर गेला; आणि तूंही जा.

### श्लोक. [सृग्विणी]

वामपायीं[4] मला लात मारावया ॥
सिद्ध झालास हे तीन कापावया ॥
पृछसी कासया नामवंशास या ॥

---

१ मसलतरूपऔषध. २ जाळला. ३ दैव. ४ डावा.

पाणि- पाषाण- जा मृत्यु घे माझिया ॥ १३ ॥
आर्जवें बोललों मांग मी तूजला ॥
कार्य त्या सीतवाक्यें तुझा भाजला ॥
जीवनाशास तूं घेतली धांवती
माझिया पाणिनें मोक्ष ते पावति ॥ १४ ॥
साह्य प्रारब्ध ही मांगजातीस या ॥
द्वेष मांडीयला त्यांसि बा कांसया ॥
दीपकाऊपरी त्या पतंगा परी ॥
नाशितां जीविता षंढ हो कातरी ॥ १५ ॥

मसा०— ( मनांत. ) अहो, हा जें भाषणें करतो, तें सर्व आमचे पक्षाचीं; याजवरून मला वाटतें हा खचीत मांगच आहे. पण आतां यास ओळखावें कसें ? येथें आंधारांत कांहींच दिसत नाहीं; आणि याणें जो हातांत मोठा दगड घेतला आहे, तो जर मजवर पडेल तर मग माझ्या हाडांचा चकाचूर झालाच ह्मणून समजा; आणि माझ्या केलेल्या अपराधास स्मरून हा तसें करण्यास चुकणारच नाहीं. तर यास कोणता उपाय योजावा ! बरें, आपलें नातें यास समजेल अशी कांहीं युक्ति करावी, ह्मणजे कदाचित् ओळख पटेल. ( किंचित् रुदनमुख होऊन )—

साकी.

हांहां तवकर क्षणभर तरि सांभाळीं भ्रातृ सुमित्रा ॥
हा कामाचा तु यमें बंधू याच्या भंगि न गात्रा ॥ १६ ॥
सेनानी- कृतकलुषा धुंडुं मायादूत निघालों ॥

---

१ हातांतीलदगडानें. २ आंग. ३ प्राण. ४ घवथा.

साधुनि कार्या आर्या तीचे दर्शन-उत्सुक झालों ॥ १७ ॥

लुमा०— ( हें भाषण ऐकून, ) अरे, हा तर आपला मसाजीसा वाटतो! खरेंच कायरे, तूं मसाजीच ?

मसा०— होय; तोच मी मसाजी.

लुमा०— ( आपले तोंडावर बांधलेला रुमाल सोडून त्याच्या तोंडाशीं तोंड नेतो.) अरे रे, घात झाला होता. मसाजी, दादा, कायरे, तूंच का हा ?

मसा०— ( लुमाजीचें तोंड पाहून, ) कोणरे लुम्या ? अरे तूंच कायरे हा ?

( दोघे एकमेकांस दृढ आलिंगन देतात. )

लुमा०— ( डोळ्यांत आसवें आणून. ) दादा, तूं तर मला कापून टांकित होतास.

मसा०— छी, वेड्या, तुला ? असें होईल तरी कसें ? अरे, मी समजलों कोणी त्या लुच्चाचा गुप्त हेर असेल, ह्मणून माझें मस्तक फिरलें. पण, तूं तरी दगडानेंच माझा कपाळमोक्ष करीत होतास नव्हे ?

लुमा०— होय. हा तर मांगांचा धर्मच. जो आपणास अपकार करावयास उभा राहील, त्यास आपण अपकार करावा. पण दादा, पाहा कसा गोंधळ झाला होता तो. आपण एकमेकास एकमेक मारून टांकीत होतों.

मसा०— पण दैवानें राखलें, नाहीं तर झालेंच होतें आज.

लुमा०— दैव तर आह्मा मांगांस सर्वदा अनुकूलच

---

१ श्रेष्ठ.

आहे. पाहाना, त्या आमच्या मोहनाजीनें सेनापति कसा जाळून टांकला, तो.

मसा०— ऑं, खरेंच काय ? तो दुष्ट पार झाला ?

लुमा०— होय. खरोखर, त्याची राख देखील वाऱ्यानें उडून गेली असेल.

मसा०— ( सद्गद होऊन, ) वाहावारे मोहना ! त्वां आज हा केवढा पराक्रम केला ! आतां तुला शाबासकी तरी केवढी मोठी देऊं. शाबास ! शाबास ! तूं आमच्या कुळांत कुळदीपकच खरा. ( असें ह्मणून नाचूं लागतो. )

## अभंग.

मेरु मुंगियेनें उलंडिला जैसा ॥
जाळिलासि कैसा सेनानी तूं ॥ १ ॥
अजापुत्र करें व्याघ्र मरे जैसा ॥
जाळिलासि कैसा सेनानी तूं ॥ २ ॥
दर्दुर सक्रोधा सर्पा गिळि जैसा ॥
जाळिलासि कैसा सेनानी तूं ॥ ३ ॥ ॥ १८ ॥

( लुमाजीस. ) अरे, तो मोहना कुठे आहे ? मला त्यास पोटभर पोटाशीं तरी धरूं दे. त्याचा सुखकर मुखचंद्र मला एकदां केव्हां पाहीन असें झालें आहे.

लुमा०— तो हें आनंदाचें वर्तमान सांगण्याकरितां आतांच मायाऊ आकाकडे गेला.

मसा०— तर मग, आपणही गड्या मायाऊचे पायां पडावयास जाऊं चला.

लुमा०— मलाही आकानें, दादा, तुझ्या आणि मोहना-

जीच्या शोधार्थंच पाठविलें होतें; सारी रात्र तिला नीज आली नाहीं, तुह्मी परत आलां नाहीं ह्मणून.

मसा०— तें खरें असेल. तिला झोंप आली नसेल खरी. ह्मणूनच ह्मणतों. लौकर तिला भेटून, हें खुशालीचें वर्तमान सांगूं, ह्मणजे झालें.

लुमा०— हें वर्तमान तर मोहनाजीनें केव्हांच सांगितलें असेल तिला. तेव्हांच तर ती राजेसाहेबांबरोबर आरामवाटिकेंत निजावयास गेली असावी. नाहीं तर जाती काय!

मसा०— होय, तें खरें. पण आकाच राजाबरोबर आरामवाटिकेंत गेली आहेना? कीं राणी साहिब गेलीं आहेत?

लुमा०— आकाच गेली आहे. राणीसाहेब नाहींत. तीं रंगमाहलांत निजलीं आहेत.

मसा०— तूं कशावरून ह्मणतोस? तुला कसें समजलें हें?

लुमा०— राजेसाहेब आनंदविलासांत निमग्न होऊन निजले आहेत ह्मणून हांकाहांक झाली, ती तुह्मी ऐकिलीना?

मसा०— होय, तें ऐकिलें, पण कोण जाणे मायाऊ आका समागमें गेली कीं नाहीं, तें.

लुमा०— मायाऊआका शय्येवर असल्याखेरीज आनंदविलास होणारच नाहीं. आणि राजेसाहेबांस अशी गाढ झोंपही यावयाची नाहीं. हें मला पक्कें माहीत आहे. राणी शाहेब सय्येवर निजून मात्र राहातील. पण आमची आका कांहीं तशी नव्हे.

ती सारी रात्र नाना प्रकारच्या कलाकुसरीचें सुरत करून राजास रंजवील. झोंपच येऊं देणार नाहीं. यामुळेंच महाराज उशीरांपर्यंत निजणार; आणखी काय!

श्लोक. [ द्रुतविलम्बित ]

सुरत- लालन- लुब्धनरा निशीं ॥
जरि रतिप्रियकामिनि मानसीं ॥
रिझविती तरि झोंप कदां नये ॥
सहज निद्रित होय दिनीं स्वयें ॥ १९ ॥

श्लोक. ( उपजाति. )

प्रियांगनास्यांत निजास्य मोदें ॥
घाली तिचे माळ गळां विनोदें ॥
स्वपाणि- अंभोरुह[1] गुंफुनीया ॥
निजे रतिश्रांत[2] सुखावुनीयां ॥ २० ॥

[ द्रुतविलम्बित ]

नृप हि या रिति निद्रित जाहला ॥
प्रकृति- संगति- स्वस्थचि राहला ॥
करुनि सर्व मनोगत या क्षणीं ॥
भगिनि येईल ती शुभलक्षणी ॥ २१ ॥

मसा०— एकून आमचे मायाऊ आकानें घाट तर फारच चांगला घडला.

लुमा०— चांगला ह्मणून काय सांगावयाचें ? आज सर्वराज्य आपले हातांत आणिलें तिणें.

मसा०— तें तर खरें; नाहीं तर, या प्रधानमंडळीनें आमचीं मुळेंपाळें खणून टांकण्याचा बेत केला होता.

---

१ हस्तकमळें. २ विलासकरून श्रमलेला.

लुमा०— ते बेटे काय आमचीं मुळेंपाळें खणतात? आमचें मांगांचें नसीब साडे तीन हात लांब आहे. आह्मीच त्यांचीं मुळेंपाळें खणूं आतां.

( इतक्यांत पडद्या पलीकडे मोठा शब्द होतो. )

अहो, सकळ नगरवासी जनहो! श्रवण करा. जो सिद्ध- मुनि- गंधर्वांस अजिक्य, जो संपूर्ण जगदारंभास कारणभूत, जो सर्वत्र विहारी, ज्याचे शत्रू अप्रयत्नानेंच नष्ट झाले, जो राजाच्या कृपारूपसमुद्रांत पोहणारा मीन, ज्यास शिवाजी राजाच्या कृपेकरून संपूर्ण सेनेचें आधिपत्य मिळालें, असा हा त्रैलोक्यसुंदर कामाजीनाईक तुह्मां सर्वांस आज्ञा करितो, कीं सर्वजनपद, नगरवासी,'ग्रामवासी, आणि अरण्यावासी, तुह्मी माझ्या अनुशासनाप्रमाणें वर्तनें करा; स्वेच्छाविहारी व्हा.

( मसाजी आणि लुमाजी आनंदित होतात. )

( नंतर हातांत पुष्प धनुष्य घेऊन कामाजीनाईक येतो.)

मसा० लुमा०— दादाचा विजय असो. शाबास दैवा! आज तूं आह्मा मांगांवर आपली कृपादृष्टि पूर्ण प्रगट केलीस खरी.

कामाजी.— कां लुम्या! खुशाल आहेसना. मसा, तूंरे?

लुमा०— दादा, खुशाल पण किती सांगूं? मला वाटतें मी जन्मांत असा खुशाल झालों नव्हतों कधीं.

मसा०— दादा, मीही तसाच; त्याच्याही पेक्षां अधिक कां नाहीं होणार?

श्लोक. [ शालिनी. ]

तोया प्याया धुंडितां काननांत ॥

पीयूषाची धार ये आननांत ॥
तैसी इच्छा वांचण्याचीच केली ॥
राज्य प्राप्ती त्यास दैवान झाली ॥ २२ ॥

लुमा०— अरे, दैवतर आमचे घरांत पाणी भरतें सध्या. जाणतोस !

कामा०— आमची दैवमाता हातांत ढालतलवार घेऊन आमचें कल्याण करण्यास सर्वदा झटत आहे.

मसा०— हें काय सांगावयास पाहिजे ! दादा, अनुभवच घेतों आह्मीं. पण, तुला सेनापतीचा तर अधिकार मिळाला ना !

कामा०— यांत काय संशय ! वेड्या, हा पाहा माझे हातांत परवाना. ( खिशांतून कागद काढून दाखवतो. )

लुमा०— तर आतां आधीं जामदारखाना तपासून पाहूं या. आकानें तें काम मला सांगतों ह्मणून सांगितलें आहे.

मसा०— शहरपन्यार्चें काम मी पाहाणार, हो. तिकडे मी दुसऱ्या कोणास पाहूं देणार नाहीं.

कामा०— तें सर्व मायाऊआकाचे संमतानेंच व्हावयाचें, समजलां ? ( लुमाजीस ) पण हें काम तूं आधीं कर, पाहूं कसें करतोस तें.

श्लोक. [ शार्दुलविक्रीडित ]

लोभा जाउन लोभवीं नृपमना मायासुताणीकडे ॥

१ तो.डांत.

कंजीं भृंग जडे न बाहिर जसा संकोच होतां पडे ॥
आलां क्षेम घडे अमित्रजबडे विछिन्न हो वांकडें ॥
दोघांमाजि पडे, अशा कुतुहला तूं क्रीड जा तीकडे ॥ २३ ॥

लुमा०— इतकेंचना ? हें तर माझे करतलांवरचें काम. हा मी पाहा आतां जाऊन दोघांची मिठी अशी गच्च करून टांकतों, कीं ती कधीं सुटणारच नाहीं. तर माझें नांव लुम्या. काय, माझ्यानें इतकें होणार नाहीं ? जाऊं द्या रे; पाहातों कसें होत नाहीं तें. हे दैवमाते, तुझा तर वरदहस्त या मांगाचे पोरांचे डोक्यावर आहेच. मग, काय केल्याशिवाय सोडतों ? ( असें म्हणून कामाजीस जोहार करून चालता होतो ).

कामा०— ( मसाजीस ) त्वां तर चांगलेंच काम बजावलें. पण आजूनही तुला योग्य अशी कांहीं कामगिरी योजली आहे.

मसा०— ठीक आहे. हा मी तयार आहें, करायास सांगाल तें.

कामा०— मी आतां जनानखान्यांतील व्यवस्था पाहण्यास जातों सरकार सुप्त झाले आहेत, म्हणून आधीं मला तिकडे गेलें पाहिजे. पण तुला सांगतों इतकें तूं कर.—

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

रे मत्सरा वैर समुद्भवाया ॥

---

१ शत्रूचितोंडें. २ फुटोत. ३ राजा आणि प्रधान यांमध्यें. ४ कौतुकाला.

आहेस तूं शक्र अर्मी खराया ॥
जा दाखवीं खेळुनियां स्वकेली ॥
कोणी तशी आजिवरी न केली ॥ २४ ॥

मसा०— ( आनंद पावून ) वाहवा ! कामगिरी तर, दादानें मला पाहिजे तशी सांगितली. पाहा आतां, कसे कलह उत्पन्न करतों तें. सगळ्या शहरभर बोंबाबोंब, आणि रडारड करून टाकतों. ह्मणजे कोतवालाचें काम मला लागलेंच मिळेल. ( असें ह्मणून जोहार करून निघून जाती ).

[ नंतर कामाजी नाईक, राजाच्या अंतःपुरांत प्रवेश करण्याकरतां निघून जातो ].

( नंतर बोधाजीराव आणि शमाजीपंत येतात ).

बोधा०— शमाजी पंतास ) प्रभूच्या अनुकंपेकरून आज सुदिन दृष्टीस पडला. तर आतां, तुह्मी जाऊन दमाजीरावांस माझे नांवानें निरोप सांगा, कीं विचारराव येथें यावयाचे आहेत, ह्मणून तुह्मी आपलें कामकाज आटोपून लौकर राजसभेस यावें.

शमा०— होय महाराज, हा जातों. ( असें ह्मणून किंचितसा बाहेर जाऊन इकडे तिकडे पाहून परत येतो. ) महाराज, रात्रीं दमाजीराव फिरते नसल्यामुळें शहरांत चोरट्यांचा, लबाडांचा, आणि भांडखोरांचा कहर होऊन गेला आहे. त्यांस शासन करून दर्शनास येतों, असें दमाजीरावांनीं विनयपूर्वक सांगितलें आहे.

---

१ क्रीडा.

## आर्या.

निशि मच्छासन नसतां, दुर्वृत्तांनीं जनास रडवीलें ॥
जैसे रक्षक नसतां करिनीं कर्दलिवनास तुडवीलें ॥ २५ ॥
शासुनि दुष्टांला त्या, शांतवुनीं जनपदांस ही वहिला ॥
युष्मन्निदेशअनुवर्ती, हा आलों तुह्माकडे पहिला ॥ २६ ॥

बोधा०— हाँ ! एका रात्रींत इतका गोंधळ झालाना ? मला वाटतें, या रामोशांचे आणि मांगांचें मूळ खणून टाकल्याखेरीज हें नगर कधीं सुखी होणार नाहीं.

शमा०— महाराज, हे स्वभावानें दुष्ट, जातीनें चांडाळ, असे राज्यांत असल्यानें लोकांस सुख कोठून होणार ? जर आपले मनापासून पौरांस खरोखरच सुखी करावें असें आहे, तर या दुष्टांस अगोदर नाहींसारखें केलें पाहिजे; कां कीं:—

### श्लोक (द्रुतविलम्बित.)

अगरु[1] सीत वपूस करावया ॥
जरि हवा तरि पन्नगरावया ॥
मथनयुक्ति करीं बरवी मना ॥
पुरवि तें अपली सुखकामना ॥ २७ ॥
कुशल जानपदास[2] जरी हवें ॥
हनन षड्रिपुचें करणें भवें[3] ॥
मग सुखास तयांस तुह्मांस ही ॥
किमपि न्यून कधीं न निशीं अहीं ॥ २८ ॥

बोधा०— अहो, तें तर आमचें मुख्य कर्तव्य कर्मच आहे.

---

१ चंदन. २ देशास. ३ तुह्मी.

आतां विचारराव हो येथें येत आहेत, ते काय ह्मणतात, तें पाहूं या.

शमा०— अहो, पाहा, काळच आपणासारख्यांस देखील जे महासंकटांत घालावयास चुकले नाहींत, ते अन्या गरिबांस रात्रदिवस त्रास दिल्याशिवाय राहातील काय? कधीं ही राहणार नाहींत; कां कीं त्यांचा स्वभावच तो—

श्लोक. [ वसन्ततिलका.]

जाळून सर्व जगतास हि तुष्ट नाहीं ॥
जाली स्वपाय- भजकास मिळालिया ही ॥
इच्छी न सौख्य हुतवाह परास पीडा ॥
तैसा करी खल ह्मणे हि मदीय क्रीडा ॥ २९ ॥

( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठा रोदनाचा ध्वनि होतो. )

बोधा०— हा, इतका आक्रोशानें कोण बरें रोदन करीत आहे? मला वाटतें, कदाचित् चावडीवर चोरांस हाणमार करीत असतील, त्या वेदनेनें ते चोर ओरडत असतील त्याचा ध्वनि असेल हा.

शमा०— चावडी फार लांब आहे. तेथील गलबला येथें इतक्या मोठ्यानें ऐकूं येणार नाहीं, महाराज.

बोधा०— तर हें इतकें हृदयस्फोटक रडणें तरी कोणाचें असेल बरें? चवकशी करा.

शमा०— आज्ञा महाराज! ( बाहेर रस्त्यांत जाऊन चहूंकडे अवलोकन केल्यासें करून परत येतो. ) महाराज, आपल्या दमाजी रावांनीं कोणीएक मनुष्य हातपाय

---

१ अग्नी.

बांधून तो पाहा ( हातानें ) रस्त्यांत उभा केला आहे, आणि त्याचे आंगावर आपण प्रहार करीत आहेत, तो मोठ्या आक्रोशानें रडत आहे हा.

**बोधा॰**— तुह्मी जरा तेथें जाऊन दमाजी रावांस सांगा, कीं राजसभेसन्निध कोणासही इतकें क्रूर शासन करणें प्रशस्त नव्हे. कां कीं—

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

दीनाचा कणवाळु हा नृप महा ज्याची कृपार्द्रा मती ॥
दुःखार्त- ध्वनि मार्गणा[1]हुन बहू जीतें सदां टोंचती ॥
येतां येथ वृथा प्रकोपितपणें दूषील अस्मज्जना ॥
यालागीं सखया सह्यां[2] सुमति शिक्षेची करीं योजना ॥२०॥

**शमा॰**— फार उत्तम, महाराज ! ( थोडासा बाहेर जाऊन, ) अहो, हे दमाजी रावच, त्या मनुष्यास सुबद्धनियमन करून हिकडे घेऊन येताहेत. ते पाहा आले.

**बोधा॰**— अहो, हें काय ! हें लचांड येथें कशाकरतां आणतात ?

( इतक्यांत दमाजीराव येऊन प्रणाम करतो. )

**दमा॰**— महाराजांचा जयजयकार असो. आजचा मोठा सुदिन कीं आपण या सभास्थानीं विराजित अहां असें पाहातों.

**बोधा॰**— ही सर्व तुमची कृपा.

**शमा॰**— नाहीं तर, आज कुठे बोधाजीराव, कुठे आह्मी, आणि कुठे दमाजीराव, कोण जाणे. असें झालें असतें.

---

१ बाण. २ सोप्या.

दमा०— असें काय ह्मणतां? बोधाजी रावांचे पद-हस्त सर्वदा आह्मांस विजयप्रद आहे.

श्लोक. [ द्रुतविलंबित. ]

हृदय- कंज-'प्रबोधक बोधा ॥
श्रितें सदैव जई मम मेधा ॥
अरि तिमीर समग्र लपालें ॥
सुदिन पाहियलें सुख झालें ॥ ३१ ॥

बोधा०— ( सुबद्धनियमन केलेल्याकडे तर्जनी करून, ) हें काय केलें, दमाजीराव, तुह्मीं ?

दमा०— अद्याप कांहीं केलें नाहीं; जें करावयाचें आहे, तें करण्याकरतांच यास आपणासपक्ष घेऊन आलों आहें.

बोधा०— हा कोण आहे आणि इतका बद्धनियमन कां केला ?

दमा० महाराज, हा—

श्लोक. [ वसन्ततिलका ]

वैरा समुद्भवि जनीं मनिं मोद मानी ॥
चौथा सहोदर कुसूमधनूस मानी ॥
जो घालिता अनलिं काल तुह्मास मोहा ॥
त्याचा सखा ह्मणति मत्सर जास तोहा ॥ ३१ ॥

शमा०— अरे चांडाळा, भला सांपडलास. पण तो याचा भाऊ कुठें आहे, जो गोसावडा होऊन काल आमची वंचना करावयास आला होता, तो ?

---

१ हृदय कमल प्रफुल्लित करणार २ आश्रित ३ बुद्धी ४ कामास.

दमाजी. श्लोक. [ द्रुतविलंबित. ]

करुन बद्ध तयास हि यामिनीं ॥
बरु- वरुणांक बंकगृहीं जनीं ॥
निरविला असतां न कळे असा ॥
सुटविला कपटें कुणि वा कसा ॥ ३४ ॥

बोधा०— अरेरे ! त्यास तर देहांत शिक्षा केली पाहिजे होती. अहो, तो पळाला कसा याची चौकशी करा, आणि त्या कृतघ्नास आधीं धरून आणा हिकडे.

दमा०— महाराज, त्याला धरून आणण्याकरितां त्यां दूत केव्हांच पाठविले आहेत.

( इतक्यांत घाबऱ्यांघाबऱ्यां मोठ्यानें आरोळ्या मारीत एक पुरुष येतो. )

अहो सकळ मंत्रीजन हो, तुह्मी अद्यापर्यंत आपआपले स्थानीं स्वस्थ बसतां, हें आहे तरी काय ? अहो ! हा पाहा, काय अनर्थ चालला आहे तो ! तुह्मांस कांहींच दिसत नाहीं काय ? मला वाटतें, जसें राजास गाढ निद्रा यावयाकरतां शय्यागृह बंद केलें, तसें तुमच्या कानास बधिरत्व आणि नेत्रांस अंधत्व येण्याकरतां कोणी पडदा तर बांधला नाहींना ? अहो, उठा लौकर, पाहतां काय ? रक्षण करा ! रक्षण करा ! या चांडाळास अपकार न कराल, तर तुमचे जीवितास, कर्तव्यास, आणि भूषणास धिःकार आहे.

बोधा०— काय हो ! हा कोण, रक्षण करा, रक्षण करा, अशा मोठ्यानें आरोळ्या मारीत येत आहे, बरें ?

शमा०— आरोळ्या मारीत येतो, इतकेंच नव्हे केवळ,

पण आपल्या सर्वांसही टोंचण्याजोगते शब्दकांनी फेंकीत येत आहे, ते पाहतांना?

बोधा०— जरा पुढें व्हा, आणि नीट ऐका, काय गडबड आहे ती.

शमा०— आज्ञा महाराज. ( हिकडे तिकडे अवलोकन करून, ) हे तर, विवेकराव आपले.

दमा०— अहो, काय ह्मणतां? विवेक राव हांका मारतात हे?

बोधा०— अहो, धांवा तर, धांवा लौकर, दमाजी राव!

शमा०— भिऊं नका, विवेक राव. ( पुढें होतो. )

दमा०— ( सायुध पुढें धांवतो. ) भिऊं नका, विवेक राव. कशाची इतकी गडबड चालली आहे कीं तुह्मी स्वतःच ओरडत धांवतां! हें आहे तरी काय?

विवेक०— अहो, बोलूं तरी काय? आज आपण नगरांत असतां असा दुर्धर अनर्थ होतो याची पुसपास तुह्मीं कांहींच करीत नाहीं काय? अहो, राजाच्या यशास आणि तुमच्या पराक्रमास कलंक लागत असतां तुह्मी स्वस्थ बसतां तरी कसे?

बोधा०— तुह्मी असें संदिग्ध भाषण करून आह्मांस संशयांत घालूं नका. जें असेल तें स्पष्ट सांगा एकदां.

विवेक०— आज या मांगांनीं नगरांत आणि राजवाड्यांत बंड केलें. त्याचा प्रतिकार करा आधीं लौकर.

दमा०— काय, राजवाड्यांत?

विवेक०— राजवाड्यांत इतकेंच नव्हे, अंतर्गृहांत ही.

बोधा०— अरे दुष्टाधमा! इतका उन्मत्तपणा तुह्मी शेवटीं केलाचना! (दमाजीस,) पाहातां काय, दमाजीराव?

(विवेकरावास) त्या चांडाळानें काय केलें राजवाड्यांत?

विवेक०— ऐका महाराज, काय केलें तें.

श्लोक. (वसन्ततिलका)

सुप्ता नृपाळ युवती सदनांतरंगी ॥
कांतारिं[1] भीतिविगता[2] जणु त्या कुरंगी ॥
तैं पंचबाण कुसुमायुध व्याध सा तो ॥
मारी उरोजिं शर व्याकुल त्या करीतो ॥ ३४ ॥

बोधा०— त्या चांडाळानें असें अघोर कर्म केलेंना?

विवेक०— इतकें करून तरी राहिला असें नाहीं.

बोधा०— तर आणखीही कांहीं अकर्म केलें कीं काय?

विवेक०— अकर्म केलें इतकेंच नव्हे.

बोधा०— तर?

विवेक०— महाराज, अकर्म, अकार्य, आणि असह्य, असें कर्म केलें.

बोधा०— हाँ! तर मग त्यांचीं भरलीं शंभर वर्षें, मला वाटतें. पण ऐकूं द्या तर खरें काय तें.

विवेक०— साकी.

निशींत महिषीसह नृप निजला बिलासवाटी[3] माजी ॥
प्रवेश तेथें मध्य शार्वरी[4] होतां करि कामाजी ॥ १ ॥ ३५ ॥

दमा०— तो पापी तेथें गेला, आँ?

शमा०— अहो, तो तर दुरात्माच आहे. पण राजास कसें हें मानवलें?

---

१ रानांत. २ निर्भय. ३ क्रीडावन. ४ मध्यरात्रीं.

बोधा०—सामान्य मनुष्या ठायीं सर्वदां अभेद बुद्धि आहे.

विवेक०— तें खरें, पण तेथें जाऊनच उगा असता तरी बरें असो.

दमा०— तर, तेथें ही जसा मरणोन्मुख झालेला सर्प यो-ग्यायोग्य न पाहातां सर्वांसच दंश करावयास जातो, तसें याणेंही कांहीं दुष्ट कर्म केलें असावेंसें वाटतें.

विवेक०— होय; ऐका सांगतों काय केलें तें.

साकी.

उचलुनि शय्या निद्रित महिषीसह ती सौधीं नेली ॥
सुमा निज भगिनी मायेला नृपशय्यास्तिथ केली ॥३६॥
ज्ञात न हें भूपाला आजुन वाटे मन्मतिलागीं ॥
गेलों अंतर सदनीं मजला वदली तइं माता-गी ॥ ३७ ॥

बोधा०— अहो, पण तुह्मी तरी प्रभूला जागृत करून हें ज्ञात करावें कीं नाहीं ?

विवेक०— केलें असतें; पण काय करूं ?

श्लोक. [ पृथ्वी. ]

कडी कुलुप लावुनी ह्मणतसे विलासामधीं ॥
सुसुमनृप जावया जवळ बाहिरूनी कुधी ॥
निवारित फिरे जना मदन पाणीमाजी असी ॥
धरून तइ जावया मति मदीय होते कसी ॥ ३८ ॥

बोधा०— बरें, विचारराव कुठे आहेत ? त्यांणीं तरी रा-जास जागृत करून हें वृत्त सांगावयाचें होतें.

विवेक०— महाराज, ते अंतरसदनीं नृपांगना व्याकुळ झाल्या ह्मणून त्यांचें सांत्वन करावयास गेले आहेत.

---

१ राणी. २ बाणी. ३ दुष्टबुद्धी.

बोधा०— तर, आपण हें वर्तमान त्यांस कळवून सत्वर आनंदवनांत जावयास विनंती केली आहे, असें सांगावें.

शमा०— हें काय बोलणें! अहो, विचारराव तरी तेथें जाऊन काय करतील, बरें?

बोधा०— काय करतील ह्मणजे! प्रभूस जागृत करतील.

शमा०— ठीक. परंतु कामाजीच्या करांतर्लीतून निभावून जातील तेव्हांना?

बोधा०—तर काय, तो त्यांसही अपकार करील, ह्मणतां?

शमा०— नाहीं तर काय सोडील?

दमा०— त्याची काय आज्ञा आहे, तसें करावयास?

शमा०— जें कांहीं सर्व त्याचें केलें तें करण्यास जशी त्याची आज्ञा होती तशीच, हेंही करण्यास आहे, असें समजा.

बोधा०— शमाजीपंत ह्मणतात तें खरें. त्या दुष्टासच पहिल्यानें आकळून टाकलें पाहिजे.

दमा०— आज्ञा होईल तर हा मी सिद्ध आहें.

श्लोक. (समानी.)

पाद- पाणि आकळून, त्यास आणतों धरून ॥
तोडुनी कडी- कुलूप, मोकळा करीन भूप ॥ ३९ ॥

बोधा०— फार उत्तम. तुह्मी स्वतः जाऊन त्या लुटारू कामाजीस आतांच मुसक्या बांधून आणा. (विवेकरावांस) तुह्मी विचाररावांस विनंती सांगा, कीं दमाजीरावांबरोबर जाऊन आनंदवनांत स्वामीस जागृत करून हें सर्व वृत्त निवेदन करा.

( इतक्यांत विचारराव पांढरा पोशाक करून येतो. )

विवेक०— महाराज, हे पाहा, विचाररावच हिकडे येत-आहेत.

दमा०— ( विचाररावास ) आपले आगमनाचीच मार्गप्रतीक्षा करीत होतों.

बोधा०— ( सानंदित होऊन. )

### श्लोक. ( द्रुतविलम्बित )

उघडितां निज चंचुपुटाला ॥
चातकें घनचि त्यामधिं आला ॥
चिंतितां मनिं तवागमनाचा ॥
लाभ त्यापरि गमे मज साचा ॥ ४० ॥

शमा०— ( विचार रावांस अभिवंदन करून, ) तुम्ही नसल्यामुळें आम्ही केवळ मुग्ध होऊन बसलों होतों; आतां, तुमचे येण्यानें कृतकार्य झालों.

### श्लोक. [ शिखरिणी ]

तनूला चैतन्याविण न करणें काज किमपी ॥
जरी सार्थ होती रुचिर करणें साह्य तदपी ॥
सुकार्यें मंत्र्यांनीं कधिं न घडती सर्व हि तसीं ॥
विचारा वांचूनी जरि बसति ते भूप सदसीं ॥ ४१ ॥

विचार०— असें कां ह्मणतां ! आपण आहां तेथें मी आहेंच. आपणापासून कांहीं भिन्न नाहीं.

---

१ इंद्रियें.

बोधा०— तुह्मासारखे प्रभूपाशीं असून असें घडलें, हें मोठें आश्चर्य वाटतें.

विचार०— यांत आश्चर्य कांहीं नाहीं. या मांगांचा पूर्ण विनाशकाळ आला आहे. [1]त्याप्रमाणें त्यांस वर्तणूक करण्याची बुद्धि झाली.

## ओंव्या.

आलिया विपरीतकाळ, दर्दुर धांवे सर्पाजवळ ॥
प्राण- हानीचा चि वेळ, ह्मणोन बुद्धी ऐसी त्या ॥४२॥
आयुष्यदोरी तुटली, आपणची व्याघ्रबिळीं शिरली ॥
अजा तीचा न होतां बेळी, वांचेल काय मज सांगा॥४३॥

शमा०— त्या कृतघ्नांचा अंतकाळ जवळ आला, यांत अगदीं संशय नाहीं.

दमा०— ( सायुध पुढें येतों ) महाराज, या पोकळ गोष्टी कशास पाहिजेत आतां ! आज्ञा करावी कायती, ह्मणजे शेवटच करून टांकतों. ( भंवया वर चढवतो. ) या चांडाळानें फारच दुःख दिलें आहे. यास चांगली मेजवानी दिल्याशिवाय माझा हात मला स्वस्थ बसूं देत नाहीं. ( उजवा बाहु फुरफुरतोसा दाखवितो. ) हा पाहा, मी असाच निघालों.

विचार०— चला, त्यास ( कामाजीस ) एकदम आकळून टांका. कड्याकुलुपें विवेकराव तोडून टांकतील, आणि मी स्वतः जाऊन राजास जागृत करतों.

---

१ नाश.

**बोधा०—** ( विचार रावांस ) आज असें झालें पाहिजे, कीं त्या चांडाळाचा देह पुनः दृष्टीस न पडेल.

**शमा०—** या मांगाचा पायच काढून टांका एकदां, ह्मणजे आह्मी हायसे होऊं.

**विवेक०—** शमाजीपंत ह्मणतात तसें होण्यास राजमंदिरांतून या रांडे बटकीचाच पाय अगोदर कापून टांकला पाहिजे.

**बोधा०—** होय, ही मांगीण राजगृहांत रात्रदिवस असणार हें तर अगदींच अप्रशस्त.

**विचार०—** त्याचा सर्व बंदोबस्त आतांच होईल. मी प्रभूला पूर्वींच याविषयीं विनंती केलेली आहे.

**दमा०—** आपण प्रभूला मात्र जागृत करावें. मी आपले समागमें येऊन बोधाजी रावांचें मनोगत सर्व सिद्धीस नेतों.

**विचार०—** चला, हा मी आलों. ( असें ह्मणून ते उभयतां विलासवनासंनिध येतात. )

**कामाजी०—** ( त्यांस पाहून ) या, या, पुढें या, जीवनाशा नसेल, तर.

श्लोक. [ इन्द्रवज्र. ]

या, जीवनाशास तयार आहें ॥
हामी तुह्मां मारक मारे पाहें ॥
वांचवया येथ समर्थ नाहीं ॥
कां वेचिनां जीवित व्यर्थ पाहीं ॥

**दमा०—** अरे चांडाळा, मांगकुलोत्पन्न कृतघ्ना, तूं आज-

---

१ काम.

पर्यंत हजारों तापसी जे बिचारे कंदमूलादि भक्षण करून निरुपद्रव, विपिनांत स्वेच्छा विहार करणारे, अशांस पंचबाणानें जसा पारधी मृग मारतो तसे निर्दयपणानें मारून टाकिलेस. अरे दुष्टा, त्वां राजाश्रयाचे बलानें या नगरांतील कित्येक सज्जनाचीं सुकृत- भांडारें लुटून फस्त केलींस. अरे, सर्वत्र मान्य असा, जो आपला सेनापति त्याशीं विरोध करून त्यास जाळून टाकण्याची मसलत केली. आणि आतां तर आपल्या कंठासच सुरी मारल्याप्रमाणें या सर्वज्ञ प्रभूला अवरोध केलास, तर आतां, तूं परिच्छिन्न वांचावयास योग्य नाहींस.

### श्लोक. [ स्वागता. ]

विधिशी हरिणिशा अबलांसी ॥
वंचिशी शुचि उपासक यांसी ॥
त्या अघें अजि यमालयि त्याचा ॥
पाशबंधन करीं तव काया ॥ ४५ ॥

( असें ह्मणून पाश घालून त्यास करकरां बांधून टांकतो आणि विलासवनाचें द्वार मोकळें करतो. )

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

अहो सकळ सभानायक, जो संपूर्ण स्थावरजंगमास सुख देणार, जो सज्जनचातकांस आनंदघन, ज्याचे नाममात्रें करून दुष्ट अरिष्टें नष्ट होतात, तो शिवाजीराजा निद्रेची पूर्णता करून जागृत झाला, आणि विचार रावांचें चिंतन करीत आहे.

विचार०— काय, माझें चिंतन स्वामी करतात ? धन्य प्रभु दयावंत, कीं आह्मावर ज्याची इतकी दया ! ( असें ह्मणून पुढें जातो आणि प्रणामकरून, ) स्वामीचा जयजयकार असो.

( इतक्यांत शिबिकेंत बसून निवृत्तीराणी येन्ये. )

शिवा०— हाँ ! ( विनोदानें ) आह्मास येथें टाकून कोणता विलास करण्या करितां स्वारी गेली होती.

निवृ०— ( संतप्त होऊन, ) जळोगे मेलें माझें जिणें; मरतें तरी सुटतें.

शिवा०— हे चारुशीले, आज तुझी इतकी संतप्त मुद्रा कां झाली बरें.

विचार०— ( मनांत संतोष पावून, ) राणी साहेबांचा मुखचंद्र इतका प्रकुपित झालेला आह्मी कधींही पाहिला नव्हता.

निवृ०— विद्युत्तेजाप्रमाणें वन्हिज्वाळा पेटवून मुखचंद्र प्रकुपित झाला कां ह्मणून विचारणें, हें मोठेंच सत्काराचें लक्षण!

विचार०— या सेवकापासून कांहीं तसा अपराध तर घडला नाहीं, असें मला वाटतें.

निवृ०— सेवकापासून घडला नसला, आणि सेव्यापासून घडला ह्मणून काय झालें ?

शिवा०— काय मजपासून घडला तर ?

दिंडी.

काय साध्वी त्यां त्वपदराध केला ॥
जेथे इतका हा कोप तुतें आला ॥
तप्तकिरणाहून आज अधिक झाला ॥

तुझा आस्येंदु पिकवि को मनांला ॥ ४६ ॥
सुधावृष्टीतुनि सरस जीववाया ॥
कृपादृष्टीआलोकन जना या ॥
तुझें भासे तें आरक्त ईहराया ॥
काय झालें उत्सुक से क्षणा या॥ ४७॥

निवृ०— ( स्फुंदस्फुंदून ) असा उपमर्द सोसून वांचणें, त्यापेक्षां मरणें[1] बरें, मला वाटतें.

शिवा०— काय उपमर्द झाला ? कोणी केला ? प्रिये, बोल तर खरें.

निवृ०— जळी मेली बटीक शेजेवर निजली तर मग काय बायकांनीं जीव द्यावा ?

शिवा०— हे माझे मनोरमे, असें मजपासून कधीं तरी घडलें आहे काय ?

निवृ०— कधीं घडलें आहे कीं नाहीं तें कोण जाणे पण ( डाव्या पायानें बिच्छान्यावर लत्ता प्रहार करून, ) हें काय ? प्रत्यक्ष पाहावें डोळ्यांनीं ह्मणजे झालें.

माया०—अरे देवा ! हें काय ? ( असें ह्मणत घाबरून डोळे पुशीत उठत्ये. )

शिवा०— ( साश्चर्य आणि सक्रोध होऊन खालीं मान घालतो. )

निवृ०—माझ्या मनांत त्याच दिवशीं संशय उत्पन्न झाला, जेव्हां स्वामींनीं या टवळीला ह्मटलें-

पूर्वोक्त श्लोक ह्मणते.

तुझ्या संगें हिंडे नगरिं वनिं आणी गिरिकडे ॥

---

१ पाहणें.

निवृत्ती ठेवोनी कांधं घडिभरी ही पलिकडे ॥
अकर्मा कर्मातें करि शितिबरी नीतिनय हा ॥
सुपोषीं अश्वासीं म्हणुन सुजनाऽनंदित रहा ॥

ही जोडा पुसणारी बटीक हिच्या बरोबर असा व्यवहार होऊं लागल्यावर आम्हा बायकांचा कसा बरें जीव जळणार नाहीं?

शिवा०— ( अत्यंत क्रोधाविष्ट होऊन, मायेस, )

श्लोक. ( इन्द्रवज्रा )

दुष्टे अमर्यादपणास तुझे ॥
या आणि त्या साह्यकरास माझे ॥
शिक्षा असह्या[1] करतील पाणी[2] ॥
रक्षावया शक्त जगीं न कोणी ॥ ४८ ॥

मायाऊ० — ( रोदन करीत ) या दासीला क्षमा असावी. कोण जाणे निर्जंत काय झालें कीं मला तर कांहींच स्मृति नाहीं.

( इतक्यांत दमाजीराव कामाजीस हातपाय बांधून शिवाजीराजा समोर घेऊन येतो.)

दमा० — राजाधिराजाचा जयजयकार असो. या सर्व-कृत्यास मूळ जो चोर, तो हा म्यां बांधून स्वामीसमोर आणला आहे. आतां यास योग्य शासन करण्यास मात्र आज्ञा व्हावी.

विचार० — स्वामीसन्निध माझी बोलण्याची तर मती नाहीं. परंतु या दुष्टास जीवंत ठेवला असतां सर्व प्रजा दुःखी आहेत इतकेंच सुचविणें आहे.

---

१ दुःसह. २ हात.

दम्मा॰ — सांप्रत याणें आणि याच्या भावानीं जें कांहीं लोकांस त्रासविलें आहे तें माझ्यानें आतां बोलवत देखील नाहीं.

विचार॰— या मांगास शहराबाहेर काढून लावणें हेंच स्वामीस सांप्रत उचित असें मला वाटतें. या कामाजीनें तर काल रात्रीं सरकारच्या अंतर्गृहांत देखील धांदल केली, आणि स्वामीस ही पाहा कसें मोहांत घातलें तें—

पूर्वोक्त साकी ह्मणतो.

उंचलुन शय्या निद्रित महिषीसह ती सौधीं नेली.॥
सुप्ता निचभगिनी मायेला नृप शय्या स्थित केली. ॥

आतां याहून दुसरा कृतघ्नपणा तो कोणता? अशा दुष्टास देहांतच शिक्षा झाली पाहिजे, महाराज.

( इतकें भाषण होतांच प्रभूचे मुखांतून शिक्षेचीं अक्षरें काय येतात तीं ऐकण्यास सर्व तटस्थ रहातात. )

शिवा॰ — ( अत्यंत क्रुद्ध होऊन प्रलयकाळच्या सहस्र किरणांप्रमाणें आरक्त नयनांनीं कामाजीस अवलोकन करून ह्मणतो, )

अरे मांग कुलोत्पन्नाधमा, तूं मांगजातीय असूनही म्यां तुला अभेद भावानें इतक्या मोठ्या योग्यतेस चढविलें, तुझ्यावर विश्वास ठेऊन अंतर्गृहांत ही फिरण्याची तुला मोकळीक दिली, तुझ्या बांधवांस ही मोठमोठीं कामें दिलीं, असें असतां, त्वां हा असा कृतघ्नपणा करावा काय? अरे चांडाळप्रमुखा, त्वां आजपर्यंत पुष्कळांस नागवून फस्त केलेल्या फिर्यादी

शतशः माझे कामीं आल्या असूनही, त्यां त्यिकडे काणा डोळा केला, आणि तुला ठेवलें. परंतु त्वां जें हें परम कृतघ्नपणाचें आणि राजद्रोहाचें कृत्य आज केलें त्याजवरून, आणि या सर्व राजकाजकुशल माझ्या मंत्री जनांच्या सांगण्याप्रमाणें त्वां आणि तुझ्या बांधवांनीं जें प्रजापीडन केलें त्याजवरून, सर्व तुह्मी शिक्षेस पात्र आहां ह्मणून मी शासन प्रदर्शित करतों.( प्रधानमंडळीस,) सर्वत्रांनीं सावधान चित्तें श्रवण करून तदनुरूप वर्तन करावें.

श्लोक. [ शिखरिणी ]

कृतघ्ना कामाचें दहन वपु आधीं बुध करा ॥
करी जो दीनीं रात्रि जनिं अपरीहार निकरा ॥
सबंधू माया ही तदनुकुल कांतारिं दवडीं ॥
मदीया ही आज्ञा कळविं पुरिं धाडूनि दंवडी ॥४९॥

( ही शासनोक्ती मुखांतून निघतांच प्रभूच्या नयनांतून विद्युत्तेजासारखी अनलज्योती निघाली आणि जाळीतच सुटली इतक्यांत.)

दमा०—[ पुढें होऊन ]

ओवी.

मदन ठेविला बद्ध करून, त्यावरी शुष्क तृण घाली आणून॥
तों तत्काळ क्षोभला कृशान, कायादहन करावया ॥ ५० ॥

बोधा० — ( दमाजीस) शाबास दमाजीराव. तुह्मी स नगरांतील जनांचा शत्रु आणि अस्मत् हृदयांती कांटा काढून टांकला. आतां, याचे बांधवांस आणि भगिनीस ही राजाज्ञेप्रमाणें नगरांतून काढून द्यावी.

दमा० — आज्ञा महाराज, तें सर्व मी करतों.

शमा० — तें सर्व दमाजी राव करतील. ( विचाररावांस. ) आपले साह्यानें तें सर्व पार पडेल.

बोधा० — आपणांस श्रम दिल्हे याची क्षमा असावी.

दमा० — आज्ञावर दया आहेच, त्या पक्षीं सर्व अरिष्टें निरसन होतील. हा सेवक सर्वदां सर्व कामीं सादर आहे.

बोधा० — ( विचाररावास )

### श्लोक. [ विषमवृत्त ]

अरि विमर्दनसिंधुजलातें॥
साह्यते तुमचिया निजहातें॥
पोंहलों अजि कृतार्थ जाहलों॥
स्वामिचे प्रिय सुखास लाहलों॥ ५१॥

( असें ह्मणून सर्व निघून जातात. )

## अंक तिसरा समाप्त.

तिसऱ्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पदे. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३१ | ३ | ४ | ४ | ६ | २ | १ | ५१ |

# सायुज्यसदननाटक.

## अंक ४.

### स्थळ.

### भवारण्य.

### पात्रें.

राघोजी नाईक .. .. .. .. .. .. .. मांग.
मदाजी .. .. .. .. .. .. त्याचा धाकटा भाऊ.
कुतकाजी .. .. .. .. .. .. राघोजीचा चाकर.
मसाजी .. .. .. .. .. राघोजीचा दुसरा भाऊ.
लुमाजी .. .. .. .. .. .. .. राघोजीचा तिसरा भाऊ.
मोहनाजी .. .. .. .. राघोजीचा चवथा भाऊ.
कामाजी नाईक .. .. .. राघोजीचा वडील भाऊ.
माथाऊ .. .. .. .. .. .. ..राघोजीची वडील बहीण.

# सायुज्यसदननाटक.

## अंक १.

[ हातांत ढाल तलवार घेऊन राघोजी नाईक, आणि मद्राजी येतात. ]

**राघोजी**०—[ तलवार लटकवीत हिकडून तिकडे फिरतो. ] तो लुच्चा टेहेळ्या आह्मास शोधीत आला होता त्याचें तर बरोबर झालेंच. आतां आमचा मागसोस कोणासच समजणार नाहीं. या रानांत आतां आपणास पाहिजे तसें वागण्यास कोणाचें भय आहे ? आपण आपला अम्मल थोडथोडा बसवून सत्ता तर चालू करूं या. हें अरण्य तर आह्मा मांगांस वसाहतीस ह्मटलें ह्मणजे फारच सोईचें. येथें आह्मी पाहिजे तसें जरी वर्तन केलें, तरी विचारता पुसता कोणी नाहीं. आह्मी वनचे राजे खरोखरच बनलों आतां, नव्हेरे मद्या ?

**मद्राजी**०— यांत काय संशय ? पण दादा, पाहा शिवाजी राजा आपणावर किती दयाळु आहे तों ? हे प्रधान लोक जरी आपणावर इतके वक्र आहेत, तरी त्याणें आपणाविषयीं ह्मणाल, तर किती चांगली सोय केली बरें ! हें एवढें मोठें भवारण्य आह्मास अक्षयी इनाम दिल्हें. मला वाटतें कीं त्याचें मनांत आह्मास येथें बलाढ्य करून ठेवावें, आणि कदाचित् या प्रधानां·

चें वर्चस्व झालेंच तर आमच्या हातानें त्यांच्या थोबाडांत मारवावी असें आहे. राजास तरी हे प्रधान कोणत्या वेळीं काय करतील नकळे ह्मणून मोठी काळजीच आहे; कां कीं—

श्लोक. ( पृथ्वी. )

बलाढ्य मतिनें अणी करिं समग्र सत्ता असे ॥
कदाचित् निजांकित प्रभुस हि कराया वसे ॥
प्रधानमनि कातरी ह्मणुन भूप ऊपाय त्या ॥
नियोजि अनुगोन्य वाढवुन वेळि संहार त्या ॥ १ ॥

राघो०— असा तर्क दिसतो खरा. जेव्हां मला नगरांतून आण्यास निदेश केला, तेव्हां प्रभूनें आपले उजवे हातानें मला या अरण्याकडे खूण केली; ती, मला वाटतें, कीं मी येथें येऊन स्वछंद क्रीडावें आणि डावे हाताकडे समुद्र आहे त्यांत पडून मरून जाऊं नये ह्मणूनच.

प्रद्रा०— यांत काय संशय ? राजास पक्कें ठाऊक आहे, कीं हीं मांगाचीं पोरें सुडावलीं तर त्रैलोक्यास भारी; तर अशांस वाढविलें असतां हीं प्रसंगवशात् मोठे कामीं पडतील, ह्मणूनच त्याणें हें प्रवारण्य आपणास जहागीर करून दिलें.

राघो०— होय, तू ह्मणतोस तसें असेल खरें; पण, राजास प्रसंग तो कशाचा पडणार बरें ?

प्रद्रा०— अरे, प्रसंग कशाचा पडणार ह्मणून काय विचारतोस ? कदाचित् या प्रधानाच्याच मनांत राजावि-

१ कपट. २ प्रधानाहून अन्य.

षयीं असूया उत्पन्न झाली, आणि त्यांणीच जर राजास पदच्युत करून आपण गादी बळकावली तर !

राघो०— ही बरीक गोष्ट संभवते खरी. मला वाटतें, ह्मणूनच त्या बोधाजी रावाच्या पोटांत आह्माविषयीं इतका हेवा उठला तो.

मदा०— हेवा नाहीं उठणार कसा, दादा ? त्याचे मनांतून एकवेळ या मांगांचें कूळ निर्मूळ केलें, ह्मणजे सर्व राज्य अकंटक झालें असें होतें.

राघो०— पण, त्याचे मनांत राज्य अकंटक व्हावें असें येऊं नये; जर राज्य अकंटक झालें, तर राजास सेनापतीची आणि सेनेची गरजच नाहींसारखी होईल; याजकरितां सुज्ञ प्रधान असतात, ते राज्यांत बंडावीं आणि राजास संकटप्राप्ति होण्याची इच्छा नेहमी करीत असतात.

श्लोक. ( मत्तमयूर. )

मंत्री माना भूप अमित्रा जइं पावे ॥
नाशाया त्या सत्वर ये धांवुन पावें ॥
ऐसा बोले आर्जवुनी हो मग मानी ॥
मोठा इंद्राहून तदां आपण मानी ॥ २ ॥

मदा०— हाँ; जो प्रधान मानधनाचीच इच्छा करतो त्याची अशी गोष्ट खरी.

राघो०— तर काय, बोधाजी रावास मानधन आवडत नाहीं ?

मदा०— आवडत. नाहीं कसें ? आवडतें; पण राज्य-

लक्ष्मीच माप्त झाली ह्मणजे तिच्या मागून तें आपें-आपच येतें, हें त्यास चांगलें ठाऊक आहे.

श्लोक. ( रथोद्धता. )

कीर्तिमानगुण लोकिं सर्व ही ॥
आलिया करिं अकंटका मही ॥
येति आपणच अप्रयत्न तीं ॥
पुष्प जेवि समवेत मालती ॥

राघो०— तर काय, तो आपणच राजा होण्याची इच्छा करतो ?

मदा० यांत काय संशय ! त्याची मसलत अशी होती कीं या मांगांस ठार करून टांकलें ह्मणजे आपणास प्रति-कार करणार कोण आहे ? कोणी नाहीं. मग आपण राजास पाहिजे तसा वळवूं. कदाचित् अधिक उणें करील तर अडकवून टांकूं, आणि आपणच राजा होऊन बसूं ह्मणजे झालें सर्व राज्य आपलेंसें.

राघोजी.— आतां मी चांगलें समजलों. आह्मी जातीचे मांग असून राजाचे नातलग पडलों, ह्मणून त्यास डोईजड तर खरेच. आह्माबरोबर काय त्याच्यानें कमर बांधवते ? तें तर घडणेंच नाहीं, ह्मणून त्या-णें ही अशी कपटाची मसलत केली होती; पण, काय चिंता आहे ! त्याला हात दाखवूं तर आह्मीच दाखवूं.

[ इतक्यांत पडद्यापलिकडे मोठा प्रकाश पडतो. ]

मसाजी.— दादा, हा बरें, मोठा प्रकाश कशाचा पडला असावा ?

राघोजी.— ( टोंकावून पाहतो ) अरे मद्या ! मला वाटतें हा दावानल भडकला; अरे, आतां कसें होईल ?

मद्राजी.— दादा, जर दावानलच असेल, तर फार चांगलें.

राघोजी.— कसेंरे, चांगलें ?

मद्राजी.— आपली भोजनाची निश्चिति होईल; आणखीं काय ?

राघोजी.— मद्या, तूं ह्मणतोस तरी काय ? अरे, वणवा पेटला ह्मणून जेवणाची निश्चिति ती कसी होईल ?

मद्राजी.— ऐका, कसी होईल, ती. तिकडे दावानल भडकला, ह्मणजे त्याच्या भयानें सांबर, हरिण, डुकर इत्यादि नानाप्रकारचे मृग पळून आपेंआप हिकडे येतील, ते आह्मास पारधीस जाण्याची मेहेनत केल्याशिवाय बसल्याजागीं भक्षावयास मिळतील, नव्हे काय ?

राघोजी.— अरे मद्या, एकूण तुझ्या मतें आह्मास जें पाहिजे, तें आमचें दैव बसल्याजागीं देत आहे नव्हे ?

मद्राजी.— होय, हें पाहाना प्रत्यक्ष.

[ असें ह्मणून उभयतां उजेडाकडे पाहात बसतात. ]

[ हिकडे कुतकाजी खांचेंत लपला होता तो सर्वत्र सामसुम झालें, असें पाहून वर उठतो, आणि चहूंकडे अवलोकन करतो, हा पूर्व कथेचा संबंध. ]

कुतकाजी.— मी माझ्या धन्याच्या शोधार्थ ह्मणून या अरण्यांत आलों. हिकडे तिकडे पुष्कळ फिरलों, तरी, कुठेच ठिकांण लागत नाहीं, आतां करावें तरी काय ? तरी बरेंझालें, एक अपमृत्यु टळला. त्या निर्द-

याचा तो तेवढा झपाटा जर चुकला नसता, तर मग झालेंच होतें. पण, धन्याचें दैव मोठें. बरें, हा मोठा उजेड कशाचा दिसतो? कोणी शिवाजी राजाच्या नगरास आग तर लावली नाहींना? (वर आकाशाकडे पाहून) होयरे, होय, हें तसेंच कांहीं दिसतें; तें कांहीं कां होईना बरें? सध्या आपणास थोडासा उजेड तर झाला; मार्ग, वृक्ष, गुहा, स्पष्ट दिसूं लागल्या; इतक्यानें माझे यजमानाचा शोध करण्यास मला मोठेंच साधन झालें.(पुनः आकाशाकडे पाहून) अरेरे! घात झाला. ही राजनगरीच जळत आहे; तर आतां राजवाडा ही ज्यास हिऱ्याचे खांब, माणकांच्याभूमि आणि वैडूर्याच्या भिंती; ज्यांत राजा शयन करीत असतो तोही जळाला असेल. त्याचें तर मला कांहीं नाहीं ह्मणा. पण आपले मायाऊ आकाचें बरें कसें झालें असेल? (जरा हिकडे तिकडे अवलोकन करून) होय, राजा झोपी गेला, तेव्हां ती पादसंवाहन करीत होती, ती देखील जळाली. खरोखर जळालीरे! जळून राख झाली. (मोठ्यानें रडूं लागतो) अगे आमचे मायाऊ आका, आतां, मी तुला कुठें पाहूंगे? अगे आमच्या हातानें कसेही अपराध झाले तरी तूं राजास समजावून सांगून आमचें रक्षण करीत होतीस. आह्मास ताहान भूक विचारीत होतीस, ती आतां कुठेगे गेलीस। अगे, म्यां काय करावें आतां! तुझे बिचारे भाऊ आज उघडे पडले, त्यांचें रक्षण कोण करील? माझा राघोजी दादा तरी जीवंत आहेना किं त्या चंडाळा राजदूता-

चा झपाट्यांत सांपडला कोण जाणे.

(हिकडे राघोजी नाईक हें भाषण ऐकतांच आवेशानें उठतो)

**राघोजी.**— काय त्याच्या झपाट्यांत मी सांपडणार? तो मला मारणार? जाऊंद्यारे, त्याचे केव्हांच दोन तुकडे करून टांकले. हा पाहा, राघोजी तर जीवंतच आहे, अद्याप.

## आर्या.

कोण असे भुवनत्रयिं माराया यास शक्त सांग मला ॥
अनभिज्ञा अरिकरिला शार्दुल हा तुज अशक्त सा गमला॥४

**कुतकाजी.**— (ऐकून) अहो, हा बरें कोणाचा शब्द? आमच्या राघोजी दादासारखाच अगदीं वाटतो.

**राघोजी.**— अरे, हा राघोजी तोच मी; मूर्खा तूं कोण आहेस, अनभिज्ञा?

**कुतकाजी.** — ( मुखाकडे अवलोकन करून ) आँ, राघोजी दादा तुह्मी हे खरेच का, माझे यजमान?

**राघोजी.** — ( त्याच्या मुखाकडे पाहून ) अरे, हा कोण, माझा कुतकाजी? अरे बेट्या, तूंरे कुठे होतास?

**कुतकाजी.** — जी दादा तुमचा गुलाम हा, येथें आहें.

**राघोजी.** — बरें, खुशाल आहेसना?

**कुतकाजी.** — मी तर खुशाल आहें. पण दादा, आपली मायाऊ आका ( असें ह्मणून मोठ्यानें हांबसांहांबसीं रडूं लागतो ) अगे माझे मायाऊ आका! तूं कुठेगे गेलीस? मी तुला आतां कुठेगे पाहीन?

**राघोजी.**—( गहिंवरून)अरे नीट बोल, आहे तरी काय?

### श्लोक.

सांदिग्धें भाषणें आह्मा कां शोकार्मीत जाळसी ॥
स्पष्टबोल गती तीची आतां बा जाहली कसी॥ ५ ॥

**कुतकाजी.**— ( त्या मकांशाकडे हात करून मोठ्यानें हंबरडा फोडतो) ती पाहा, ती जळत आहे.

**राघोजी.**— अरे दुर्दैवा, कायरे अनर्थ हा !( धाडकन जमिनीवर पडतो ).

**मदाजी.**— धांवत त्यांपाशीं येतो. ) दादा सावध व्हा, सावध व्हा. ( ताडाचे विझण्यानें शीतळ वारा घालुन त्यास सावध करितो ). ( कुतकाजीस ) कायरे कुतका, हें काय केलें त्वां ?

**कुतकाजी.**— ( जिभेस कुरचा घेतो ) म्यां कांहीं नाहीं केलें, दादा, ती आपलि मायाऊ आका जळत आहे, ती दाखवली मात्र हातानें. गेली बिचारी; ती आतां कुठून येणार ?

**मदाजी.**— मुर्खा, बरळतोस तरी काय ?

**कुतकाजी.**— ( उजेडाकडे हात करून ) ती पाहा, तिकडे प्रत्यक्ष डोळ्यांनीं बापडें, मी खोटें बोलतों असें वाटत असेल तर.

**राघोजी.**— ( सावध होतो ) अहा दैवमाते, आज तूं आह्मा मांगाच्या पोरांस पराङ्मुख तरी कसी झालीस ?

### साकी.

जी स्तन्या निज पाजुनि शिशुला वाढवित प्रेमानें ॥
काय तिणे मरुं द्यावें परकारें करवुन त्या विषपानें ॥६॥

( मातक्यान मोह पावून रडूं लागतो, आणि भगिनीचे गुण आठवितो. )

### दिंडी:

तुझी मजवरती मायहुनी माया ॥
अहा गेलिस टाकून कवणे ठाया ॥
दयावंते आतां मि तुज पहाया ॥
करुं कोण्यातरि सांग गे उपाया ॥ १ ॥
येथें येतांना नमन तुला केलें ॥
मातें त्वां तइ आशीर वचन दीलें ॥
होंशि विजयी मधुर अशा बोलें ॥
कसें त्याचें विस्मरण आजि झालें ॥ २ ॥
तुझें अनुकंपातोय विमल मातें ॥
होतें मीनाला चटुल सौख्य दातें ॥
दैवभानू तापून शुष्क होतें ॥
धरूं तइं मी कैशान जीवितातें ॥ ३ ॥ ॥ ९ ॥

मदाजी.— दादा, तुह्मी असें धैर्य सोडूं नका. अहो, मायाऊआका कांहीं साधारण बायको नव्हे, कीं ती जळून जाईल. हा कुतकाजी केवळ गयाळ आहे. यास श्वेत असतें, तें कृष्ण भासतें; याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तुह्मी हा असा शोक करतां यास ह्मणावें तरी काय !

कुतकाजी.— काय, मी खोटें बोलतों ! जीभ कापून टाकीन माझी. तो पाहा डोळ्यांनीं, भडका चालला आहे तो. ( मातक्यान रडतो ) राजेसाहेबां-

चे पाय चुरावयास बसली होती, ती जळाल्या खेरीज कसी राहील, राजमहाल जळाल्यावर ?

मदाजी.— हा मूर्ख, जशा इतर साधारण बायका तशीच आमची मायाऊआका समजतो.

कुतकाजी.— नाहीं नाहीं; मी बायकांप्रमाणें समजत नाहीं. ( शपत घेतो ) ती आमची मातुश्री समजतों, महाराज !

मदाजी.— मूर्खा, तसें नव्हे. आमचे आकाचा पराक्रम अलौकिक आहे ह्मणून ती जळून जाण्याचा संभव देखील नाहीं; आणि तूं ह्मणतोस, हें होईल तरी कसें ?

श्लोक. [ इन्द्रवज्रा ]

बोधादिकांलागिं हि जी न मोजी॥
जीतें ह्मणे काळ सदा नमो जी ॥
जाळूं नसे शक्त तिला कृशान ॥
भासे तुझा बोल मृषा समान ॥ १० ॥

कुतकाजी.— मला, बाबा, संभव आणि असंभव, शक्त आणि अशक्त, हें कांहीं नकळे; प्रत्यक्ष डोळयांनीं पाहा ह्मणतों, पाहिजे तर. नाहीं पाहिलेंत, तर तुह्माला कुठुन दिसेल ? पाहील त्याला दिसेल. आणि दिसेल, तो पाहील.

( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठा रोदनाचा गलबला होतो.

( सर्व दचकून हिकडे तिकडे पाहूं लागतात. )

राघोजी.— ( कुंतकाजीस ) अरे, हा कशाचा गलबा आहे पाहा.

कुतकाजी.— हें कांहीं अरिष्ट उद्भवलें, असें दिसतें, दादा ।

राघोजी.— अरे, अशा बसून गोष्टी सांगूं नको. जरा पाहून तर ये, काय आहे तें.

कुतकाजी.— जी आज्ञा, हा जातों.( आपणासीं ) एक॰ वेळ त्या दुष्टाच्या हातून वांचलों, पण आतां भली- गत दिसत नाहीं, पण करणार काय, चाकरी पतक- रली तेव्हां?

## ओव्या.

जेव्हां पथकरली सेवा, तेव्हांच वेच केला जीवा ॥
आतां तया भयास्तव वानवा, करून फळ तें काय ॥११॥
पशुपक्ष्यां करता विक्रय, बहुधा अन्यत्र नर होय ॥
सेवक आपल्या हातें काय, आत्मजीवितासह वेची॥१२॥

( हिकडे तिकडे फिरून आकाशाकडे पाहतो, इतक्यां- त फिरून पडद्यापलिकडे मोठा शब्द होतो. )

अहो भवारण्यवासी जन हो, तुह्मी मोठे परोपकारी आल्यागेल्याचें आतिथ्यआदर करण्याविषयीं अत्यंत तत्पर, अशी तुमची कीर्ति ऐकून आह्मी परित्राणार्थ येथें आलों आहों; तर, आमचें रक्षण करा, रक्षण करा.

कुतका॰—(श्रवण करून आपल्याशीं ) हेंरे, बाबा काय लचांड ? हा, रक्षण करा, रक्षण करा ह्मणून कोण बरें ओरडत येतो आहे? आधिं आह्मास पळतां भोंय थोडी झाली आहे, त्यांत तुझें रे रक्षण कोण करणार ? आ॰

मचेंच कोणी करा रक्षण करवेल तर. पण, गड्या, आपणास त्या आगींत जाऊन उडी टांकण्याचें चुकविण्यास हें ढोंग बरें आहे. आपण परत जाऊन धन्याला सांगूं या तर खरें. कोणी रक्षण करा, रक्षण करा, असा ओरडत येत आहे ह्मणून. मग ते रक्षण करतील पाहिजे तर; नाहीं तर पळून जातील; किंवा जीव तरी घेतील, यांत कांहीं संशय नाहीं. ( घाबऱ्यां घाबऱ्यां धांवत परत येतो ) अहो, हत्यारबंद व्हा, हत्यारबंद व्हा, हत्यारबंद व्हा, धनीमहाराज !

राघो०—
मदा०— ( मनांत किंचित दचकून ) कायरे, काय आहे ?

कुतका०— हें पाहा, मोठें संकट येत आहे.

राघो०—कुठे आहे ?

कुतका०— हें. समोर तुमच्या; आणखी कुठें ?

मदा०—मग, येऊं द्या, तूं काय ह्मणतोस ?

कुतका०— मी ह्मणतों आपण पळत सुटलां आणि ( तोंड हातांनीं दाबून धरतो. )

राघो०— मूर्खा ! काय, आह्मी पळत सुटलों ?

कुतका०— नाहीं; चुकलों, महाराज. क्षमा मागतों; पण हातांत तलवार घ्या, आधीं. उठा, पाहूं.

मदा०— हा गयाळा, तलवार रे कशाला हातांत घ्या आणि तूं पाहातोस तें काय ?

कुतका०— ते पाहा कोण येताहेत ते. त्यासाठीं तलवार घ्या ह्मणतों. राघोजीदादास, कांहीं तुह्मांस नव्हे.

राघो०— ( हातांत ढाल तलवार घेतो ) हा मी सज्ज

झालों. दाखव आतां कुठे काय आहे तें (आंगर-खयाच्या अस्तन्या चढवून)

श्लोक. (द्रुतविलम्बित)

गगनये स्थळिं येऊन कोसळे ॥
असिन दोरिन याक्षणिं त्या बळें॥
करिन चूर्ण शशीरवि- बिंब ही ॥
जरि मला प्रतिकूळ करी मही ॥ १३ ॥

कुतका॰—वः, शाबास माझ्या धन्या; याला शिपायगिरी ह्मणावें (पुढें सरसावून) कोणी रक्षण करा, रक्षण करा, असें ह्मणत ते पाहा येताहेत हिकडे. आतां, तुह्माला हावें तर रक्षण करा; नाहीं तर भक्षण करा, तुमची मर्जी. मी माझा धर्म केला. तुह्मी तुमचा धर्म करा.

मदा॰— काय वाचाळ बेटा! कांहीं तरी बोलतो. धर्म ह्मणजे रे काय?

कुतका॰— धर्म ह्मणजे काय मला ठाऊक नाहींसे वाटतें तुह्माला?

राघो॰— तर सांग पाहूं काय तुला ठाऊक आहे तो?

कुतका॰— होय सांगतों तर काय? ऐका; माझा धर्म तुह्मास दाखवावयाचा.

राघो॰— आणि आमचा?

कुतका॰— तुमचा धर्म? त्याचा गळा कापावयाचा.

राघो॰—}
मदा॰—} (खदखदां हास्य करितात) रक्षण करा ह्मणतात त्यांचा घात! छी! वेड्या.

१ फोडिन.

श्लोक. [ वसन्ततिलका. ]

जे रक्ष रक्ष ह्मणतात तयां शरण्य॥
होतां न मारितिल मोगिति ते अगण्य ॥
अब्दें असह्यगति- रौरव धर्महीन॥
वीरां आह्मांसरखियां करणें तसें न ॥ १४ ॥

कुतका० — मांगांची पोरें असें करतील, तर दुसरे दिवशीं भीक मागतील; महाराज !

श्लोक ( तोटक. )

नकरा समरा, नकरा मृगया, ॥
न नरा सुकरास वधा खगया ॥
ह्मणतील तुह्मा जरि रक्ष असें ॥
अनंहार[1] मराय वनांत वसें ॥ १५ ॥

राघोजी. — आपणास आहार नमिळाला ह्मणून काय अधर्म करावा ?

मदाजी. — धर्माचें उल्लंघन करूनकधीं ही सुख होत नाहीं.

कुतका. — मी तेंच ह्मणतों, महाराज. माझा धर्म मी केला, तुमचा धर्म तुह्मी करा ज्याचा धर्म त्यास मोठा. ज्याची आई त्यास मोठी मला इतके समजतें, धर्म सोडला, कीं उपाशीं मेला.

राघो०— ह्मणूनच मी ह्मणतों. धर्माचें उल्लंघन करूं नये.

---

१ उपाशीं.

कुतका०— मी ही ह्मणूनच ह्मणतों, धर्मानें वर्तणें हेंच श्रेयस्कर.

श्लोक. [ भुजङ्गप्रयात. ]

अहिंसा दया हे अशक्तास धर्म ॥
घडाया तयाला न तें * साध्य कर्म ॥
ह्मणोनी आह्मां क्षात्रजां पाप मोठें ॥
सशक्तां तया, सेवितां ऊफराटें ॥ १६ ॥

आपला मांगांचा धर्म ह्मणाल तर.

श्लोक. [ स्रग्विणी ]

मारितां सन्मुखा आलिया हेतिनें ॥
धर्म मांगांस या सौख्य दे प्रीतिनें॥
[1]स्वीय जो सेवितां सद्यशा वाढवी॥
मेघ वल्ली जशी [2]शारदीं [3]मांडवीं ॥ १७ ॥

मद्या०— शाबास कुतका, अरे हें इतकें नितिशास्त्र त्वां पठण तरी कुठे केलेंस ?

राघो०— आह्मां मांगकुलोत्पन्नामध्यें तूं एक हिराच निपजलास बेट्या. बरें, आतां तूं काय ह्मणतोस ?

कुतका०— ह्मणतों काय ? हूं उठा, देवतेचें स्मरण करा, आणि काय ?

१ आपला. २ शरत्काळीं. ३ मांडवावर. * हिंसाव अदया.

मद्दा०— दादा, सेवक असावा तर या कुतकाजी सारखाच. नाहीं तर काय मेले गंडये.

कुतका०— ( आपणासीं ) हा गंड्या नव्हे तर काय गंड्याचा बापूस ! रडतात कोण तें पाहाण्यास जातानां जीवावर आलें, म्हणून ही इतकी खटपट करून खाशांस घोंटाळ्यांत घातलें, हें, बिचारे जाणतच नाहींत ( बाहेर ) हा सर्व आपल्या चरणाच्या सेवेचा प्रताप आहे, दादा.

राघो०— बरें तर कुतकाजी. हा मी सज्ज झालों. आणि मद्या ! तूंही हो.

मद्दा०— हा मी ही सज्ज होतों.

( उभयतां दुपेट्यानें कंबर बांधून मिशांवर ताव देतात आणि तलवार घेतात. )

मद्दा०— श्लोक. [ स्रग्धरा ]

घालूं कोणावरी हा प्रखरतम[1]असी कोण मृत्यूस पात्रे[2] ॥
दावीं दावीं मला आंधि चरचर गळा वेगळा आणि गात्र ॥
कापूनी मी करीतों अतुलबलगिरी*[ ] द्यौपती[3] ही क्षणांत ॥
अन्याची काय गोष्टी प्रचुर अणुपरी रेणु जैसे रणांत ॥ १८ ॥

( इतक्यांत, मसाजी मोहनाजी आणि लुमाजी दचकत येतात. )

मसा०— हें स्थळ तर, वास्तव्यास प्रशस्त आणि निर्भय असें दिसतें.

मोहना०— होय, येथें आपणांस शत्रु अपकार कराव-

१ तीक्ष्णतलवार. २ योग्य. ३ इंद्र. * विपुळबळाचापर्वत.

घास पोंचणार नाहींत. आणि कदाचित् तसेंच कांहीं आलें तर गुहा, दऱ्या वगैरे परित्राणास ही येथें पाहिजे तितक्या आहेत.

लुमा०—गुहा पुष्कळ आहेत, आणि श्वापदें ही पुष्कळ आहेत, दिनचर्या चालण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं. थोड्या मेहेनतीनें यथेच्छ भोजन करावयास मिळून गुहेमध्यें संग्रहही करून ठेवण्यास सांपडेल. पण येथें कोणी दुसरा नसला पुरे.

मोहना०— कोणी दुसरा असला, तर असेना, आपलें काय गेलें ? आपण सुखवस्तु राहणार.

मसा०— आपलें काय गेलें ? सर्वस्व गेलें. घर बुडालें ह्मणून समज ? कदाचित् दुसरा असलाच तर.

श्लोक. [ शिखरिणी. ]

सपत्नाची पीडा हळुहळु विवर्धे दिनि- निशीं ॥
असा विस्फुलिंग प्रसृत घडि होई करी मशी ॥
तृणाकांताराची आणि वसतियांची अवसरीं ॥
तसी स्वभाणाला सकुल अशना आस्यें पसरी ॥ १९ ॥

लुमाजी.— ( न्यहाळून पाहतो ) मनुष्याचा पायरव तर, बाबा, येथें दिसतो; तुह्मी कांहीं ह्मणां.

मोहनाजी.— तूं नेहमीच सशंक, बाबा. काय रे, कुठे आहे मनुष्याचा पायरव तो ? दाखव पाहूं.

लुमाजी.— हीं पाहा, नूतन हरिततृणें आपले जोरानें वाढत असतां त्यांची अग्रें वांकडीं होऊन भूमीस

---

१ राख. २ भक्षायास. ३ मुख

मिळाली, हीं, कोणी मनुष्याची पावलें त्यांजवर प-डून खालीं लवलीं आहेत; हे, पहा तालवृक्ष ज्यांच्या कोमल फळांचे घड नुकतेच कापलेले दिसतात, आणि ज्यांच्या शेगांपासून मद्यही काढून घेतलेलें दिसतें. या सर्व चिन्हांवरून मी ह्मणतों कीं, येथें मनुष्याचा संचार आहे. आणखींही-

श्लोक. ( मालिनी. )

गुणु गुणु रव कानीं ऐक हा अंतराळीं ॥
नसुन दिसत कालंबें कुठे बंभराळी ॥
करिती तदुपरी ही खास मानूषवाणी ॥
गमत मज वधाया पातला कोणि प्राणी ॥ २० ॥

अथवा श्लोक ( द्रुतविलम्बित. )

अटविपाल समृत्यु कुणीतरी ॥
वसत यास्थळिं काननिं वा दरीं॥
उठत तद्वचनोद्भव हा ध्वनी ॥
परिसतां भय उद्भवतें मनी ॥ २१ ॥

मसाजी.— ( गर्वानें ) काय, तुझ्या मनांत भय वाटतें, मी जवळ असतां ?

ओवी.

अटविपाल वामहिपाल ॥ समृत्य आणि सबल॥
असलीया मारून हें स्थळ ॥ करीन वसतें आमचें॥१॥२२॥
अस्मदनुचरात्रांपुन ॥ एक ही न ठेवीन जन ॥
वधीन निकरें करून ॥ शार्दूल हरणालागीं जसा॥२॥२३॥

कुतकाजी.— ( हें मसाजीचें बोलणें ऐकतांच अत्यंत भयभीत होऊन कांपत कांपत राघोबाजवळ येतो ) महाराज, मारलें.

राघो०— कोणास मारलें ?

कुतका०— महाराज, आह्मा सर्वांस; आणि कोणास ?

मदा०— अरे, कुणी मारलें ? गयाळा, नीट बोल.

कुतका०— त्या समोरच्यांनीं आणि कुणी ?

राघो०— ( आंगरख्याच्या अस्तन्या वर चढवून आणि मिशांवर ताव देऊन ) असा गंड्यासारखा, बेट्या, भितोस काय ?

कुतका०— ( मनांत) गंड्या तर खराच. ( बाहेर ) भिऊं नको, तर काय करूं?दादा, ऐका, तो काय ह्मणतोतें.

राघो०— काय ह्मणतो, तें ऐकूं दे तर खरें.

कुतका०— ऐका धनीसाहेब,

## ओव्या.

अटविपाल वा महिपाल ॥ सभृत्य आणि सबल ॥
असलिया मारून हें स्थळ ॥ करीन वसतें आमचें ॥
अस्मदनुचरा वांचुन ॥ एक ही न ठेवीन जन ॥
वधीन निकरें करून ॥ शार्दूल हरणालागीं जसा ॥ २ ॥

राघो०— काय असें ह्मणतो !

कुतका०— होय; तुह्मी ऐकतां, तर खरें ?

राघो०— तर तूं जा, आणि त्यांस माझे नावानें सांग.

कुतका०— कोण, मी जाऊं ?

राघो०— होय, तूं जा.

कुतका०— (मनांत) ह्मणे आतां, माझें अयुष्य संपलें (बाहेर) जातों, पण तेथें काय सांगूं ?

राघो०— असें सांग कीः—

श्लोक. (मदिरावृत्त.)

कानन हें मजभूप- शिरोमणि- अर्पित सानुज वासकरा ॥
यास, अरोहननास करूं तुह्मि सोडुन जा चुकवा निकरा ॥
जीवित व्यर्थ नका दवडूं अजपुत्रपरी वधुं आह्मि हरी ॥
जोंवरि आलि न अंतरिं नाशक क्रोधसमुद्रज ती लहरी॥२४

कुतका०— जी, मी जाऊन तुमचा निरोप तर सांगेन, पण त्यांचें प्रत्युत्तर तुह्मांस कसें समजेल ?

राघो०— कसें ह्मणजे ? तूं लवकर परत ये, आणि सांग काय ह्मणतात तें.

कुतका०— होय, तसें करण्यास मी चुकणार नाहीं; पण जीवंत असलों तर.

राघो०—हा जीवंत आहेस तर, खरा.

कुतका०— होय, आतां जीवंत आहें, मी आपला निरोप सांगेन, पण—

राघो०— पण काय ? उत्तर घेऊन ये.

कुतका०— मी मेलों, तर मग ?

राघो०— तूं मरतोस कशानें ?

कुतका०— तलवारीच्या झपाट्यानें; आणि कशानें ? (आपणाशीं) दोन तुकडे झाल्यावर मग कोणी वांचतो काय ?

राघो०— कोणाच्या ?

---

१ सार्वभौम. २ ब्रह्मानबकरा. ३ सिद्ध.

कुतका०— ज्यांस तुमचा निरोप सांगेन, त्याच्या.

राघो०— काय ह्मणून ?

कुतका०— निरोप सांगेन ह्मणून.

राघो०— अरे, आज तुला कांहीं भ्रम तर झाला नाहीं· ना तूं असे भलभलते तर्क करतोस ते ?

कुतका०— क्षमा मागतों, महाराज, तुह्मी भलभलतेंच सांगावयास सांगतां, मग मी भलभलतेच तर्क न करूं तर कसें करूं ?

मद्रा०— हा कुतकाजी नेहमी गंड्येपणाच्या गोष्टी सांगणार. काय याच्यानें शिपायगिरीचें काम व्हावयाचें आहे?

कुतका०— ( हळूच आपणाशीं ) तुह्मी मोठे समशेरबहादुर, ते कां तर पळत सुटलां ?( बाहेर ) दादा, मी काय, तुमचा सांगितल्या कामाचा चाकर. तलवार तर माझ्या जन्मांत देखील मी हातीं धरली नाहीं. ती, तुह्मा सारख्यां वस्तादांचेच हातांत विराजते. माझ्या हातांत, ही पाहा, माझी गरीबकाठी, पण राजाचें राज्य पालथें करिते, ज्याजवर पडली, तो आलाच चौऱ्याशींचे फेऱ्यांत.

राघो०— अरे जो आह्मांसारख्या वीरांचा सेवक, तो काय असा तसा असणार ? पण आतां सांग तुला मी भलभलतें, तें कायरे, सांगावयास सांगितलें ?

कुतका०— दादा, क्षमा करा. आपण " कानन हें मजभूप- शिरोमणि- अर्पित सानुजवास करायास "( इत्यादि ह्मणून ) असें सांगावयास सांगतां, हें बरें, कसें ? आपणास तर राज्यांतून काढून लावलेलें आहे,

नव्हे !

राघो०— अरे, तें आतां कोणास ठाऊक आहे ? राजा जळून गेला, ह्मणतोस. आतां, आपणच राजे, बोलूं ती पूर्वदिशा.

कुतका०— तें, सारें खरें; पण, दादा ! ते तुमचें सापत्न आहेतना आजून जीवंत ? त्यांचे कितीएक गुप्त हेर या अरण्यांत फिरत असतील; तुमच्या शोधावर.

राघो०— ( किंचित् भय पावून ) कदाचित्, तसें असेल खरें.

कुतका०— असेल खरें काय, दादा ? आहेच खरें- माझें मोठें दैव कीं, मी वांचलों, आणि तुमच्या पायांजवळ आलों.

मदा०— कां बरें; तुजवर कांही आलें होतें कीं काय ?

कुतका०— काय सांगूं, दादा, मोठें कठीण काम.

राघो०— तें कसें काय ?

कुतका०— आतां, नुक्ताच मी या खालाटींत तुमचा शोध करीत होतों, इतक्यांत दोन भयंकर काळासारखे वीर मजवर चाल करून आले.

राघो०— मग !

कुतका०— मला त्यांणीं ओळखूं नये, ह्मणून मी त्यांस आपण राजदूत आहें, असें, खांटेंच सांगितलें.

मदा०— मग, पुढें ?

कुतका०— ते, काय माझें ह्मणणे खरें मानतात ? एकदम तलवारीचा वार मजवरती केला त्यांणीं.

राघो०— ( मदाजीचे मुखाकडे पाहून किंचित् हास्य मुख होती, ) मग !

कुतका०— मी मांगाचा बच्चा; त्यांच्या बापाला सां-पडतों काय ! जवळच एक खळगा होता, त्यांत नि-जलों.

राघो०—मग पुढें !

कुतका०— ते समजले, कीं मी मेलों नंतर मर मे-ल्या, ठिक झालें, असें ह्मणून ते दोघेही चालते झाले, दादा. मग मी थोड्या वेळानें जिकडे तिकडे सामसुम झालें असें पाहून तुह्मांस सोधीत आलों; तों, दैवानुरूप तुमची भेट झाली, ही.

राघो०— अरे, तुला दैवानेंच वांचवलें, बेट्या. ते राजदूत नव्हत; मी आणि मदा, दोघे होतों.जेव्हां तूं राजसेवक असें ह्मटलेंस, तेव्हां जो काय राग आला, त्याबरोबर सपाटा मारला मी.

मदा०—तुझा सुदिन, ह्मणून तूं वांचलास, नाहींतर दादा-च्या हातांतून वांचणार !

कुतका०— ( साश्रु होतो ) आपल्या पायांची कृपा, ह्मणून वाचलों.

राघो०— बरें, आतां तर तूं निर्भय झालास ना ?

कुतका०— आपण, माझे धनी जवळ असतां, मला भय तें कशाचें !

राघो०— तर, जा आणि निर्भयपणें सांगितलें तसें कर. आपण मांगाचे बच्चे कोणास काय भिऊन आहों ?

कुतका०— जी आज्ञा. हा निघालों.( आपणासीं) तुह्मी मांगाचे बच्चे पण येथें वाघाचे बच्चे आले, ह्मणजे मात्र कठीण ( असें ह्मणून बाहेर जातो. )

राघो०—
मद्दा०— } ( आपणाशीं ) आतां, हें आणखी काय संकट येत आहे, तें पाहूं या. आपण येथें परित्राणार्थ ह्मणून आलों, तत्रापि दुर्दैव पाठ सोडीत नाहीं पाहा.

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

सोडी तरूलागिं जशी न छाया ॥
प्रारब्ध तैसेंच न सोडि काया ॥
राहे जनीं वा विपिनांत घोरा ॥
लावून ये संगति तेथ तोरा ॥ २५ ॥

कुतका०— ( आपणाशीं ) आतां, कसें करावें ? धन्यानें सांगितलेलें काम तर केलेंच पाहिजे. आणि कदाचित् यांचा निरोप ऐकून जर कां त्या दुष्टांचें पित्त खवळलेंच तर वड्यांचें तेल वांग्यांवर निघेल. ह्मणून माझे तर पाय लडलडां कांपतात. काय करूं ?

श्लोक. [ स्रग्विणी ]

स्वामि- कार्या करायास मी जातसें ॥
प्राणभीती मनीं दुर्धरा ती असे ॥
स्वामि- वाग्यष्टी ही चालवीते पुढां॥
ओढि भीती ह्मणे दोरी खालीं पडा ॥ २६ ॥

तर आतां, आपण एक युक्ति करूं या. ( मागें वळून पाहातो ) यजमान बरेच लांब आहेत, तरी कदाचित्

---

१ देह. २ वाणीरूपकाठी.

जड जोखीम पडल्यास आपली हांक त्यांस ऐकूं जाईल. ( पुढें टेहळून पाहतो ) अरे, हे तर तिघे जण लठ्ठ दांडगे एकाहूनएक तरुण दिसतात, यांच्या हातांत सांपडलों, कीं झालीच माझी चटणी. तर आपण जाऊं नये यांच्याजवळ; येथूनच एक अशी आरोळी मारावी, कीं ती ऐकतांच ते दांडगे जर तस्कर असतील, तर पळून जातील. आणि कदाचित् ते कोणी जड अधिकाराचे असून आंगावर चाल करूनच येतील तर आपणाला पलायन करून धन्यापाशीं जाण्यास सवड सांपडेल. आणि माझी आरोळी ऐकून धन्यासही वाटेल, कीं मी कामगिरी चांगल्या प्रकारें बजावली. ( असा मनसोबा करून कांबळीनें कम्बर बांधून मोठ्यानें हांक मारून ह्मणतो. )

पद ( रागकल्याण )

जीवित- नाश करावयाला॥कोण तुह्मी विपिनीं या आलांधृ॥
अमरपराजितक्षोणिप राजित नेदि तुह्मास बसावयाला॥१ ॥
मायानुज उमजा वरजा हें स्थळिंजाअन्यि घुंसावयाला॥२॥
व्हा सावध निजवध न करून घ्या सांगतरवीदास तुह्माला॥२७॥

( हें भाषण ऐकतांच मसाजी, मोहनाजी, आणि लुमाजी घाबरतात आणि चहूंकडे पाहूं लागतात )

राघो•— ( बसल्याजागेवरून)शाबास, कुतकाजी शाबास। ( मदाजीस ) पाहा बेट्यानें कशी भयंकर आरोळी मारिली ती; जर हा कुतकाजी आपला असें ठाऊक नसतें, तर आपण देखील, बाबा, घाबरून गेलों असतों.

लुमा•— तो तसाच आहे. बेटा. हे पाहा, त्याच्या त्या आरोळी बरोबर माझे तर कानटाळेच बसले.

( हिकडे मसाजीचे सांगण्यावरून अशी भयंकर आरोळी कोणी मारली याचा शोध करावयास मोहनाजी वेश पालटून पुढें येतो )

मोहना०— ( शरीराकडे पाहून आपणाशीं ) आतां तर मला कोणी वळखणार नाहींच. ह्मणून जरी हा गर्धभासारखा ओरडणारा कदाचित् परपक्षीय आहे तरी आपणास भय नाहीं. पण यासच पहिल्यानें विचारूं या तुझा राजा कोण, आणि आह्मी त्यास भेटायास इच्छितों. ह्मणून.( पुढें होतो आणि ह्मणतो )

श्लोक. ( इन्द्रवज्रा )

क्षोणीपती वा अटवीपती हो ॥
मायानुजाज्ञांकित सांग त्या हो ॥
इच्छुं आह्मी पाद नमावयास ॥
आज्ञापितां सन्निध यावयास ॥

कुतका०— ( मनांत ) वः, शाबास माझी. एका आरोळी बरोबर अगदीं मेणासारखें नरम केलें याला.( बाहेर ) आमचा धनी फार तापट आहे, ह्मणून तुझे नांवगांव मला आधीं सांग, मग योग्य वाटेल तर मी त्याची आज्ञा घेऊन तुला सांगेन, पण तूं एकटाच आहेसना?

मोहना०— होय, मी एकटाच आहें.मस्तुत ( मनांत हर्ष पावून) अद्यापपर्यंत मसलत बरी दिसत आहे. तरी यास आपलें खरें नांव सांगूं नये.

कुतका०— तर तुझें नांव, गांव सांग पाहूं? त्याशिवाय, बाबा, मी तुला जवळ उभा देखील करणार नाहीं. कां कीं.—

श्लोक. [ पृथ्वीवृत्त ]

अभिज्ञन सतांकुळा वसतिये स्थळा पामरा ॥
न टेवि जरि ठेवितां तुह्मी तदीय हातें मरा ॥
असें नयनिपूण ही सुनितिविस्सदां बोलती ॥
तदीय रवमौक्तिकें निजहितेच्छु घे खोलि ती ॥२९॥

**मोहना०**— ( किंचित् गोंधळून आपणासीं ) आतां नांव सांगितल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ( बाहेर ) ज्यापक्षीं तुह्मी आह्मी भिन्न नाहीं, त्यापक्षीं नांव सांगावयास काय चिंता आहे; पण हें घोर अरण्य आणि रात्रीचा समय; न जाणूं, कोणी एकादा टेहळ्या जरी जवळ असला, तरी दिसणार नाहीं, आणि घात होईल, ह्मणून शंका वाटती.

**कुतका०**— ( आपणाशीं ) हा एकटा गोसामडा दिसतो, जरी जवळ आला, तरी कांहीं भीति नाहीं. ( बाहेर ) तर,माझ्या कानांत सांग तुझे नांव, ह्मणजे झालें. मग कोण ऐकतो ?

**मोहना०**— बरें तर, ( भीतभीत त्याच्या जवळ जातो ) रामराम, भाऊ, रामराम !

**कुतका०**— रामराम ! ( त्याचे मुखाकडे पाहून ) अरे, हे तर आमच्या मोहनाजी दादावाणी दिसतात.

**मोहना०**— हारे, कोण, कुतकाजी ?

**कुतका०**— ( पाय वंदन करून ) क्षमा करा, दादा, मी तुह्मास ओळखलें नव्हतें.

---

१ पदरांत.

( इतक्यांत मसाजी आणि लुमाजी येतात त्यांस पाहून कुतकाजी राघोजीकडे धांवत जातो. )

राघो०— कायरे कुतका, इतका त्वरेनें धांवत आलास ?

कुतका०— दादा, आले; ते आले.

मदा०— अरे, कोण आले ?

कुतका०— ते पाहा तुमचे. उठा लौकर.

राघो०— अरे मूर्खा, नीट बोल, कोण आले आमचे ?

कुतका०— खरोखर; ते पाहा. जीभ कापून टाकीन, नाहीं तर.

श्लोक. ( वसंततिलका. )

आले सहोदर[1] सुखास पुसावयास ॥
ते हे तुह्मास अवलोकिं बरें तयांस ॥
व्हा शांत भूमितळ भ्रातृसहीत भोगा॥
आलें कृतानुरुप जें तुमच्या विभागा॥ १० ॥

मदा०— ( घाबरून राघोजीस ) दादा उठा, अहो, पाहतां काय ?

राघो०— ( हातांत ढालतलवार घेऊन सज्ज होतो आणि क्रोधाच्या आवेशानें ) अरे आहेत कुठे ? येऊं द्या, त्यांला पुढें ! ( हळूच ) मद्या, तूं अगदीं भिऊं नको हो. आले, कीं एकदम खापलून टाकतों, त्यांला.

श्लोक. ( वसन्ततिलका )

विद्युल्लता[2]-पतन अद्रि[3] विखंडि जैसा ॥
खड्गप्रहार ममपाणिज आज तैसा ॥

---

१ बंधु अथवा दायाद. २ वीज. ३ पर्वत.

शत्रू- समूह-वपुदारिल या क्षणांत ॥
चिंता करीं न जल आणि हि ईक्षणांत॥ २१ ॥

कुतका०— ( घाबरून मनांत ) याला आज झालें तरी काय ! आपल्या बंधुवर्गासच मारावयास धांवतो तो ( बाहेर ) दादा ! अहो, तुह्मी करतां तरी काय ?

राघो०— काय ह्मणजे ? त्या सपत्नाचें नांव नाहींसें करून टाकतो; ( धांवत पुढें जातो ) दुष्टहो, आह्मास वनवास भोगावयास लावलें, ते, तुह्मीच ना ? अद्याप, आमची पाठ सोडीत नाहीं आँ ? बरें, आतां तुह्मास येथेंच अहां कीं नाहींसे करून टाकतो.

मसा०— अहो ! हा राघोजी दादा, आह्मास सेनापति किंवा कोतवाल असें समजून मारावयास येत आहे, हें काय ? ( मोठ्यानें हांक मारतो ) दादा, अहो, मी तुमचा लाडका मसाजी आहें, ज्याविषयीं तुह्मी शंका मनांत आणतां तो बोधाजी किंवा दमाजी नव्हे.

कुतका०— दादा एकवेळ रागावले ह्मणजे मग सगळे सारखेच; आपला आणि पारका.

मसा०— दादा, आह्माकडे पाहा. हा, मी मसाजी, हा मोहना, आणि हा येथें लुमा, तुमचे लाडके तुह्मास भेटावयास आलों.

राघो०— ( लज्जायमान होऊन ) कोण तो, मसा माझा ! अरे, तर काय या द्वाडानें मला भलतेंच सांगीतलें ? पाहूं द्या, तो लुच्चा कुतका, कुठे आहे तो.

कुतका०— हा मी जवळच आहें. क्षमा करा. मी

नीट सांगितलें, पण तुह्मी मात्र भळतेंच समजलां, धनी अहां आपण.

मता०— दादा, मी पायां पडतों.

मोहना०— } आह्मीही प्रणाम करतों, दादा.
लुमा०— }

( असें ह्मणून तिघेही ढळढळां रडूं लागतात. )

राघो० अरे, माझी मायाऊ आका कुठे आहे? (असें ह्मणून मूर्छा पावतो )

मदा०— ( त्यास सावध करतो. ) दादा, धैर्य धरा, सावधव्हा, सावधव्हा.

राघो०— ( सावध होतो. ) बरें कामाजी दादा कुठे आहे? खुशाल आहेना?

मता०— ( कपाळास हात लावून ) खुशाल असता, तर आह्मास वनवास भोगवयाची काय गरज होती! ( रडूं लागतो. )

राघो०— तर काय तोही दग्ध झाला?

मोहना०— होय, आमच्या दुर्दैवानें-

राघो०—( मोठ्यानें हंबरडा फोडून पुनः मूर्छा पावतो)

( त्यास सर्वत्र मिळून सीतळ पाणि सिंपून सावध करतात. )

मदा०— दादा, सावध व्हा, सावध व्हा. असें धैर्य सोडाल, तर पुढें कसें होईल.

श्लोक. ( भुजंगप्रयात )

अरिष्टें शतांची शतें आलिया ही॥
खरी वीरवृत्ती भयाला न घे ही ॥

तुह्मा रीत ठावी उठा हेतिपाणी ॥
करा शांत बंधू पुसा नेत्र पाणी ॥ ३२ ॥

राघो०—( त्या सीतलोपचारानी सावध होऊन शोक करूं लागतो. )

### साकी.

हा बंधो तूं दुर्जय अमरां तपियां हटियांलां ही ॥
जीवन्मात्र तुझ्या अनुसंगे अनुपम सुखतें लाही ॥ १ ॥
हा बंधो तव आनन पाहून राका[१]विधु ही लाजे ॥
ताप शांतवी दिनरजनीं जें सकला[२] नित्य विराजे[३] ॥ २ ॥
हा बंधो तव कांति सीतला पाहातां निवती डोळे ॥
आज कशीनिर्दय हुतवाह[४] ज्वालानी ती पोळे ॥ ३ ॥
हा सखया सुकुमारपणानें लाजविलें नवनीता ॥
तव वपुच्या विरघळलें ह्मणवुनि नाशाया जीवीता ॥४॥
पण पुरवाया त्याचा तूं ही तत्सदृश झालासी ॥
टांकुन बंधुजनाला आह्मां मोदविलें काळासी ॥ ५ ॥
हा कमलायतलोचन मजला एकवेळ तरि पाहीं ॥
चारुहास्य निजआस्य उघडुनी बोल शब्द मसि कांहीं ६
हा तव विरहानळहुत ठेविन एक घडी ही काय॥
शीर्षाविण धड उपहासास्पद ठेउन फळ तें काय॥७॥३९

गदा०—( गहिंवरून शोक करूं लागतो )

### श्लोक. [ शिखरिणी ]

दयाहीना दैवा वदन उफराटें फिरविलें ॥
हिरूनी शिर्षाला मग धड कशाला उरविलें ॥

---

१ पूर्णिमेचा चंद्र. २ कलासहीत. ३ शोभे. ४ अग्नी.

अह्माला ठेवूनी करित रुदना अग्रज सखा ॥
कसा नेला होता अभिवंदन[1], शत्रूरणमखा[2] ॥ ४ ॥

( इतक्यांत पडद्या पलीकडे मोठा शब्द होतो ॥

जो सकल भुवनैक सुंदर, जो बोधादिअमित्रांला अजिक्य, जो केलिवनांत नृपाळांस, जसा, कंजपुष्पांत भ्रमर गुंततो, तसा गुंतवून ठेवणारा; जो दमादिकांच्या चिथावणी वरून प्रभूनें निजनयनोद्भव अनलानें दहन केला असून अदग्ध, असा हा कामाजीनाईक संपूर्ण जगताला कारणभूता आणि राजाची अत्यंत प्रियपरिचारा अशी जी आपली भगिनी मायाऊ तिज सहवर्तमान येत आहे; तर सर्व भवारण्यवासी जन हो, त्यांच्या सन्मानार्थ मंगलोत्सव करा.

श्लोक. [ स्रग्धरा. ]

ज्याला दाहावयाला कुटिलमतिवर्ती मंत्र भूपालकानीं ॥
बोधूनी वर्धवूनी क्षितिपनयन- वन्हीस बोधादिकांनीं॥
आरंभीला क्रतू तो विधिबल[3] ह्मणुनी ध्वंसुनी[4] नूतनांगा ॥
पावूनी पातला या वनिअसुखजरा पावलीं ज्याचें भंगा॥४१॥
संगेमायाधिका ज्या प्रियतम भगिनी विश्वविस्तारवल्ली ॥
माया कायाधरांचीं प्रसवति शतके पुष्पघोंसान फुल्ली ॥
कामादि भ्रातृसंघाजिवउन सुखदात्री जना भूतळाला ॥
आली केली- विलासा करुन जन करा सर्व ही मंगळाला॥४२

राघोजी०— ( सद्गद होऊन ) अहा दैवामाते, तूं धन्य आहेस. आज, काय सोन्याचा दिवस दाखविलास, हा !

---

१ सन्मुख. २ रणयज्ञास. ३ दैवबल. ४ नाशून.

मदाजी०— शाबास ! मांगकुलवर्धनी माते, तुझे उपकार आह्मी कधींही विसरणार नाहीं.

( मसाजी, मोहनाजी आणि लुमाजी आनंदानें नाचूं लागतात. )

## अभंग.

धन्य भाग्य हें आमचें ॥ पाहूं शरीर तुमचें ॥
सुख वाढवूं डोळ्यांचें ॥ बंधुराया ॥ १ ॥
धन्य आजचा दिवस ॥ न होऊन्नी जीवनास॥
भेटी झालीया वनास ॥ बंधुराया ॥ २ ॥
धन्यधन्य हुतवाह ॥ न जाळिला युष्मद्देह ॥
सुखें चीरंतन[1] राह ॥ बंधुराया ॥ ३ ॥
धन्य आमचि दैवमाता ॥ प्रगटवूनी प्रसन्नता ॥
संरक्षीलें या जीविता ॥ बंधुराया ॥ ४ ॥ ४२ ॥

राघो०— कुतकाजी कुठें आहे ? कुतकाजी ! ( मोठ्यानें हांक मारतो ).

कुतका०— ( आपण विपरीत गोष्ट कथन केली या लज्जेमुळें दूर लपून राहिला तेथून ) जी, हा तुमचा गुलाम. विस्तव भडकलेला पाहिला ह्मणून मी तर्क केला होता, पण दैवानें बरें केलें, कीं मायाऊ आका जींवत दृष्टीस पडली; आतां मी आपलें तोंड फोडून घेतों ( तोंडांत मारून घेतो ). इतःपर, मी कधींही पुरतें मरून जळून राख झालेली प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय चकार शब्द देखील बोलणार नाहीं.

मदा०— अरे, गयाळ्या, हिकडे तर ये, खरा.

---

१ अक्षयी.

**कुतका०**— मी येतों, पण राघोजी दादाच्या तलवारीचें भय वाटतें, बाबा, मला.

**राघो०**— अरे, तूं निर्भय आहेस कुतका, जावत्कालपर्यंत आमची दैवगति विपरीत होती, तावत्कालपर्यंत जें कांहीं झालें, तें दैवप्रेरित झालें; तुजकडे दोष नाहीं. पण कामाजी दादा आणि मायाऊ आका यांचें आगमन झालें, तें सूचक मंगल करण्यास सर्वत्रांस आज्ञा सांग, आधीं, पाहूं.

**कुतका०**— ( मोठ्या आनंदानें ) तें माझें काम; पण तुमची तलवार जरा खालीं ठेवाल, तर.

( बाहेर जाऊन आकाशाकडे पाहतो. )

काय, वनदेवतांनों ! तुह्मी तर सांगण्यापूर्वींच मंगलारंभ केला, शाबास! यालाच खरी प्रीति, आणि खरें औत्सुक्य ह्मणावें, अहाहा ! कायहो थाट हा !

श्लोक. ( स्वागता. )

लुंटती सरस घोंस फळांचे ॥
स्तंभ तालतरु राजित साचे॥
छत्र त्या उपरि नीरसपर्णें[1] ॥
तोरणें मिरवती सितवर्णें[2] ॥ ४४ ॥

श्लोक. ( पृथ्वी. )

प्रफुल्लित फुलांवरी भ्रमर भूंभुं ऐसा ध्वनी ॥
करीत जणु झिल्लिचा रव उठे तया काननीं ॥
तरूवर सपुष्पिका विविध वल्लि विस्तारल्या ॥
नृपाल गमनीपुरीं युवति शाच शृंगारल्या ॥ ४५ ॥

---

१ सुकलेलींपानें. २ पांढरीं.

श्लोक. ( शलिनी. )

धोंधोंधोंधों नाद त्या निर्झरांचे ॥
होती जैसे दुंदुभी निर्जरांचे ॥
आनंदानें वाजती मंगळाला ॥
गाती गाणीं पक्षि ही त्या स्थळाला॥ ४६ ॥

वाहवा ! कायहो, हा जिकडे तिकडे मंगलोत्सव चालला आहे ! शाबास ! आज आमचे कामाजी नायकाच्या आणि मायाऊ आकाच्या आगमनानें सर्वत्रांस इतका उत्कर्षानंद झालाना !

( इतक्यांत शाकिनी, डाकिनी आणि यक्षिणी बोलतात ) मायाऊच्या आणि कामाजी आदिकरून बंधूंच्या आगमनानें आह्मास आनंद झाला, तो प्रदर्शित करण्यास्तव आह्मी हा सर्व मंगलोत्सव करीत आहों.

( नंतर मायाऊ आणि कामाजी नाईक येतात. )

**मायाउ.**— अहो ! या सर्व अरण्यभर आज गायन आणि नृत्य चाललें आहे, हें काय !

**कामा०**— आका ! आमच्या आगमनानें या भव्यारण्यवासी जनांला आनंद झाला, तो प्रदर्शित करण्याकरितां, हा मंगलोत्सव चालला आहे.

**माया०**— हाँ; असें काय ? फार उत्तम.

( राघोजी, मदाजी, मत्साजी, मोहनाजी, आणि लुमाजी, सानंद होऊन मायाऊस आणि कामाजीस अभिवंदन करतात )

**राघो०**— आका, तूं आणि कामाजी दादा यांचें वाईट वर्तमान ऐकिलें, तेव्हां तर माझा प्राणच गेला होता.

---

१ डोंगरांतून पाण्याचे पाझर. २ देवांचे.

**माया०**— मजविषयीं तर कांहीं नाहीं; पण कामाजीस मात्र जाळण्याविषयीं राजाज्ञा झाली होती.

**राघो०**— मग ?

**माया०**— मग काय ? आपला प्रभु अत्यंत दयाळु, जसा वळवावा तसा वळणारा.

**राघो०**— मला वाटतें, त्या दुष्टा कारभाऱ्यांनीं हें सर्व कृत्य केलें असावें.

**माया०**— त्यांणींच तर इतकी नासी केली, पण राजानें कामाजीस जाळण्याविषयीं जी आज्ञा दिली होती, ती इतकी दयेनें भरलेली होती, कीं तेणेंकरूनच तो वांचला.

**राघो०**— हाँ, असें काय ? ती कशीकाय होती बरें ?

**माया०**—( म्हणून दाखविते ) " कृतघ्ना कामाचें दहन वपु आधीं बुधकरा " तेव्हां मग काय त्या लबाडांच्यानें अधिक उणें करवतें ! सुकलेलें गवत आंगास बांधून अग्नी लावला

**राघोजी.**— ( क्रोधाच्या आवेशानें ) अग्नि लावला आँ ! अशा क्रूरकर्म करणारास मी आतांच शासन करतों, पाहा.

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

ज्याणे मदीयाग्रज दाहवाया ॥
आग्नि प्रमादें सुकल्या तृणा या ॥
लावावया ओढवला स्वपाणी॥
छेदीन त्या आवरता न कोणी ॥ ४६ ॥

**माया०** — वेड्या, उतावळा होऊं नको. त्यांत आपलें अकल्याण तें काय झालें; प्रभूनें आह्मांस हें भवारण्य वतन करून दिलें, आणि या कामाजीचा देह फार

वृद्ध झाला होता तोही तरुण मनोहर झाला; जसा सर्प मेग टाकून तरुण होतो, तसा.

श्लोक. [ वसंततिलका ]

टाकूनिया कवच पन्नग.कांतकाया ॥
पावे तसाच तव अग्रज बंधुराया ॥
झाला पहा अनुपमांग जगत्रयांत ॥
हें आपलें हित न वाइट कांहि यांत ॥ ४७॥
या काननांत हि विहार करावयाला॥
आज्ञापिलें प्रभुवरें सदयें आह्माला ॥
सापत्नहीन अवघीं विपिनीं वसूंया ॥
संवर्धवूं अरि- समूह- मनीं असूया ॥ ३८ ॥

राघो०— एकून, कामाजी दादा तेजस्वी अधिक दिसूं लागला खरा. मी तर पहिल्यानें ओळखला देखील नाहीं.

कामा०— मायाऊ आकाच्या कृपेनें सर्व संकटसमुद्र पार पडलों. तिच्या आज्ञेप्रमाणें वागल्यानें सर्व कल्याण होईल.

बोधा०— बरें तर, जी आकाची आज्ञा होईल ती आपल्यास मान्य आहे.

मदा०— होय, मायाऊ आका आमच्या प्राणाची धनीन आहे.

मत्सा०— कामाजी दादा, आणि मायाऊ आका यांचे हें सर्व अरण्य आहे, तर तीं सागतील तें आह्मी सर्व ऐकूं.

मोहना०- } होय, तीं सांगतील ते आह्मास तर काय, पण
लुमा० — }

या सर्व भवारण्यवासी जनांला देखील मान्य करणें प्राप्त आहे.

( सर्वत्र मायाऊचे पायांला अभिनंदन करतात. )

**मायाऊ.**— माझ्या प्रिय भ्रात्यांनों, परम दयालु प्रभूच्या कृपेनें हें भवारण्य आपणास वतन मिळालें आहे, तर यांत तुह्मी सर्व एकोप्यानें राहून स्वछंद विहार करा. शत्रूंचा पाय शिरकूं देऊं नका. कामाजी आणि राघोजी तुह्मांमध्यें वडील आणि पराक्रमी आहेत, त्यांच्या अनुसंगानें तुह्मी वागून बलाढ्य आणि अजिक्य होऊन राहा. मी सर्वकाळ तुह्मांबरोबर तुमची पाठ राखीत आहें.

### श्लोक. [ वसन्ततिलका ]

आहे समग्र तुमचें भवरान याशी ॥
रक्षून राज्य करिं शत्रु समग्र नाशीं ॥
ऐक्या स्विकारुन महींत सुखें विहारा ॥
व्हा सर्वदा विजयभुक्त तुह्मी उदारा ॥ ४९ ॥

( हें ऐकून बहुत उत्तम आहे असें ह्मणून सर्व निघून जातात. )

## अंक चवथा समाप्त.

### चवथ्या अंकातील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पद. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३२ | १ | ८ | ३ | ४ | १ | १ | ५० |

# सायुज्यसदननाटक.

## अंक ५.

### स्थळ.

### राजसौध.

### पात्रें.

| | |
|---|---|
| तुकोजी राव गायकवाड | शिवाजीराजाचा सरदार. |
| शिवाजी | सार्वभौमराजा. |
| निवृत्ति | त्याची राणी. |
| सुमति | दासी. |
| शांति | शिवाजीराजाची कन्या. |
| विचारराव | त्याचा प्रधान. |
| बोधाजीराव दाभाडे | त्याचा सेनापति. |
| विश्वकर्मा | शिल्पकार. |
| जीवाजीराव | शिवाजी राजाचा प्रतिनिधि. |
| दमाजीराव | शिवाजीचा कोतवाल. |
| शमाजीपंत | कारभारी. |
| मायाऊ | शिवाजीची दासी. |
| राघोजी | तिचा भाऊ. |
| मदाजी | तिचा दुसरा भाऊ. |
| मसाजी | तिसरा भाऊ. |
| लुमाजी | चवथा भाऊ. |
| कुतकाजी | राघोजीचा सेवक. |
| मोहनाजी | राघोजीचा भाऊ. |

# सायुज्यसदननाटक.

## अंक ५.

( नंतर तुकोजीराव गायकवाड येतो )

तुकोजी.— बोधाजीराव सेनापतींनीं मला आज्ञा केली आहे कीं, शिवाजी राजाचे मनांत आपलें राज्य दिवसानुदिवस वृद्धिंगत करावयाचें आहे, ह्मणून तुह्मी पृथ्वीपर्यटन करून नानाप्रकारचीं अरण्यें पाहून जेथें जेथें सुपीक आणि राज्यस्थापन करण्यास योग्य अशीं स्थळें आढळतील, तेथें तेथें जा, आणि पाहून या; ह्मणजे राजास निवेदन करून त्या त्या स्थळीं स्वराज्यस्थापन करण्याचा उद्योग करूं. कां कीं राजाच्या हृदय—भूमिकेंत जी इच्छावल्ली उद्भवली, ती सदुद्योगरूप पाण्यानें शिंपून वाढविणें, आणि सफलित करणें, हा सेनापतीचा धर्म आहे. शाबास, यालाच स्वामिभक्ति ह्मणावें. जो सेवक स्वामीचें मनोगत जाणून तसें वर्तन करतो तोच उत्तम.

श्लोक. ( उपजाति )

मनोगतज्ञ[1] स्वबलार्थसुज्ञ[2] ॥
स्वभूपतीचा जनशिक्षणज्ञ[3] ॥
स्वराष्ट्रवृद्धिकर कार्य कर्ता ॥
मंत्री असा राजित[4] शत्रुहंता ॥

---

१ मनांतील जाणणारा. २ आपलें बल आणि द्रव्य जाणता. ३ प्रजांस शिक्षा लावण्यास जाणता. ४ शोभतो.

.८, हे सर्व गुण मला वाटतें आमच्या बोधाजीरावां- च्या ह्रदयरूप गुंफेंत वस्तीच करून राहिले आहेत. बरें, आतां आपण आज्ञेप्रमाणें या भवारण्यांतच पहिल्यानें सं- चार करूंया, आणि पाहूंया, बरें येथची जमीन, हवा, आणि पाणी कसें काय आहे तें.

[ असें ह्मणून निघून जातो ]

( नंतर राजा शिवाजी आणि राणी निवृत्ति येतात. )

शिवा०— या आरामवाटिकेंत रात्रीं निद्रा तर फारच चां- गली आली. पाहा, हीं गुलाबाचीं, बटमोगऱ्याचें, शेंवतीचीं, इत्यादिक झाडें प्रफुल्लीत झालीं आहेत. त्या फुलांचा सुगंध घेऊन, हा मंद सुशीतळ वायु वाह- तो, त्याच्या स्पर्शमात्रें करून सर्व इंद्रियें सुखानुभूती सुषुप्तिप्रत पावलीं. अशी झोंप मला, कधींच आली नव्हती.

निवृ०— घरांत बायका मुलांचा कलकलाट त्यामुळें अशी गाढ निद्रा ती कोठून येणार? त्यांत, ही तर आराम वाटिका; मीही तशांत बरोबर नव्हत्यें किरकिर करणा- री; परिचारादि कोणी कांहीं गलबा करील तर कना- डास कुलुपें घातलेलीं. आणि प्रिया परिचारा दृढा- लिंगन करणारी, मग गाढ निद्रा येईल तर काय झालें!

श्लोक. ( भुजंग प्रयात. )

स्वदासी कुसीसी त्रपाहीन केली ॥
कराया तसी साध्विनें नाहिं केली ॥

१ निर्लज्ज. २ क्रीडा. ३ पतिव्रतेने.

कधींही सुशय्या सुगंधा नरेंद्रा ॥
सुकांता न दे सौख्य ही गाढ निद्रा ॥ २॥

शिवा०— हे प्रियोत्तमे, तुझ्या मनांत असें कश्मल आलें काय ? तूं माझी प्रियांगना, सकल सुखैकधामा, जशी प्राणास तनु तशी मला असून तुझ्यावर माझा अनुराग नाहीं असें कसें होईल ? असें असतां, तूं असा भलताच संशय घेतीस, हें काय !

निवृ०— माझें मन तर शुद्ध गंगाजळ आहे, त्यांत कश्मल प्रभूच्या देहस्थित असेल तितकेंच येईल, दुसरें कुठून येणार ? आपल्याच भाषणावरून सिद्ध होतें कीं, प्राणास अनेक तनु धारण करणें असतात, त्यांतील मी एक आहें. जेव्हां प्राण दुसरी तनु धारण करतो तेव्हां पहिल्या तनूचें जरी कांहीं झालें, तरी तिकडे लक्ष देखील देत नाहीं; त्याप्रमाणेंच दुसरी प्रियोत्तमा मिळाली, ह्मणजे मग मला कोण विचारतो ?

### श्लोक. ( पृथ्वी वृत्त. )

प्रभू- गुणे—हिमाद्रिच्या शिखि विसंबुनी वाहने ॥
शरीर—अनुगामिनी पदपयाब्धितें पावते ॥
न कश्मल तिचे मनीं प्रभुशरीरजावांचुनी ॥
सदा सुकृत- आपगा तुमचि ही असे स्वर्धुनी॥ १ ॥

शिवा०— हे, माझे मानसमराळे, तूं माझ्या ठायीं हा वृथा दोषारोप करतीस. बरें, तूंच पाहा, हें विश्वचक्र

१ प्रभूचे गुणरूप हिमालयाच्या. २ अनुलक्षून जाणारी. ३ गंगा.

चालविण्याचें हें जें मला व्यसन आहे तें मला सुटणार आहे काय? बरें, जर कदाचित् सुटलेंच, तर मग मी प्रभु कोणाचा आणि तुला राणी महाराज असें तरी कोण ह्मणेल, बरें?

निवृ०— मी कुठें सुटणार आहें ह्मणत्यें? तेंही सुटणार नाहीं, आणि हें ही सुटणार नाहीं.

शिवा०— अगे, हें ही ह्मणजे, हें तें दुसरें कोणतें?

निवृ०— परीचारिकेबरोबर आनंदविलास करून संतोष मानण्याचें, आणखी कोणतें?

शिवा०— हे साध्वी, तूं मला व्यसनी ह्मणतीस काय? अगे हें राज्य सांभाळण्यास जरी मला नाना प्रकारच्या लोकांबरोबर व्यवहार करावा लागतो, तरी त्यांच्यापासून मी अगदीं भिन्न आहें. तशीच, ती मायाऊ तुझी पट्टदासी, जिच्या विषयीं तूं मला इतकें लावून बोलत आहेस, ती काय माझ्या अनुरागास पात्र आहे? काय मी तिजवर खरोखर प्रीति करतों? तर, तसें कांहीं नाहीं. ती जरी जातीची मांगीण आहे तरी तुझ्या सेवेच्या प्रतापानें तिच्या आंगीं अशी कांहीं विलक्षण शक्ति प्राप्त झाली आहे कीं, माझें नयनकटाक्ष तिजकडे गेलें, कीं ती मजा प्रसवूं लागली; ह्मणून आह्मास कधीं कधीं राज्य वृद्धि करण्याचें मनांत येऊन प्रजोत्पादनाची इच्छा होती, तेव्हां तिजकडेस अवलोकन मात्र करतों.

श्लोक. [ शिखरिणी ]

जगत्संवर्धाया मम मति रतीच्छाज इंकरी ॥

तदां विश्वश्रीचा पति ह्मणुन तीचे निजकरीं ॥
कराया जो चित्तीं प्रकृति तंव माझे सरसि ये ॥
सहर्लें विश्वांची नयन निरखूनी च ति वियेे॥ ४ ॥
असूया त्वचित्तीं नुरवि तिस रानीं दवडिली ॥
विटंबूनो बंधू दहुन सचिवीं ही रडविली॥
मुखें बोलें आतां मजसि अविषादीय वदनें ॥
प्रमोदें आलिंगीं वपुं कूरतुडीं शुभ्ररदेनें ॥ ५ ॥
जगत्संरक्षाया श्रम करून मी श्रांत सखये ॥
तुझें चुंबूनीया विगतश्रम होईन मुख ये ॥
विधूंहूनी वाक्यें सितल निज आख्यान वदसी ॥
ममार्गे शांतीला वरिनि तई जाईन सदसीं ॥ ६ ॥

निवृ०—( जवळ जाऊन दृढालिंगन करिते ) महाराज, क्षमा असावी. मी विनोदानें भाषण केलें, आपण सर्वज्ञ प्रभु, आपल्याठायीं मी दोषारोप करण्यास कशी शक्तिमान होईन ! माझ्याठायीं आपला अनुराग कांहीं जायांचा आणावयास नको; तो स्वभावसिद्ध असून अवीट आणि अमोघ आहे, हें, मला पक्के ठाऊक आहे.

शिवा०—हे मनोरमे, हे मधुरभाषणी, जसा चातक मेघतोयानें शांत होतो, तसा मी या तुझ्या कोमल आणि सरस भाषणांनीं थंड, आणि संतुष्ट झालों.

निवृ०—हीं आपलीं भाषणें, जसे मयूरास मेघांबुकण तशीं मला अति सुखकर होत आहेत, ह्मणून क्षणभर

---

१ प्रकृतीचे. २ विषादहीन. ३ प्रेमानें. ४ आंग. ५ दांत. ६ श्रमलो. ७ चंद्र. ८ मुखानें. ९ सतेस.

स्वस्थपणा असेल, तर उभयतां येथेंच बोलत बसावेंसें मला वाटतें.

शिवा०— होय, माझ्याही मनांत तसेंच आहे.

( असें ह्मणून उभयतां आनंदांत गोष्टी करीत बसतात. )

( नंतर सुमतिदासी येते. )

सुम०— महाराजांचा जयजयकार असो; या दासीला जवळ येण्यास आज्ञा असावी.

निवृ०— कांगे, काय आहे? ये हिकडे, सांग पाहूं, काय तें?

सुम०— ( अभिवंदन करून ) शांतिबाई निजून उठल्या आहेत.

निवृ०— मग, काय ह्मणतीस?

सुम०— त्यांची मर्जी या उपवनांत फिरावयास यावयाची आहे ह्मणत्ये. आज्ञा होईल तर.

निवृ०—(शिवाजीच्या कानांशीं लागून) या विलासवनांत अशा उपवरमुलीस इतक्या सकाळीं फिरणें, नीट नव्हे.

शिवा०— कां बरें नीट नव्हे! चहूंकडे चांगला बंदोबस्त असतां.

निवृ०— कां, तें काय सांगूं! आमचें आह्मी बायका जाणूं.

शिवा०— ( विस्मित होऊन ) मला समजूं नये, असें तें काय कारण बरें? ( मनांत ) काय हिला एकांतीं रममाण होण्याची इच्छा झाली आहे, मुलीस येथें आणण्यास नकारती ती?

निवृ०— महाराज, दुसरें कांहीं नाहीं. हें, वन उपवर मलीस मनोविकार करण्याजोगतें आहे; आणि आपली शांति उपवर झाली आहे, ह्मणून ह्मणत्यें.

श्लोक. [ वसन्ततिलका.]

ऐकून हे कहु कहु ध्वनि कोकिलांचें ॥
आरामि या युवति—मानस तूर्ण लांचे[1] ॥
भोगावया पुरुष-सौख्य हि प्रातरीं[2] या ॥
येऊन गोष्टि ह्मणतें मम अंतरीं या ॥ ७ ॥

शिवा०—( मनांत ) रात्रीं, त्या दुष्टकामाजीनें हिला माझ्या शय्येवरून उंचलून नेऊन राजसौधांतरीं ठेविलें ह्मणून हिला आतां विलासेच्छा उत्पन्न झाली असावी आणि त्या अनुभवावरून शांतिबाईस येथें आणलें तर कदाचित् तिला हि तसा विकार होईल असें ही ह्मणती, यांत अगदीं संशय नाहीं. ( तिला घट्ट आलिंगितो. )

श्लोक. [ पृथ्वी ]

त्वदीय मति ही अशी विघरली मदीयांगने[3] ॥
उन्हस्थित घृतापरी तरि सुखें मदीयांग[4] ने ॥
विलास—सदनांतरी परि कुमारिका ये स्थळीं ॥
विहार करुंदे सखीसहित शांति ही सोंवळी ॥ ८ ॥

निवृ०— ( हातांतून सुटावयास यत्न करिते ) हें काय ! भलतीच् कल्पना आपले मनांत आली, याला ह्मणावें

---

१ लांचावें. २ प्रातःकाळी. ३ माझेस्त्रिये. ४ माझे आंग;

तरी काय? हें स्वच्छ उजाडलें. चहूंकडे लोक फिरूं लागले, परिचारका गृहकृत्य करूं लागल्या, माळी फुलझाडांस पाणी शिंपू लागले, आतां मंत्रिजनांचा मेळा येथें जमा होईल; अशा समयीं जरी हें विलासवन आहे, तरी असें आलिंगन करणें, हें काय मेलें!

शिवा॰— तुझ्या बोलण्याचा भाव मला तसा वाटला, म्हणून मी असें बोललों.

निवृ॰— माझ्या बोलण्याचा भाव कांहीं तसा नव्हता, आपली शांतिबाई उपवर झाली, हें आपल्या लक्षांत यावें इतकाच होता. दुसरें कांहीं नाहीं.

शिवा॰— हाँ, असें काय, तर मग?

निवृ॰— तिला योग्यवराची योजना केली पाहिजे.

शिवा॰— ठीक आहे. कोण आहे, रे?

सुम॰— जी महाराज, ही मी हजीर आहें.

शिवा॰— जा, लौकर, आणि विचाररावांस बलावून आण.

सुम॰— फार उत्तम, (निवृत्तिबाईच्या कानांत) पण, शांतिबाईला काय सांगूं?

निवृ॰— (शिवाजीच्या कानांस लागून) शांतिबाईला येथें येण्यास परवानगी असावी; तिची इच्छा आहे तर.

शिवा॰— अवश्य. तिला ह्मणावें, आह्मी उभयतां येथें आहों, याकरितां तूंही या विलासवनाची शोभा पाहाण्यास ये येथें.

निवृ०— अगे सुमति, ऐकिलीस महाराजांची आज्ञा काय झाली ती ?

सुम०— जी, ऐकिलें ही, विचाररावांस बलावून आणावयाचें, आणि शांतिबाईस बागाची शोभा पाहावयास या ह्मणून सांगावयाचें !

निवृ०— होय, पण शांतिबाईला पहिल्यानें हिकडे बलावलें आहे ह्मणून सांग, आणि मग विचाररावांकडे जा. समजलीस ?

सुम०— हाँ, समजल्यें बाईसाहेब, ही निघाल्यें.

( बाहेर जाऊन लांब अवलोकन करून) ही शांतिबाई तर येथें आहे. (मातक्यानें लांब दृष्टी पांचवून) वाहवा ! हे पाहा, विचारराव ही हिकडसेच येताहेत; ठीक झालें, हेलपटा चुकला. ( शांतिबाईस ) सरकार आपल्यास बलावतात कीं.

शांती.— हाँ ही मी आल्यें. ( विलासवनांत प्रवेश करिते. )

( तिला पाहातांच सर्व सानंद आणि साश्चर्य होतात. )

श्लोक. [ वसन्ततिलका ]

जी शांति चिंतन मनीं जन शांत होतें ॥
मूर्ति स्वयें प्रगटली स्थळिं त्या अहो ते ॥
हे चंद्रिका उगवली दुसरी च लोकीं ॥
सूर्योदयीं हि सकला ह्मणती विलोकीं ॥ १ ॥
पुष्पस्थित भ्रमर सोडुनियां परागा ॥
जातोचना रजनि—भास तदीय आंगा ॥

---

१ कलासहीत. २ पुष्परसास.

सीतांशुचीं च किरणें रविचीं न तीं सीं ॥
वाटे हिच्या गमनिं सीत तयां मतीसी ॥ १० ॥
गेले चकोरे वरतीं परतोन आले ॥
पाहुनियां विधुंस पूर्वि हि ते न धाले ॥
हा पूर्ण नूतन अपूर्व विधू गणूनी ॥
भांबावलें बघुन शांतिस ते डुरूनी ॥ ११ ॥

**शिवाजी.**— आतांच चांगले उजाडलेसें वाटलें होतें, इतक्यांत हा चांदण्याचा आभास काय बरें दिसतो ? माझीं सर्व इंद्रियें शांत होताहेत.

**निवृ॰**— महाराजांस उगाच चांदण्याचा भास झाला तो. ही पाहा, आपली शांतिबाई आली—

**शिवा॰**— ( तिजकडे अवलोकन करून ) हाँ; ही शांतिबाई आली काय ? ( निवृत्तीच्या मुखाकडे लक्षून ) हे साध्वी, धन्य तुझी कूस जीजमध्यें हें असें कन्यारत्न झालें ती. ( मनांत ) या त्रिभुवनगुणोत्तमा शांतीला नवराही असाच गुणौघ योजला पाहिजे.

**निवृ॰**— ( शांतीस ) माझे लाडक्ये, तुला रात्रीं झोंप स्वस्थ आली ना ? तुझें मन संतुष्ट आहेना ?

**शांती.**— ( मातापितरांस अभिवंदन करून ) आपल्या कृपारूप जीवनांत मी सर्वदां संतुष्ट आहें.

**सुम॰**— ( जवळ येत्ये आणि अभिवंदन करून ) हे विचारराव येत आहेत.

**शिवा॰**— बरें, येऊंद्या हिकडे त्यांला. ( शांतीस ) माझे लाडक्ये, या विलासवनाची शोभा पाहाण्यास इच्छा असेल, तर जा, जरा हिकडे तिकडे फिरून ये.

---

१ चंद्राची २ पक्षिविशेष. ३ चंद्रास.

निवृ०— मुली, जा, या उपवनांत संचार करून नानाप्र-
कारच्या फुलांची, आणि झाडांची शोभा पाहात उन्ह झालें नाहीं तों लौकर परत ये. समागमें सुमतीला घेऊन जा बरें, एकटी जाऊं नको; (सुमतीस) जागे, आपले लडिवाळे शांतिबाईस या उपवनांत घेऊन, आणी सर्व शोभा दाखव हिला. सांभाळून ने बरें, आणि लौकर परत आण.

शांती.— बरें आई, पण, मी परत येई तोंपर्यंत तूं येथून जाऊं नको हो.

निवृ०— कां माझे लाडक्ये, असें कां ह्मणतीस ! तुझ्या बरोबर ही सुमति आहेना गे सोबतीस ?

शांती. नाहीं बये, मला एकटीला भय वाटतें, या बागांत; सुमति ही काय मेली सोबत ?

निवृ०— बरें तर जा, लौकर ये. मी येथेंच आहें बरें ना.

शांती.— पाहा ही मी अशीच परत येत्यें (असें ह्मणून सुमतीस समागमें घेऊन उपवनांत संचार करावयास जाती.)

(नंतर विचारराव येतो)

विचार०— (अभिवंदन करतो) महाराजांचा जयजयकार असो.

शिवा०— या, विचारराव, तुह्मांस बलावणें पाठविलें होतें.

विचार०— जी, मी स्वामीचे चरणदर्शनास निघालोंच होतों; इतक्यांत सुमतीनें आपण बलावलें ह्मणून सांगितलें, तसाच त्वरेनें आलों, किंचित् उशीर झाला ह्मणून क्षमा असावी.

शिवा०— ( हातानें जवळ येण्यास दर्शवितो ) या असे पुढें पाहूं विचारराव !

विचार०— ( झटकन हात जोडून पुढें होतो ) हा आज्ञा-धारक जवळ आहे.

शिवा०— ( निवृत्तीच्या मुखाकडे पाहून ) आपली शांति बाई उपवर झाली आहे, ह्मणून योग्य जामात पाहा-वा अशी ( निवृत्तीकडे हात करतो ) इच्छा झाली आहे.

दिंडी.

शांति बाई उपवरा झाली हीला ॥
योग्य नवरा पाहिजे पाहियेला ॥
तुह्मी सारे लागोन याच कामीं ॥
देश शोधा होऊन पवनगामी ॥ १२ ॥

विचार०— फार उत्तम महाराज, आज्ञे प्रमाणें करण्यास मी फार उत्सुक आहें; परंतु, शांति बाई प्रौढवयांत आलेली आहे नव्हे !

शिवा०— ह्मणूनच लौकर विवाहाची तयारी करावयाची. आमच्या घरांतून ही जामात पाहाण्याची अति उ-त्सुकता झाली आहे.

निवृ०— हि काय मेली सगळा दिवस मस्करी. उपवर मुलगी झाली, तिचा विवाह करावयाचा हा साधारण मार्गच आहे.

शिवा०— साधारण मार्ग तर खराच, पण मुलगी झाल्या दिवसापासून बायकांस केव्हां तिचें लग्न होईल, आणि केव्हां जांवई पाहीन असें होतें नव्हे ह्मणून ह्मणतों.

---

१ लग्नासयोग्य. २ वाऱ्याप्रमाणें चालणारे.

निवृ०— बरें, तसें कांहोईना ! मला जांवई पाहाण्याचं फार हौस आहे, ह्मणूनच तुह्मी शांतिबाईच्या लग्नाचं लौकर तयारी करा विचारराव, आणखी कोणास तर हौस नाहीं, ना !

शिवा०— ( सस्मित ) हे मनोधारिणि, शांतिबाईचें सुख वाढवून तिला सुखी पाहाण्यास जितकी तूं उत्कंठित आहेस, तितकाच मी आहें बरें.

श्लोक. ( समानी )

स्वीये पुत्रिका फलास ॥ ती सभर्तृका विलास ॥
भोगितां पहावयास ॥तोषे एक ऊभयांस॥ १२ ॥

कां विचारराव, मी ह्मणतों हें खरेंना ?

विचार.— हें काय विचारणें महाराज ! आपल्या मुखांतून जीं अक्षरें निघतात तीं वेदवाक्यें, तीं खरीं नव्हत असें कोण ह्मणेल ?

शिवा०—बरें तर, करा त्वरा. धाडा जासूद देशोदेशीं पाहूं.

विचार.— आज्ञा महाराज; परंतु या सेवकास विनंती करावयाची आहे, मोकळीक असेल तर.

शिवाजी.— काय, तुह्मास मोकळीक ? ती तर नेहेमी तुमच्याच पाशीं आहे,कां कीं.

श्लोक. [ इन्द्रवज्रा ]

मंत्री गुरू आणिक भेषजज्ञ ॥
साधू उपाध्याय सखा, गणज्ञ ॥

---

१ आपली. २ कन्या. ३ आनंद. ४ प्रधान. ५ वैद्य. ६ ज्योतिषी.

यांहीं नृपाळास हितें वदावीं॥
पृच्छे विणें संतत नीति दावीं ॥ १४ ॥

विचार.— महाराज मला इतकी मोकळीक देतात ह्मणून ह्मणतों.

श्लोक. ( पृथ्वी- )

स्वयंवर बरें मला, उपवरा कुमारीस सें ॥
सशास्त्र गमतें, सुखावह वधूवरांला, असे ॥
ह्मणून चतुरोत्तमा, ह्मणत, शांतिबाईस, मी ॥
पुसून वर योजना करिं त्वदीय पायां, नमीं ॥१५॥

शिवाजी.— शाबास विचारराव, शाबास ! असा गंभीर विचार तुह्मापाशीं राहतो ह्मणूनच तुमचें नांव विचारराव पडलें आहे. तें कांहीं उगीच नव्हे, यथायोग्य आहे, पण आमच्या घरांतील मनोदय कसा काय आहे तो पाहा आधीं.

विचार.— (निवृत्ती बाईकडे वळून ) मी विज्ञापना केली, ती बाईसाहेबांनीं लक्ष पूर्वक श्रवण केलीच असेल.

निवृत्ती.— आपण राजकाजकर्ते, सर्व समंजस आहां; आह्मी बायका ह्मणजे काय ! घरांतील आगटींत सोंधणाऱ्या. आमचा विचार तो काय तुह्मापेक्षां अधिक आहे ?

विचार.— तसें नव्हे. हें विवाहाचें काम; यांत आपलाच विचार आधीं घेतला पाहिजे, आणी महाराजांचें ह्मणणें ही तसेंच आहे.

निवृत्ती.— जर असें आहे, तर मी सांगत्यें माझा विचार·

---

१ दासवावा.

**श्लोक [ वसन्ततिलका ]**

शांति स्वयें वरिल ज्या पुरुषास तो,हो[1] ॥
या लोकमान्य अनघा[2] सुभगास गो[3]हो[4] ॥
हें मानवे मम मना प्रभुला विचारा ॥
मंत्रीमतें जरि विहीतं करा विचारा ॥ १६ ॥

**शिवा०**— फार बरें; साध्वी, जर तुझाहि विचार विचार रावांसारखा च गंभीर आहे, तर त्याप्रमाणें च होऊंद्या, मला फार संतोष आहे, त्याचा. ( इतक्यांत शांति बाई उपवनांत विहार करून सुमति दासीसह राजा आणि राणि बसलीं होतीं, त्यास्थळीं येते )

**निवृत्ती.**— ( शांतीचेंमुखचुंबून ) कां माझे लाडक्ये, बागाची शोभा पाहून समाधान पावलीसना ?

**शिवाजी.**— बेटा, याप्रातःकाळच्या सौगंधी पुष्पांवरून वाहात आलेल्या मंद, सुगंध, सुशीतल वायूनें तुझीं सर्व इंद्रियें संतुष्ट झालींना ?

**शांती.** — ( अधोमुख होऊन )

**श्लोक ( वसन्ततिलका )**

नाहीं सुखानुभव लेश हि या जिवाला ॥
आराम हा न गमतो मजलागिं वा[5]ला॥
पानांफुलांस हि फळाविण काय कीजे ॥
जें आवडे मम मनीं न इथे विराजे ॥ १६॥
भुंभुं रवें भ्रमरिं मस्तकशुल केला ॥
माते कधीं श्रुत न या तव कन्यकेला ॥

१ होऊ. २ पवित्र. ३ नवरा. ४ योग्य. ५ प्रीय.

दाही फुलांवरुन वाहुन वायु कार्य ॥
सागें सुखानुभव तो मजलागिं काय ॥ १७ ॥
( असें ह्मणून मूर्छा पावते )

निवृत्ती.—(तिला उचलून मांडिवर घेते) कोण आहे गे सुमती, आण लौकर सीतल पाणी पाहूं ! आणि विंझणा ही घेऊन ये.

सुमती.— ( त्वरेनें झारी भरून सीतल पाणी आणि वारा घालावयास कोंवळीं कमळिणींचीं पानें घेऊन येत्ये ) बाईसाहेब, हें घ्या पाणी, डोळ्यांस लावा. ( आपण थंडपानांनीं वारा घालत्ये )

( त्या उभयतां तीस सीतलोपचार करतात )

शांती.— (सावध होत्ये ) असें गे काय मेलें मला झालें तें, गिरकीच आली एकदम.

सुमती.— असें काय तह्मी केलें बाई, हं ! एकदम आमचे तोंडचीं पाण्यें पळालीं.

शिवाजी.— ( निवृत्ती बाईचे कानांत ) हें, असें काय झालें, माझे आवडतीला !

निवृ०— नाहींगा कांहीं, उन्हांत फिरून आली, तें पित्त तापलें जरा.

शिवा०— ( शांतीस ) माझे लाडक्ये, हुशार हो, तुझ्या विवाहाचा विचार चालला आहे; ऐकलेंस ना.

शांती०—(लज्जित होऊन आईचे गळ्यास मिठि मारते.)आई,

निवृ०— ( तिला पोटाशीं धरून ) माझे लडिवाळेशांति, तुला ऐहिक सुखाचा अनुभव घेतांना पाहून आपण संतोष मानावा, ह्मणून तुझ्या लग्नाचा विचार

---

१ शरीर.

मंत्रीजना समवेत सरकार करीत आहेत, तर जो तुला वर रुचत असेल, तो मजपाशी सांग, ह्मणजे मी सरकारास निवेदन करीन.

शांती. ( लाजून ) आई, मी काय सांगू ?

## आर्या.

कुलवधु वर मागाया लाजेना कीं सदैव जीवाजी ॥
दडपितहृदुपति येच्या येती तज्जन्य अंतरामाजी॥१८॥

निवृ०— बरें मुली, जा आतां घरीं, आणि झोंप जरासी. ( सुमतीस ) अगे, शीबिका तयार करीव,

सुम०—( जरा बाहेर जाऊन परत येते ) बाईसाहेब, ही शीबिका आणिली.

निवृ०— ( शांतिबाईस शीबिकेंत निजविते ) सुमती, हिला रंगमहालांत नेऊन निजीव, आणि सीतळ वारा घाल बरें; इतक्यांत मीही येतें.

सुम०— बरें बाईसाहेब ( असें ह्मणून शीबिकेबरोबर निघून जाते. )

निवृ०—( शिवाजीचा कानांत ) शांतिबाईच्या मनांत आपला प्रतिनिधी जीवाजीराव वर असावा, असें आहे सारखें वाटतें.

शिवा०— हाँ; असें आहे ! फारच उत्तम ( विचाररावास.) शांतिबाईचा विचार तुह्मांस समजला ना.

विचार०— होय, समजला, क्षिरींत तूप पडलें याहून अधिक तें काय पाहिजे.

शिवा०— मग, तुह्मी काय ह्मणतां !

---

१ जीवाजो प्रतिनीधीस वर मागाया अथवा जीवास जो

विचार०— ह्मणावयाचें काय ? सुमुहूर्त पाहून विवाह करावा. सर्व प्रधानमंडळीस या गोष्टीवरून मोठा आनंद झाला आहे, महाराज !

शिवा०— बरें तर, विवाहसामग्री तयार करून सर्व सिद्धता करा.

श्लोक. ( स्रग्धरा. )

शृंगारा सर्व कांची रुचिरें उपवनें रंगवा सौधें गेहें ॥
राज-द्वारें विशाळें जनपथ सगळे सिंचि सौगंध स्नेहें ॥
आमंत्रीं मंत्रवेत्ते जनपद अवघे पौरें वा, काननाचे ॥
वासी जे तापसी ही अभिनव नट ही थाट नृत्यांगनाचे ॥ १९

विचा०— फार उत्तम, महाराज ! आज्ञेप्रमाणें सर्व तयारी करतों.

( इतक्यांत पडद्या आंत मोठा ध्वनी होतो. )

शिवा०— हा ध्वनी कशाचा होतो. कोण बरें येत आहे ?

( ध्वनी झाल्यानंतर बोधाजीराव दाभाडे आणि तुकोजीराव गायकवाड येतात. )

बोधा०—
तुका०— } ( अभिवंदन करितात ) महाराजांचा जयजयकार असो.

शिवा०— या बसा, आज इतके लौकर आलां ?

बोधा०— सांप्रत आपले राज्यांत जिकडेतिकडे स्वस्थता आहे, महाराज !

---

१ नगर. २ सुंदर. ३ राजमहाल. ४ घरे. ५ रस्ते. ६ सुगंधीत-जाने. ७ वैद्दीक. ८ नगरस्थ.

शिवा०— होय, ह्मणूनच आपणास स्वस्थ निद्रा येत असेल.

बोधा०— आह्मां सेवकांस स्वस्थ निद्रा घेणें ह्मटलें, ह्मणजे तो रोग आहे; ह्मणून कांहीं नवीन उद्योग करावा असें मनांत आलें; त्याजवरून उठलों, आणि तसाच मुखप्रक्षाळण करून स्वामीचे दर्शनास आलों.

शिवा०— नवा उद्योग तो कोणता, बरें ?

बोधा०— आपले अतुलबल सैन्यास आपलें राज्य जितकें प्रसृत होईल, तितकें थोडेंच. ह्मणून कांहीं नूतन वसाहात करावी, या उद्देशानें सुपीक देशांचा शोध करण्यास (हात करून) हे तुकोजीराव गायकवाड यांस पाठविलें होतें.

शिवा०— (मनांत) धन्य आहे अशा सेवकास जो सदैव राज्यवृध्धीची इच्छा, आणि उद्योग सांगतल्याशिवाय करतो. (बाहेर) बरें, मग.

बोधा०— त्यांणीं आपले भवारण्याची जमीन सुपीक असून पानथळ आणि निरोगी आहे असें अनुमान केलें. हे, तेच समक्ष निवेदन करतील आज्ञा असेल तर.

शिवा०— होय. मी तें साकल्य ऐकून घेण्यास आणि तुमच्या मनोदयास अनुकूल होण्यास फारच उत्सुक आहें.

## ओंवी.

स्वराड्.- वृध्धीच्या युक्ती ॥ ज्या ज्या बोलेल तुमची उक्ती ॥
त्या मी उत्सुक याच वक्तां॥सावधान चित्तीं परिसाया॥२०॥

तुको०— ( पुढें येऊन अभिवंदन करतो ) हा आपला सेवक तुकोजीराव.

शिवा०— तुह्मी सर्व भवारण्यांत संचार करून आला ना ?

तुको०— जी, होय, आपल्या आज्ञानुरूप सेनापतींनीं सांगितलें ह्मणून.

शिवा०—मग, तेथची जमीन इत्यादि कशी काय आहे ?

तुको०— महाराज, जमीन तर अत्युत्तम आहे.

श्लोक. ( मालिनी )

क्षिति जल- कणयुक्ता पांकें ज्या नाक खालीं॥
तरि सुकृततरूंनीं भेटते अंतराळीं ॥
सफलित अतिवेगें सत्क्रिया सर्व होती ॥
खरिपरि सुखदाती कामदोग्धी अहो, ती ॥ २१ ॥

श्लोक. [ भुजंगप्रयात ]

भवारण्य विस्तीर्ण वस्तीस जागा ॥
करायास सांगा स्व आज्ञा नकां, गा ॥
विवर्धा स्वराष्ट्रा स्वसत्ता प्रभूजी ॥
वरा, ही वधूशी तुह्मां इच्छि भू जी ॥

शिवा०— वाहवा, शाबास तुकोजीराव ! तुह्मी खरे स्वामिकार्यतत्पर असून अमूल्य काम केलें. ( बोधाजीरावास ) आतां, सर्व पुढील उद्योग तुह्माकडे राहिला.

---

१ धान्य. २ पंकोस. ३ स्वर्ग. ४ कातळावर माति घालून ज्यांत भातपेरतात ते ढोकर पिकतें तशी. ५ कामधेनु. ६ वाढवा. ७ स्वीकारा. ८ नवरी. ९ पृथ्वी.

बोधा०— मी आपल्या आज्ञेचीच वाट पहात आहें.

शिवा०— अशा उत्तम भूमीचें राज्य आपणाकडे असलें-च पाहिजे, ह्मणून तेथें वसाहात करून स्वराज्य स्थापन करा.

श्लोक. ( मालिनी )

अवयव तुह्मि सारें मीच आत्मा जयाचा ॥
नृपति ह्मणति तो हा देह राजे जयाचा ॥
ध्वज तुह्मि उभवा मी साह्य संतुष्ट भावें ॥
करिन विभववृध्धी सत्कृती ही निभावे ॥ २३ ॥

बोधा०— ( सद्गद होतो ) हे राजाधिराज ! आह्मी आपले चरणाचे सेवक असून इतका मोठा मान आपण दिल्हा, येणेंकरून आह्मास स्वर्ग ठेंगणां वाटतो. आतां, जी, मी माझ्या मनांत घटणा करून ठेविली आहे, ती पायांपाशीं निवेदन करण्याची आज्ञा मागतों.

शिवा०— हा, मी ऐकण्यास तयार आहें मोठ्या औत्सुक्यानें.

बोधा०— हें भवारण्य ह्मटलें ह्मणजे चोराचें घर; ह्मणून जर यांत वसाहात करावयाची तर एक चांगला दुर्ग किंवा गड बांधून त्याचें आधिपत्य आपले प्रतिनिधी जीवाजीराव यांजकडे द्यावें.

शिवा०— ( आपल्याशीं ) नुकतेंच, शांतीबाईचा विवाह जीवाजीरावाबरोबर करावयाचें, खचित झालें आहे. ह्मणून ही घटना जी बोधाजीरावांनींकेली ती अनुपम्य आहे, असें मला वाटतें. कां कीं, आमचे जामात ह्मटले ह्मणजे त्यांस स्थानाधिपत्य अवश्य पाहिजे. ( प्रसिध्धपणे ) तुमची योजना तर फारच चांगली,

बोधाजीराव ! मला वाटतें चातुर्यास जो चतुरपणा मिळाला, तो ही तुह्मापासून च असावा. अहो, जी गोष्ट आमचे मनांत पुढें येऊन तुह्मास करावयास सांगणार, ती तुह्मी पूर्वींच तयार केली, हें केवढें आश्चर्य ! तर आतां त्वरा करा, आणि आपल्या शिल्पकाराला बलावून आणा.

बोधा०— हा विश्वकर्मा शिल्पकार, महाराज ! आपल्या आज्ञेची मार्गप्रतीक्षा करीत आहे.

श्लोक. ( चामर )

आणिला समागमेंच शिल्पकार[1] भूपते.॥
संपदावयास कार्य जाणुनी त्वादिंगितें[2] ॥
त्या करा निदेश[3] तिष्ठतो स्वपाणि जोडुनी ॥
देहदुर्ग[4] बांधण्यास आपल्या स्व आननें[5] ॥ २४ ॥

शिवा०— वः समागमेंच आणला आँ. शाबास ! ( शिल्पकारास) या असे हिकडे.

विश्व०— हा आज्ञाधारक सिद्ध आहे.

शिवा०— भवारण्यांत देहगडनामें एक किल्ला उत्कृष्ट तऱ्हेची रचना असून बळकट असा लौकर तयार करा.

विश्व०— जी, करतों आज्ञेप्रमाणें.

शिवा०— किती दिवसांत कराल ? कां कीं, काम उतावळीचें आहे, ह्मणून.

विश्व०— महाराज, काम नाजुक, नकशीदार असून

---

१ कारागीर. २.तुमचा अभिप्राय. ३ आज्ञा. ४ देहरूपकिल्ला. ५ मुखानें.

बळकट, आणि शत्रुस दुर्जय, असें झालें पाहिजे ह्मणून निदान नऊ दाहा महिने तरी लागतील.

**शिवा०**— बरें; होईल तितक्या जलदीनें काम चालवा, आणी तुमचें कौशल्य दाखवा बरें यांत. कां कीं, आमचे जामात राहावयाचे त्यांत.

**विश्वक०**—( आनंद पावून आपणाशीं )हँा; असें आहे तर आपल्या कसबाचें साफल्य व्हावयाचा दिवस आला आहे. ( विचार करून ) महाराज ! जी घटना देहग- डाच्या रचनेची योजली आहे ती स्वामीनीं पाहावी अशी या सेवकाची विज्ञापना आहे.

(एक मोठा पट पसरून दाखवतो )पाहा हिकडे सरकार (हातानें)

## साक्या.

परिघ[1] सात प्रत्येकामागें नीराशय[2] अवलंबे[3]॥
झुळझुळ जळ त्या माजी वाहे परतुन माजिच तुंबे॥१॥
चार वनें बंकांचीं[4] ठाणीं भिन्न सबल ज्या मांजी॥
जाउन[5] देती माजी अन्या रक्षक तेथें गाजी॥ २ ॥
सप्त पुऱ्या साजऱ्या गडामधिं ज्याला नउ दरवाजे ॥
स्तंभ मध्यें पवनाचा शोभे अनहत नौबत वाजे ॥ ३ ॥
गडशिखरावर उंच टेंकडी बालगड तइं साजे ॥
नवरंगांची[6] मांची मांजी[7] प्रभुचें पीठ[8] विराजे ॥ ४ ॥
दक्ष परादुर्लक्षा तेथें खिडकी कांत विलोका ॥
जी अनभिज्ञा- दुर्गम सुखदा अनन्य साधक लोकां॥३३

---

१ तट. ( सप्तचर्में ) २ जलाशय ( सप्तधातु ) ३ राहे.
४ चवकीदारांची. ५ हुशार. ६ उंच स्थान. ७ मध्यें.
८ आसन.

शिवा० — ( पाहून साश्चर्य आणि सानंदित होतो ) वाह-वा ! योजना तर तुह्मी फारच उत्कृष्ट केली.

विश्वक० — यांत आणखी नानाप्रकारच्या जाळ्या, नानाप्रकारचीं कारंजीं, किती ऐक घांट आणि क्रीडा-स्थानें करावयाचीं आहेत तीं येथें दाखवलींच नाहीं. हीं मुख्य मुख्य कामें करावयाचीं तीं मात्र येथें दाखवलीं, महाराज !

शिवा० — हाँ. जर असें आहे, तर जितकें तुह्मांमध्यें कौशल्य असेल तितकें खर्चून या किल्ल्याचें काम सर्वोत्कृष्ट करा. जरी कांहीं खर्च झाला तरी चिंता नाहीं समजलां, पण काम झपाट्यानें करा; किल्ला लौकर तयार झाला पाहिजे.

विश्वक० — महाराजांच्या आज्ञे प्रमाणें जरी मी त्वरा केली, तरी शिल्पशास्त्रानुरूप चांगलें टिकावया जोगतें काम ह्मटलें ह्मणजे निदान नऊ महिने पाहिजेत तयार व्हावयास.

शिवा० — नऊ महिने ! अहो मनुष्यें पाहिजे तितकीं लावा; एकाचे दोन खर्च करा; ह्मणजे काम लौकर होईल.

विश्वक० — ऐकावें महाराज ! पहिल्यानें एक महिनाभर तांबडी माती आणि चुना एकत्र करून कर्दम झाला पाहिजे. नंतर एक मास त्याला आळावयास पाहिजे. तिसऱ्या महिन्यांत त्याचा पाया घालून आकारेल; आणि गडाचे भाग जसजसे व्हावयाचे तसे होऊन पचव्या महिन्यांत दुर्ग दृश्य होईल. पांचव्यांत

प्रकाश वगैरे होण्याचीं साधनें बनतील. साहाव्यांत तीं पक्कीं होतील. सातव्यांत गृहें उपगृहें इत्यादि सर्व तयार होऊन आठव्या महिन्यांत जिकडे तिकडे स्थीरता होईल, आणि नवव्या महिन्यांत दरवाजे खिडक्या वगैरे नीटनेटक्या करून राहाण्यास योग्य असा देहगड तयार होईल, महाराज !

श्लोक. [ वसन्ततिलका ]

बांधीन देहगड मी जड या रितीनें ॥
कौशल्य कर्म जितकें करवे मतीनें ॥
तें सर्व दाविन करून प्रभुत्तमाला ॥
ऐसें ह्मणून करितो पदवंनाला ॥ ३४ ॥

शिवा०— बरें, तर काम चालू करा लौकर. चागलें पसंत काम झालें असतां तुह्मास मोठें इनाम मिळेल. ( तुकोजीरावास ) शिल्पकारासमागमें जा, आणी जसजसें काम होत जाईल तसतसें सरकारास निवदेन करा.

विश्व०— }
तुका० — } फार उत्तम, आज्ञा घेतों ( अभिवंदन करून चालते होतात. )

( नंतर सुमति दासी येत्ये. )

सुम०— ( खालीं लवून ) अभिवंदन करत्यें महाराज.

निवृ०— कां गे शांतिबाईस कांहीं आराम वाटलें ?

सुम०— आराम ? काय सांगूं बाईसाहेब !

निवृ०— ( घाबरून ) अगे, असें गे काय बोलतीस भ्रांतवट ?

सुम०— चुकल्यें बाईसाहेब. भ्रांतवट बोलतात ह्मणूनच धांवत आल्यें आपल्या पायापाशीं.

निवृ०— भ्रांतवट कोण बोलतात ?

सुम०— दुसरें कोण, आपणच.

निवृ०— ( रागावून ) केव्हांपासूनगे ? असें भलभलतेंच भकती वेडी.

सुम०— रागावूं नका बाईसाहेब, पण आरामांत आल्यापासून. या मेल्या आरामानेंच काम केलें हें इतकें, मी खरोखर सांगतें. आमच्या तर तोंडचें पाणी पळालें सरकार.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

घामेजली तनु सुफेतिवरी निजेली ॥
आंगावरी दुकुल कंचुकि ही भिजेली ॥
प्रत्युत्तरास हि न दे भलतें च बोले॥
शांती अशांत धरिते मजशीं अबोले ॥ ३५ ॥
घालूं करें व्यजनवात ह्मणे जळाला ॥
हा काय तों त्वरित सीत शिपूं जळाला ॥
तों तों रडे अणि हलाहल घ्या मराया ॥
आल्यें ह्मणे श्रुत ह्मणून तुह्मां कराया ॥३६॥

निवृ०— ( गहिवरून शिवाजीस ) शांतीची अवस्था कठीण. अहो वैद्यांस तरी बोलावून आणा लौकर. अरे कर्मा ! अहो धांवा आधीं.

शिवा०— घाबरूं नको प्रिये. कोण आहेरे, राजवैद्यांस बोलावा लौकर.

सुम०— क्षमा मागत्ये ही दासी. वैद्याची गरज आहे असें मला वाटत नाहीं. बाईसाहेब, तुह्मी चला घरीं लौकर.

---

१ गादी. २ वस्त्र. ३ देह. ४ विषविशेष.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

धन्वंतरी न सुखदायक हो जिवाजी[*] ॥
वांचून काय ह्मणते फळ जाणवा जी ॥
तातास आणि हि बयेस दयान्वितेस॥
कां भेषजें[1] करुन सन्निध आणितेस ॥ ३७॥
हें कानडें न समजों आह्मि कोणि चारा॥
जाणून ईंगित तदीय तुह्मी विचारा ॥
योजा चला त्वरित या वरें[2] औषधातें ॥
होणार होईल तसें लिहिलें विधातें[3] ॥ ३८ ॥

बोधा०—( शिवाजीस अस्वस्थ पाहून त्याच्या जवळ येतो ) महाराजांची प्रकृती अशी अस्वस्थशी कशाकरितां दिसती ?

शिवा०— आपले शांतिबाईच्या विवाहाची तयारी करावयास विचाररावांस सांगितलें आहे.

बोधा०— होय, त्याणी बहुतेक तयारी चालविली महाराज.

शिवा०— तयारी केली, पण शांतिबाई अस्वस्थ आहे, ह्मणून ही सुमति सांगती.

बोधा०— तर मी ( निवृत्तीकडे हात करून ) बाईसाहेबां बरबर जाऊन शांतिबाईच्या प्रकृतीचें सांत्वन करितों महाराज ! आज्ञा होईल तर.

शिवा०— ( निवृत्तीस ) मला वाटतें तुह्मी आणि बोधाजीराव जाऊन शांतिबाईची प्रकृति स्वस्थ राखा.

---

*धन्वंतरी जीवास सुखदायक नाहीं. अथवा जीवाजीरावावांचून फळ काय.१ औषधें, २श्रेष्ट अथवा पती हेंच औषध.३ब्रह्मदेवानें.

निवृ०— बरें, आह्मी तिला हुशार करतों.

( असें ह्मणून तीं उभयतां राजगृहीं प्रवेश करतात. )

( नंतर जीवाजीराव प्रतिनिधी येतो. )

जीवा०— ( शिवाजीस अभिवंदन करतो ) महाराजांचा विजय असो.

शिवा०— ( आज मोठी आनंदाची गोष्ट घडली आहे.

जीवा०— ती कोणती बरें महाराज ?

शिवा०— तुह्मी आमचे जामात व्हावयाचे.

जीवा०— ( ओशाळून ) आपण सर्वज्ञ प्रभु अहां तेथें मी दुबळ्यानें बोलावें तें काय ?

शिवा०— तुह्मी दुबळे पूर्वीं कधीं ही मव्हतां; आणि आतां तर नाहींच असें ह्मणां.

जीवा०— मी आपला आश्रित आहें, त्या पक्षीं दुर्बलत्व तर मजकडे पाहात नाहीं, परंतु जें आपण ह्मणतां, तें मात्र विहित असें मला ह्मणण्यास भय वाटतें. कां कीं -

दिंडी.

लोकिं होती संबंध शरीराचे ॥
साम्य पदवी धन आणि कुल जयांचें ॥
अभूपाला[1] भूपाल सुन्हद होतो ॥
कसा तुमचा शोभतो बोल हो, तो,॥ १॥२९॥

ह्मणून

श्लोक. ( इन्द्रवज्रा )

भूपोत्मजा[2] भूपसुतें वरावी ॥

१ राजा नव्हे अशाला. २ राजकन्या.

अन्यें कसी ती नवरी करावी ॥
शार्दुलकन्या पति— व्हावयाला ॥
कोल्हा कसा योग्य तुह्मीच बोला ॥ ४० ॥

( इतक्यांत तुकोजीराव गायकवाड येतो )

तुको०— ( अभिवंदनकरतो ) महाराजांचा विजय असो.

शिवा०— या तुकोजीराव; देहगडाचें काम कसें काय चाललें आहे ?

तुको०— एकुण कामतर फारच चांगल्या रीतिनें होत- आहे महाराज, मी सांगावयास च मुजरत आलों; पाया घालून झाला, आतां वरची इमारत ही तयार होईल लौकरच.

( इतक्यांत विचारराव येतो )

विचार.— महाराज ! सर्व नगरांत मंगलोत्सव करण्याची तयारी केली आपल्या आज्ञे प्रमाणें.

शिवा०— फार बरें, पण, हे पाहा; जीवाजीराव काय ह्मणतात ते.

विचार०— काय ह्मणतात जीवाजीराव ? त्यांच्या तोंडांवर नवरकळा तर आली; आतां ते कायह्मण- तील, आणि ऐकतो तरी कोण त्यांचें ? ( जीवाजीरावा- स विनोदानें ) आतां काय, शांतिबाई सारखी बाय- को, आणि प्रभु प्रत्यक्ष सासरे, मग आह्माशीं बोलतात तरीकशाला ! बरें बाबा, तुमचें दैव साडेतीन हात.

जीवा०—तुह्मी विनोद करतां, तर करा; तुमचे दिवस आ- हेत, रावसाहेब !

---

२ सिंह.

विचार.— होय, आमचे दिवस आहेत खरे नगरभर धां-
वाधांव करावयाचे, आणी तुमचे आहेत मौजमारा-
वयाचे नव्हे ?

जीवा०—याला काय ह्मणावें आतां, आपण ही थट्टा करूं
लागलां अशी ?

विचार.— ही काय थट्टा ? उगाच विनोद मात्र केला; प-
ण आतां काय ह्मणतां तुह्मीं, प्रभूनीं सागीतलें तें.

तुको०—ह्मणतात काय तें मी सागतों आज्ञा होईल तर,

विचार.—तुह्मी सांगा बापडे. तुह्मी मध्यस्थ व्हा, पाहि-
जे तर.

तुको०—मध्यस्थ तर पाहिजेच लग्नाचे कामांत. पण, सर-
कार आंदण काय देणार तें जीवाजीरावांस समजलें
काय?

विचार०— काय जीवाजी रावांस आंदण पाहिजे ?

जीवा०— प्रभूची कृपा हेंच माझें सर्व आंदण आहे; पण
शरीर संबंध करणें ह्मठलें ह्मणजे कांहीं तरी सोयऱ्यांशीं
साम्यत्व तर झालें पाहिजे नव्हे ?

विचार०— मोठ्याच्या मुली बरोबर विवाह झाला ह्मणजे
साम्यत्व झालेंच, दुसरें तें काय आणखी ?

तुको०— असें कसें ह्मणतां विचाराव तुह्मी ? प्रभूच्या
मुलीबरोबर लग्न केलें, ह्मणजे तिच्या डामडौलास जप-
लें पाहिजे; तें काय वारंवार प्रभूस सागावें ? आणि
तसें केलें असतां वराकडे दूषण येत नाहीं काय ? ह्म-
णून मुलीच्या खर्चास व चोळी पातळास सरकारांतून
वेगळी नेमणूक तोडून देण्याची आधीं तजवीज करा,
ह्मणजे सर्व गोष्टी यथास्थित होतील. आणखीं काय ?

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

स्थानापन्न करा प्रभो परणवा शांतीसवें तेधवां ॥
कांता— काय— सुखावयास अवनीं संपत्ति संवर्धवा ॥
दास्या द्या परिचारकां करि सुखा जी कन्यका संमता॥
रक्षा दत्त तुझीच स्वीय करुनी शार्दूल- विक्रीडिता॥४१॥

हें जीवाजीरावाचें ह्मणणें आहे, दुसरें कांहीं नाहीं.

विचार०— ( हास्यमुख ) शाबास जीवाजीराव, अगदींच थोडें मागितलें आपण.

जीवा०— सार्वभौम प्रभूपाशीं हें थोडेंच, नाहींतर काय पुष्कळ आहे ?

विचार०— पण घरांतील उंदीर मारण्यास माजरें, आणि शिकार करण्यास कुत्रीं मागावयास विसरलां, हें कसें ?

जीवा०— ( तुकोजीरावाकडे पाहातो ) विचारराव काय ह्मणतात, तें ऐकतांना ?

तुको०— होय, एकतों तर काय झालें. अहो ! तीं तर मुलीबरोबर पाठ राखणीं ह्मणून येतीलच, असें सांगा, त्यांला.

( सर्व मोठ्यानें खदखदां हंसतात.

विचार०— सर्वज्ञ प्रभूच्या कानावर, जीवाजी रावांचें जें भाषण झालें, तें घालून रुकार घेतों, ( असें ह्मणून, शिवाजीच्या जवळ जाऊन कानांत ) आपला विचार तर जीवाजीरावांस मान्य आहेच. परंतु त्यांचे कांहीं मागणें आहे.

शिवा०— मागणें ? जें त्याला पाहिजे असेल, तें देतों ह्मणजे झालेंना ! विचारा त्यांस, काय मागतात, तें ?

विचार०— मी विचारून त्यांचा आशय घेतला. ते इतकेंच ह्मणतात-

( पुर्वोक्त श्लोक ह्मणून दाखवितो )

श्लोक.

स्थानापन्न करा प्रभो परणवा शांतीसवें तेथवां ॥
कांता— काय— सुखावयास अवनीं संपत्ति संवर्धवा ॥
दास्या द्या परिचारका करि सुखा जी कन्यका- संमता॥
• रक्षा दत्त तुह्मीच स्वीय करुनी शार्दूल —विक्रीडिता ॥

शिवा०— अँः इतकेंच ना ! त्याची योजना म्यां पूर्वींच केली आहे. भवारण्यांत देहगड बांधण्याचें काम देखील चालू झालें, त्यांला ह्मणावें तेथील आधिपत्य तुह्मास देऊन त्याच्या रक्षणाची वगैरे सर्व सोय सरकारांतून होईल. तुह्मी कांहीं काळजी करूं नका, आतां परिचारिका इत्यादिक ह्मणतात, तर सांगतों एका.

श्लोक ( द्रुतविलम्बित. )

सुमति दासी न सोडि कधीं हि ती ॥
रत सदां प्रिय शांतिस जी हितीं ॥
दिधलि तद्वनिची[१] अवनी हि ती ॥
सुकणदा[२] तुह्मी व्हा तनुजा[३]— पती[४] ॥

श्लोक. [ भुजङ्गप्रयात. ]

सुखें देहदुर्गी सदाकाल नांदा ॥
मदीयां कुमारी सर्वे भोगि मोदा ॥
दिल्हें राज्य म्यां तेथचें जीवराया ॥
तुह्मी राज्जि व्हा शांतिला या वराया ॥ ४३ ॥

---

१ भमी. २ सुपीक. ३ जांवई. ४ माझे.

विचार०— ( जीवाजीस ) या जामातराव असे पुढें ? तुमच्या मागण्या प्रमाणें प्रभूनीं दिल्हें. आतां आणखीं कांहीं नाहींना ? ( तुकोजीरावगायकवाडास ) कां मध्यस्थ बाबा, झालेंना तुमच्या ह्मणण्या प्रमाणें, या आतां असे पुढें आणि ठरवा मुहूर्त एकदां, ह्मणजे झालें.

जीवा०— ( प्रभूच्या जवळ जाऊन वंदन करतो ) मी आपल्या पायांचा सेवक असून आपला पांक्त करीतां, तस्मात् आपण अमोघ दयासागर अहां. ( आनंदाश्रु ढाळितो. )

श्लोक. ( उपजाति. )

निजात्मजा देउन सेवकासी ॥
केली प्रभो भिल्लर[1]— नीर काशी॥
दया— घना चातक शांत जाला ॥
देतां तुह्मीं हा निज शांति जाला ॥ ४४ ॥

तुको०— ( प्रभूस अभिवंदन करितो ) आज मोठा आनंदाचा दिवस, शांति आकाची आणि जीवाजीरावाची वऱ्हाडीक सजली ह्मणून, तर सर्वत्र मंगलोत्सव करण्यास आज्ञा द्यावी महाराज !

शिवा०— ( हर्षयुक्त होऊन ) शाबास तुकोजीराव ! माझ्या शांतिबाईचें अभीष्ट चिंतन करणारे तुह्मी खरे. ( विचाररावास ) मंगलोत्सव करण्यास आज्ञा करा.

---

१ अल्पपाणी.

श्लोक. [ शिखरिणी. ]

विडे वांटा ताटां भरुन सुसिता नागर जनां ॥
द्विजां या वस्त्रान्नें अणि वनजनां चीरें अजिनां ॥
मृगांचीं आरंभा कथुन नटनां मंगल नटां ॥
कडाडां कांचीच्या शिखरवरचे दुंदुभि पिटा ॥ ४५॥

विचार०— महाराज ! मंगलोत्सव मघांच चालू झाला, हे पहा भेरी, ध्वनिगर्जना करीत आहेत, जिकडे तिकडे वाद्यगजर चालला आहे.

श्लोक. [ शालिनी ]

आकाशीं ही डुंडुम ध्वनि होती ॥
भेरी वाद्यांची धुमाळी अहो ती ॥
थैथैथैथै नाचती अप्सरा ही ॥
गंधर्वादी गाति उच्च स्वरांहीं ॥ ४६ ॥

साकरेची ताटें भरभरून गल्लोगल्लीं आणि रस्तोरस्तीं वांटू लागले. अन्नाचे तर पर्वत आणि वस्त्रांचे ढीग याचकां करितां पडले आहेत, महाराज.

( हिकडे वाद्यांचा एकच गजर झाला, तो ऐकून शांतिबाई डोळे उघडून पाहते तों जिकडे तिकडे लखलखाट आणि लग्नाची गुज गुज चालली आहे ह्मणून जवळ आई होती, तीस ह्मणत्ये. )

शांति श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

आई ध्वनी मंजुळ हा कशाचा ॥
दाहा शमे ऐकुन मानसाचा ॥

---

१ चांगली खडीसाकर. २ वल्कलें. ३ चर्में. ४ हरणांची
५ नृत्य' ६ नटवे. ७नाद. ८ नौबत.

या बोलती काय विवाह—वार्ता॥
ज्या शांतवीती घनशीडवीर्ता॥ ४७ ॥

निवृ० ( आनंदित होत्ये ) माझे लाडक्ये शांति, ही तुझ्या लग्नाची तयारी होत.आहे; जीवाजीरावाबरोबर तुझें लग्न करण्याचा निश्चय झाला आहे, ऐकतीस ?

बोधा०—( साश्चर्य मनांत ह्मणतो ) अहो ! जीस भ्रमरांचे मंजुळ खांनीं मस्तकवेधना झाली, तीच आतां भेरीचा ध्वनी, मंजुळ व दाहशामक ह्मणती, त्यापक्षीं सुख किंवा दुःख होणें हें पदार्थाधीन मुळींच नाहीं. तर मनाचे आधीन आहे.

शांति.—( किंचित् लाजून उठून बसत्ये. )

श्लोक. [ द्रुतविलंबित. ]

दुकूल सांवरि बैसुनि मंचकीं ॥
अलक बांधि आणीक हि कंचुकी ॥
पुशि शरीरज घर्म दुशालिला ॥
जननिला सुख हो सुखशालिला ॥ ४८ ॥

( सखिजनास ) दिंडी.

नको मजलागीं व्यजन—वात हा गे ॥
अतां जिविं माझे सीर्त फार लागे ॥
वृथा तुमचा हा कासयास भागे ॥
कार्य कांहीशा तरी दूर जागे ॥ ४९ ॥

निवृ०—( सखीजनास ) जागे जराशा बाहेर तुह्मी, ( बो-

१ पावसासारख्या. २ वणव्यानें पीडितास. ३ वस्त्र. ४ केंस. ५ विझणवारा. ६ थंडी. ७ शरीर.

बाजीरावांस ) सरकारास शांतिबाई खुशाल आहे ह्मणून कळवलें पाहिजे होतें, नव्हे ?

बोधा०— हे लग्नाच्या ताराबळीचे दिवस ह्मणून मीच स्वतः जाऊन प्रभूस निवेदन करतों सर्व, ह्मणजे झालें. ( शांतीस ) कां आका, मला आज्ञा आहेना ? ( असें ह्मणून शिवाजीराजाकडे जातो. )

शिवा०— ( बोधाजीस पाहून ) शांतिबाई स्वस्थ झालीना ?

बोधा०— ( सर्व वृत्त सांगतो ) होय, खुशाल आहे आतां, महाराज.

शिवा०— तर, तुह्मी आणि विचारराव बसून मुहूर्त ठरवा, ह्मणजे झालें.

विचार०— महाराज ! आपल्या प्रभूत्तमाच्या मुखांतून जें आलें, तें सुलग्न; तोच मुहूर्त; दुसरा मुहूर्त तो काय पाहाणार ?

बोधा०— या स्वयंवराचा शास्त्रार्थ ह्मटला ह्मणजे सुदीन सुवेळा असावी खरी, परंतु मुख्यत्वें ह्मणाल तर-

श्लोक. ( मालिनी. )

वधुवर—मन ऐक्या जेधवां पूर्ण आलें ॥
मम मति तर सांगे तेधवां लग्न झालें ॥
सुदिन प्रभुवराज्ञा मंगलारंभ केला ॥
युवतिसह जिवाजी सौख्य भोगूं भुकेला ॥ ५० ॥

शिवा०— बरें, जर असें तुमच्या मतें प्रशस्त आहे, तर तसें होऊं द्या..

( नंतर निवृत्तिबाई सुमति दासीसह शांतिबाईस घेऊन येती. )

**विचार०**— ही, शांतिबाई आली बरें;

**तुकोजी०**— हे, जीवाजीराव ही येथेंच आहेत.

**शिवा०**— ( शांतीचा हात धरून, विनोदानें ) शांति, मला खरेंच सांग आतां—

श्लोक. ( स्वागता. )

शांति हा वर तुला गमला गे ॥
जाशि या सहित सांग मला गे ॥
आपल्या गृहिं त्यजून अह्माला ॥
बोलुनी प्रभु सबाष्प हि झाला ॥ ५१ ॥

( जीवाजीच्या उजव्या हातांत शांतीचा हात देतो, आणि ह्मणतो. )

श्लोक. [ वसन्ततिलका ]

पाळुन ही स्वतनया तनयां समान ॥
देतों तुह्माकारं हिची सशरीरमान ॥
पाळा हिला निजशरीर अधीक मोजा ॥
नातिक्रमीं[2] सुरं[3] ह्मणे ह्मणती नमो जा ॥ ५२ ॥

( इतक्यांत विश्वकर्मा शिल्पकार येतो. )

**विश्वकर्मा०**— ( अभिवंदन करून ) महाराजांचा विजय असो.

**बोवा०**— या शिल्पकार, किल्ल्याचें काम महामुर झालें कीं नाहीं? हा पाहा आज शांतिबाईचा विवाह झा-

१ पुत्राप्रमाणं. २ उल्लंघन करूं नका. ३ देव.

ला; आतां कन्यादान सांगते ज्यावेळेस देहगड जामातास वरदक्षणा देणार प्रभु, ह्मणून विचारतों.

**विश्वकर्मा**०— काम तर बहुतेक पुरें होत आलें, महाराज! गड लौकर तयार करण्याविषयीं प्रभूची आज्ञा खरपूस आहे, ह्मणून रात्रीचा दिवस करून काम चालविलें आहे. मी स्वतः नेहमी तेथेंच कामाची देखरेख करित असतों; परंतु हा मोठा भेरीचा नाद कानीं पडला ह्मणून जरी मला आमंत्रण नव्हतें, तरी प्रभूच्या घरचें कार्य समजून धांवत आलों, येथें.

**बोधा**०— शाबास! तुमची काम करण्याची हातोटी एकुण फारच स्तुत्य आहे. मला वाटतें प्रभु ही संतुष्ट होऊन यावेळीं तुह्मांस मोठें इनाम देतील.

**विश्व**०— माझें कृत कर्म ह्मणजे स्तुत्य आहे असें नाहीं. या सर्वज्ञ प्रभूची कृपा मात्र सर्व स्तुत्य आहे.

**बोधा**०— ( शिवाजीपाशीं जाऊन ) विश्वकर्मा देहगडाचें काम बहुतेक पुरें केलें, ह्मणून सांगतो.

**शिवा**०— ( आनंदित होतो. ) शाबास शिल्पकार! मी वरनिश्चयाचे वेळेस च देहगड जीवाजीरावांस वाचादत्त केला, हें जाणून तुह्मी इतकें जलदीनें काम आटोपलें, ह्मणून तुमची वाहवा आहे, ( बोधाजीरावास ) यांला मोठें इनाम द्या बरें. ( असें ह्मणून कन्यादान-विधी संपादावयास बसतो. )

( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठा शब्द होतो. )

अहो प्रधानजन हो, या प्रभूच्या चरणाची सेवा करून दुर्जय आणि बलाढ्य झालेली अशी मायाऊ जी तुह्मी हेवा करून नगरा बाहेर काढून लाविली, ती प्रबळ हो-

ऊन हें भवारण्य आपली जहागीर समजून बंधूंसहवर्तमान येथें विहार करीत असतां या रानांत तुह्मी देहगड बांधतां, हें तुमचें कृत्य निर्विघ्नपणें तडीस जाईल असें तुह्मी समजतां काय ? अहो, तुमचें नांव विचारराव असून हें जें तुह्मी करतां, हें अविचाराचें कर्म नव्हे काय ? आपल्या बिळांत निद्रित झालेल्या सर्पाचें पुच्छ, तुह्मी पांयानें तुडवितां, आणि सुखी होऊं पहातां, हें होईल तरी कसें ? अहो, ज्याणी तुह्मापासून बहुत अपकार सोसले आहेत, ज्यांस तुह्मी परागंदा करून सर्व राज्यसत्ता आपणच बळकावली, ते आतां भवारण्यांत सबळ आश्रय करून स्वतंत्र राज्य करीत असोन तुह्मी तेथें गडाचा पाया घातला, तो पाहून चवताळले आहेत, तर सावध व्हा, सावध व्हा.

( सर्व सभय आणि सार्शक होतात. )

विचा०— अहो, हें काय ? त्या रांडे बटकीची एवढी मोठी कोण बरें वर्णितो ही ?

बोधा०— कांहीं बंड होण्याचा संभव दिसत आहे पुनः, याजकरितां वधूवरांस राजसौधांतरीं पाठवून द्यावीं हें उत्तम असें मला वाटतें.

तुको०— वधूरांस तर आतांच अंतर्गृहीं जाऊंद्या; आणि राजास ही; मग आपण आह्मीं आणि बंडवाले आहेत, पाहून घेऊं.

विचा०— होय, मलाही असेंच वाटतें. ( राजाजवळ जाऊन ) महाराज ! वधूवरांस घेऊन आपण अंतर्गृहीं प्रवेश करून विवाहहोमादि कार्यें करणें आहेत तीं करावीं, आणि शहरांत कांहीं चोरट्यांचा उप-

द्रव उद्भवलासा दिसत आहे त्याचा बंदोबस्त करण्या-करितां बोधाजीराव आज्ञा मागत आहेत ती त्यांस दिली पाहिजे.

शिवा०— हाँ, शहरांत चोरट्यांचा उपद्रव ? मी तर वि-वाहकार्यात गुंतलों आहें, त्या पक्षीं अंतर्गृहीं जाऊन कर्तव्य कार्म पुरें करतों. ( बोधाजीरावांस )

श्लोक. ( शिखरिणी. )

उठा सारे आधीं शम अणि दमादीक तुह्मी हो ॥
विखंडा चोरांचीं शिर आणिधडें कंर्दमिं मही ॥
भरावी रक्ताच्या सकल पुरवासी सुखि करा ॥
विवाहा जे आले आणि सदन- पंथस्थ- निकरां ॥५३॥

( अशी आज्ञा सांगून, राजा निवृत्ति, आणि सुमति, दासी सहवर्तमान वधूवरांस घेऊन अंतर्गृहीं प्रवेश करतो ).

बोधा०— कोण आहे परिचार येथें ? त्या दमाजीरावांस आणि शमाजी पतांस लौकर बलावा पाहूं.

तुको०— ( हिकडे तिकडे पाहून ) हे पाहा दमाजीराव आणि शमाजीपंत आले.

दमा०— ( अभिवंदन करतो ) महाराज, शहरांत बंडाचा प्रादुर्भाव दिसतो.

बोधा०— ह्मणूनच राजाची आज्ञा झाली आहे कीं, सर्व-त्रांनीं जाऊन बंडखोरांस प्रतिकार करावा.

शमा०— राजाज्ञानुरूप करण्यास हे पहा, आपण तर तयार आहों.

दमा०— ( बाहू थोपटून. )

---

१ चिखलानें. २ पृथ्वी. ३ घरांतील आणी रस्त्यांतील समूहास.

श्लोक. [ स्रग्धरा ]

मारूनी एकटा मी अहितं—करजनां[1] स्वस्थ पौरां करींतां॥
मारी शौर्यें करीचा निकर[2] विपल नोपेक्षि जैसा हरी[3] तो ॥
आज्ञा द्या गेहिं निद्रा करिं तव रवें वंदून हा कीं निघालो॥
घालाया त्या अमित्रांवर अपरिहर स्वीय दुर्वार्य[5] घाला॥५४॥

बोधा०— अहो, तुमचे शौर्याचा तर आह्मास पुर्ण भंरवसा आहे. परंतु न जाणों कोणती वेळ कशी येईल, ह्मणून प्रभूच्या आज्ञेप्रमाणें आपण सर्वच एकदम हल्ला करून बंडवाल्यांचा उच्छेद करून टांकूं; आणि तसेच परत येऊं, ( विचारावास) कां, तुमचें मनास येतें ना, हें, असें.

विचार०— प्रभूच्या आज्ञेप्रमाणें तुह्मी ह्मणतां हें योग्य आहे; तर तुह्मी, दमाजीराव इत्यादि मिळून जा आणि शहरांत बंदोबस्त राखा. शिल्पकार विश्वकर्मा देहगडाच्या कामाच्या रक्षणार्थ भवारण्यांत जाऊंद्या आणि मी स्वतः राजसौध संरक्षण करतों.

बोधा०— फार उत्तम.

( असें ह्मणून निघून जातात. )

( नंतर मायाऊ, राघोजी, मदाजी, मसाजी, मोहनाजी, आणि लुमाजी येतात. )

माया०— आपला कामाजीनाईक आज प्रातःकाळींच उठून कुठे गेला आहे कोण जाणें, त्याच्या मनांत त्या दमाजीरावाविषयीं फारच हिरिरी आहे; मी ह्मणत्यें, मेलें कांहि कां करितना प्रधान लोक, आपण शिवाजी

---

१ रिपुजनास. २ हत्तीचासमूह. ३ सिंह. ४ आज्ञा. ५ अनिवार.

राजाची चाकरी केली त्याचें फळ हें सर्व भवारण्य आपणास मिळालें, आतां आणखी तें काय पाहिजे? राजानें आपलें कांहीं वाईट केलें असें नाहीं. [ राघोजीस ] कां, तूं या रानांत अधिक सुखी आहेस कीं नाहीं बरें?

राघोजी— होय, आपण कांहीं राजास वाईट ह्मणत नाहीं. त्याचे उपकारच मानतों; आका, पण त्या सेनापतीस आणि त्या कोतवालास एक वेळ हात दाखविल्याशिवाय मला झोंप येत नाहीं. त्यांच्यावर माझा जीव भारीच जळतो.

## ओंव्या.

मदीय भ्रात्याची[१] काया ॥ जेणें कृशानें[२] जाळावया ॥
स्वकरें स्पर्शविला तया ॥ दुष्ट कपटिया शासीन ॥ ५४ ॥
जेणें फिरविलें डिंडिम[३]—पत्र॥विखंडून त्याचें असीनें[४] गात्र[५]॥
करीन अरिसंव्हार--सत्र॥ स्वीय[६] बंधू मित्र तोषवीन॥५५॥
ढळढळां बंबाळ अश्रुनीरें ॥ भिजती तआयांचीं[७] चीरें[८] ॥
मत्कृतें[९] तेव्हांचि खरें ॥ भ्रातृत्व तुझें शोभेल ॥ ५६ ॥

मदाजी.— दादा, आधीं आपण आपलें राज्याची बळकटी करूया, आणि मग त्यांजवर हल्ला करूं.

मसा०— आह्मी च्यार दिशा चौघांनीं सांभाळल्या, ह्मणजे झालें. दुसरी बळकटी ती काय करणार.

मोह०— आमचा कामाजी दादा गेला आहे मला वाटतें काही शिकार करावयास, तो त्या सेनापतीची आ-

---

१शरीर. २अग्नि. ३दवंडी. ४तलवारीनें. ५शरीर. ६आपले. ७ त्यांच्याबायकांची. ८वस्त्रें. ९माझ्याकृतीनें.

कि कोतवालाची दाणादाण केल्याखेरीज राहणार नाहीं. कोण जाणे आणखी हि किल्येकांस रडवील !

लुमार्जी.— रडवूं द्या त्याला खुब रडवूं द्या. होऊंद्या त्यांची पळापळ, लुच्चांनीं आमची पाठ पुरवली होती.

[ इतक्यांत घाबऱ्यां घाबऱ्यां कुतकाजो येतो ]

कुत० — अहो धांवा, अहों धांवा.

( सर्व घाबरतात. )

राघो०— ( पुढें होतो ) कायरे कुतका ! काय आहे ?

कुत०— ( मोठ्यानें आरोळी मारतो ) अहो पुढें व्हा, ( हातानें ) तें पाहा काय दिसतें तें !

पद.

सकल हि पाहा पाहा धांवुनियां ॥ धृ० ॥
शुक्लेलाल मृत्कर्दम गोळा झाला एकवटुनियां ॥ १ ॥
सात पुरें नउ द्वारें ज्याला भासति बाहेरुनियां ॥ २ ॥
गड अवघड अरिला बोजडसा ठेविति कुणि बांधुनियां ॥३॥
राजित अटवीपेंट हा जाणें दिसतो आकारुनियां ॥ ४ ॥
आत्म अहित वा हितकर पाहा तेथवरी जावुनिया ॥ ५ ॥
रविदासप्रभु कौतुक लक्षुन न ये जल नयनांतुनियां॥६॥५७

( ऐकून सारे एकदम उठून धांवतात. )

राघो०—अरे, हा तर किल्ल्याचा पायासा दिसतो गड्या !

कुतकां०— तर मग दादा याचा आतांच विध्वंस करून टाकूं या, कां कीं, विषवल्ली लहान आहे तोंच खुंटून टांकावी, हें बरें.

मसा०— होय, जर आतां उपेक्षा केली, तर कदाचित

---

१पांढरीं. २ मातीचा चिखल. ३ वनभूमी.

ते आपले शत्रु यांस्थानाचा आश्रय करून आह्मास फिरून दुःख देतील. ह्मणून चला आपण सारे मिळून एकदम पायाच खणून टांकूं, ह्मणजे झालें.

लुमा०— मी ह्मणतों कीं, किल्ला तयार होऊं द्या, ह्मणजे आपण बळकावून बसूं.

मद्दा०— लुमाजी ह्मणतो ही मसलत मला बरीशी वाटती बाबा, आपल्यास चांगलें निवाऱ्याचें आयतेंच घर मिळेल.

कुतर्का०— कदाचित् आपल्याला आयतें घर मिळेल तुह्मी ह्मणता तसें; नाहीं तर आपण मिळूं आपते मारावयास त्या शत्रूंच्या हातीं; दोहोंतून एक कांहीं तरी होईल खरें.

मोहना०— हा बेटा नेहेमीच असा. याचें भाषण सर्वदा द्वामुष्यसूचक. बरें, कामाजीदादानीं तर कुठे भरारी मारली आहे. ते कांहीं पराक्रम केल्याशिवाय येणार नाहींत ही माझी खातरी आहे, पण आपण मायाऊ आकास चला विचारूं आणि ती सांगेल तसें करूं.

राघो०—हीय, चला विचारूं, ती, आका तेथें आहे(मायाऊकडे येतात.)

माया०—कायरे! अरे, हा कुतकाजी कां मोठ्यानें ओरडत होता?

राघो०— आका, काय सांगूं? तुझ्या कृपेनें हें रान तर आपणास इनाम मिळालेंच आहे, पण मला वाटतें त्या लुच्चा कारभाऱ्यांनीं येथें ही आमचा पाठलाग करावयाची मसलत केली आहे.

**माया०**— ती कशी बरें आतां ते तुमचें काय काय करणार आहेत ?

**राघो०**— काय करणार ? तो पाहा, ( हांतानें दाखवितो ) किल्याचा पाया घातला. आतां उद्यां ते तेथें राहून आह्मास लुटून फस्त करण्याचें काम चालवितील, ह्मणून, तूं आज्ञा देशील तर एकदम जाऊन तो पायाच नाहींसा करून टांकतों, ह्मणजे कटकट गेली.

**मया०**— ( किंचित् विचार करून ) हाँ. मी समजल्यें आतां, जेव्हां राजास माझे खेरीज चैन पडेनासें झालें, तेव्हां माझी भेट घेण्याकरितां, राजा ही अंतस्थ जागा बांधून तयार करीत आहे, आणि ह्मणूनच भेरीचा घडघडाट चालला होता तो, मला वाटतें.

**राघो०**— असें असलें, तर मग आपलें कार्यंच झालें, पण आका, तुझ्यावर राजाची इतकी प्रीति आहे ना !

**माया०**— ( हांसून) अँः प्रीती ! तें काय सांगूं ? जरी कारभाऱ्यांनीं आपली सर्व पुण्याई खर्चिली, तरी जी राजास माझी चटक लागली आहे, ती कधीं ही सुटावयाची नाहीं.

**राघो०**— हाँ; असें आहे तर त्या कारभाऱ्यांचें उसनें उगवण्यास आह्मास किती वेळ ?

**मसा०**— त्या लुच्चांचें तर, अगदीं तळमूस करून टाकूं एका क्षणांत.

**मदा० मोह०**—
**लुमा०**— } तर काय आणखी ? जर राजा मायाऊआकाचें हातांत आहे, तर.

**माया०**— आर्धा किल्ला तयार होऊंद्या. आणि राजा

आंत येऊं जाऊं लागला, ह्मणजे तुमचे सर्व मनोदय पार पाडण्यास मी प्रयत्न करीन; कांहीं काळजी करूं नका. आतां स्वस्थ बसा.

राघो०—
इतर.— } बरें, आका, आमचे सर्व कल्याणाची खाण तुझी कृपा आहे, त्यापक्षीं तुझी आज्ञा आह्मांस शिर सामान्य.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

तूं आमची प्रकृति सौख्य--विवर्धणारी ॥
राजप्रिया भवविपीनिं विहारणारी ॥
आह्मी कृपाजलिं तुझे करणार केली ॥
हे मीन दीन तरती जरि त्वां ति केली ॥ ६८ ॥

( असें ह्मणून सर्व निघून जातात. )

## अंक पाचवा समाप्त.

पाचव्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पद. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४४ | १ | ५ | २ | ५ | ० | १ | ५८ |

# सायुज्यसदननाटक.

## अंक १.

### स्थळ.

### पात्रें.

| | |
|---|---|
| शिवाजी .. .. .. .. .. .. .. | सार्वभौमराजा. |
| निवृत्ति .. .. .. .. .. .. .. | त्याची बायको. |
| विचारराव . .. .. .. .. .. .. | त्याचा प्रधान. |
| विश्वकर्मा . .. .. .. .. .. .. . | शिल्पकार. |
| बोधाजीराव दाभाडे .. .. | शिवाजी राजाचा सेनापति. |
| दमाजीराव घाटगे .. .. .. .. | ,,—,,— कोतवाल. |
| तुकोजीराव गायकवाड. .. .. .. | ,,—,,— सरदार. |
| मायाऊ .. .. .. .. .. .. .. | शिवाजीची दासी. |
| कामाजी . .. .. .. .. .. .. | मायाऊचा भाऊ |
| मोहनाजी.. .. .. .. .. | मायाऊचा दुसरा भाऊ. |
| कुतकाजी .. .. .. .. .. .. .. | राघोजीचा सेवक. |
| जीवाजीराव .. .. .. .. .. .. | देहगडाधिकारी. |
| मानाजीराव फांकडे .. .. .. .. .. | त्याचा प्रधान. |
| मसाजी .. .. .. .. .. .. .. | मायाऊचा भाऊ. |
| राघोजी नाईक .. .. .. .. | ,,—,,— दुसरा भाऊ. |

# सायुज्यसदननाटक.

## अंक ६.

( नंतर राजा शिवाजी, राणि निवृत्ती आणि विचार राव येतात. )

शिवा०— शांतिबाईचा विवाह निर्विघ्नपणें तडीस गेला हें एक मोठें च काम झालें. मुलगी उपवर झाली, ह्मणजे. ती, एक बापाचे उरावर कटार असते; कां कीं, स्थळ, अन्नवस्त्रास दधात नाहीं असें चांगलें, नवरा अल्पवयस्क असून कुलीन, सुशिक्षित, गोरागोमटा, मुलीच्या हौशी सारखा मिळून कार्य निर्विघ्नपणें सिद्धीस जाणे ह्मटलें ह्मणजे पूर्वपुण्याईचेंच फळ समजलें पाहिजे.

निवृ०— तें तर सारें खरेंच. पण माझ्या शांतीला बरीक नवरा मना जोगता मिळाला खरा. कुठे दूर पाहायाला देखील जावें लागलें नाहीं; जवळचे जवळ सगळ्या सोई घडून आल्या, ह्मणून मला मोठी मौज वाटती. नाहीं तर मेलीं लोकांच्या पोरींचीं लग्नें ह्मटलीं ह्मणजे, वर्षांच्या वर्षें घुमत असतात. सगळ्या पृथ्वीभर नवरा पाहाण्या करितां हिंडतात तरी मना जोगता मिळत च नाहीं; एकादा मिळाला च तर, काळा, बेहेरा, दरिद्री, कपाळकरंटा, असा मिळतो. तसें तर कांहीं माझ्या शांतिबाईच्या लग्नाचें झालें नाहींना !

विचार०— असे कां ह्मणतां राणीसाहेब ! आपण सार्वभौम प्रभु, आपणास कोणते तरी गोष्टीची दधात आहे काय ? आपली कार्यें झटलीं ह्मणजे, सर्व बसल्या जागेवरूनच होणार, आपणास अवघड असें काय आहे ?

श्लोक. [ पृथ्वीवृत्त ]

निदेशं करि या जगा सुखसमृद्धि ही संहरी॥
अमित्रेगण-पाल दुर्जय करीस जैसा हरी ॥
सुरासुर महोग्र ही शिरिं सुपुष्प सा मानती ॥
जया नृपतिचा उणें न तइं पायिं ज्या मौ नती ॥

शिवा०— तुह्मा सारखे सुज्ञ, समंजस, आणि निःशीम स्वामिभक्त प्रधान साह्य आहेत त्यापक्षीं कोणतेंच कार्य घडून येण्यास अवघड नाहीं, हें, तर खरेंच आहे.

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित )

मंत्री मंत्रविशारद प्रभु-मनोज्ञ, श्री-यशेच्छू सुधा ॥
वाणीचा, कणवाळु कार्यकरणीं गाजी स्व स्वामी-सुधा ॥
धूर्तां वंचक, निष्कळंक, मतिमान् ज्या भूपतीला असे ॥
त्यांचीं गेहिं मनेप्सितें पुरति तो सौख्या हि भोगीतसे॥ २॥

श्लोक. [ वसन्ततिलका.]

मंत्री-सुजाण-महिपाल जनां सुखा दे ॥
मर्दी अमित्रगण तूर्ण समग्र मोदें ॥
त्याचा निदेश शिरिं वंदिति पुष्प सा ही॥

---

१ आज्ञा. २ शत्रूशमुदायमुख्य. ३ लक्ष्मी. ४ नम्र झालेली. ५ सरळ. ६ अमृत. ७ घरीं.

हा बोल भूप सचिवाधिक कोण साही ॥ २ ॥

( इतक्यांत पडद्या आंत मोठा शब्द होतो. )

अहो संमजस प्रधान हो, जो तुह्मी राजाज्ञेनें देहगड बांधला, तो या भुवनमंडळांत अगदीं अप्रतिम असा तयार झाला असून तुह्मी त्यांत वसाहत करण्याचा कांहींच विचार करीत नाहीं, आणि स्वस्थ बसलां, हें काय ? हें भवारण्य ह्मटलें ह्मणजे मांग, महार, रामोशी, आदिकरून चोर लोकांचे केवळ घर, अशा जागीं हें तुह्मी अत्यंत मनोहर आणि दुर्जय असें स्थान तयार केलें अहां; यांत वस्ती नसल्यामुळें कदाचित् हें एकाद्या चोरट्यानें बळकाविलें, तर तुह्मी काय कराल ? एक वेळ अशी निर्भय आणि अमुल्य जागा दुसऱ्याच्या हस्तगत झाली, तर ती तुह्मास परत मिळण्यास महा प्रयत्न करावा लागणार नाहीं काय? बरें तुह्मी ह्मणाल आपण बलाढ्य आहों, महा प्रयास हो करावयास चुकणार नाहीं; तर तसें करून तरी तुह्मास जय प्राप्त होऊन ही जागा फिरून तुमच्या हातीं लागेल याचा तरी भरंवसा काय ? तर, कोणी गडाधिकारी नेमा, उठा लौकर, त्वरा करा.

( सर्व कान देऊन ऐकतात. )

( नंतर विश्वकर्मा शिल्पकार येतो. )

**विश्वकर्मा**—(अभिवंदनकरितो)महाराजांचा विजय असो. देहगडाचें काम महासुर झालें. आतां रक्षक इत्यादिकांची योजना लौकर व्हावी.

**शिवा०**— ( संतोष पावून ) गड तयार होऊन वसाहतीस योग्य अशी चांगली निर्भय जागा झालीना ?

**विश्वकर्मा.**— होय महाराज, ह्मणून च विज्ञापना कराव-

ण्यास आलों. सरकारानें समक्ष लक्षपूर्वक माझें कौशल्य पाहून सुप्रसन्न व्हावें, ह्मणजे श्रमाचें साफल्य झालें.

श्लोक. ( वसन्ततिलका )

कौशल्य आजिवरि जें भरलें कुशीला ॥
होतें मदीय जरि दाविं न ती कुशीला ॥
होईल या जगिं ह्मणून प्रभुत्तमाला ॥
अर्पी गडाकृति करून हि माल्यमाला॥ ४ ॥

शिवा०— शाबास ! जर तुमची इच्छा आह्मी स्वतः देहगडाचें काम पाहावयास यावें अशी च असेल, तर तीही सफळ होईल ( निवृत्तीचे कानांत ) मला वाटतें आतां शांतिबाईस पतिसह सासऱ्यांस पाठविण्यांची तयारी करावी.

निवृ०— होय, माझे ही मनांत तसेंच आहे. मुलीची जात माहेरीं नेहमी राहिल्यानें लोकांत नीट दिसत नाहीं. लग्न ही उलगडलें, आतां उभयतां आपल्या घरीं जाऊन संसारसुखाचा अनुभव घेऊं लागलीं ह्मणजे झालें.

शिवा०— आपण जांवयांस जें आंदण देण्याचें वाग्दत्त केलें होतें, तो देहगड ही बांधून तयार झाला ह्मणून हा विश्वकर्मा शिल्पकार सांगतो, त्यापक्षीं, आतां विलंब न करतां प्रधान मंडळीस तयारी करावयास सांगून किल्ल्याचें आधिपत्य जीवाजीरावास देऊन शांतिबाई सहवर्तमान त्यांची प्रवारण्यांत देहगडीं रवानगी करून द्यावी. ( विचाररावास ) कां तुमच्या विचारास येतेंना, मी ह्मणतों हें !

१ दुष्टा. २ फुलांची माळा.

विश्वा०— ( खालीं लवून ) महाराज ! आपण ह्मणतां हें मला तर काय, पण सर्वत्र संमत आहे. देहगड तयार झाला, आतां, त्यांत अधिकारी योजण्याचा विचार होईल तितका लौकर झालाच पाहिजे. भवारण्य ह्मटलें ह्मणजे चोरांचें घर. कदाचित् गड रिकामा पाहून चोरट्यांनीं बळकाविला तर आपणास भगीरथ प्रयत्न पडणार फिरून.

निवृ०— ( गहिवरून ) अशा भयंकर ठिकाणीं माझ्या शांतीला पाठविणार ? अरे कर्मा ! ( साश्रु होऊन कपाळास हात लावते. )

शिवा०— हे मनोरमे, तुला वाईट तें कां वाटतें ? जरी तें अरण्य भयंकर आहे, तरी काय चिंता आहे. ? ( हातानें दाखवितो ) या विश्वकर्म्यानें देहगड किल्ला असा मजबूद आणि निर्भय बांधला आहे, कीं तेथें कोणाचें भय च नाहीं, असें सर्व लोक ह्मणतात; मग अशा ठिकाणीं शांति आणि जामात एकांत सुख भोगावयास गेलीं, तर बरें कीं वाईट हें तूचसांग पाहूं ?( विश्वकर्म्यास ) कां, आपला देहगड अगदीं निर्भय आहेना आतां, आंत वस्ती करावयास ?

विश्वक०— अगदीं निर्भय आहे महाराज ! राहाण्यास, चौक्या इत्यादि चांगल्या बळकट बांधलेल्या आहेत; तेथें भय कशाचें ?

निवृ०— जरी गड निर्भय ह्मणतां, तरी क्रूर रानांत बंदीवाना सारखें एकटें राहाणें ह्मटलें ह्मणजे, या लहानग्या दंपत्यांस कठीण नव्हे काय ! बरें, कदाचित् कांहीं अधीक उणें झालेंच तर कोणी शेजारी पाजारी

तरी आहे, कीं झटकनू धांवून येईल असा, तर तेंही नाहीं.

शिवा०— हे प्रिये, काय तुला वाटतें मी शांतीबाईला नवऱ्यासमागमें एकटी पाठवीन, आणि तेथें बंदीवाना सारखीं ठेवीन त्या उभयतांला ! छी; असें कसें होईल ! जो जीवाजीराव माझा प्रतिनिधी असून आणखी जामात, त्यास मत्सदेश सर्व वैभवोपभोग करून देणार नाहीं काय ? आतां तूं ह्मणतोस चोरांचें घर भवारण्य; तर गडाचें काम असें कौशल्याचें आहे, कीं, तेथें दुसरे कोणाचा प्रवेश देखील व्हावयाचा नाहीं.

## ओंव्या.

परीव एकामागे एक ॥ दढतर सात सुरेख ॥
परिरवा[2] त्यामाजी उदक ॥ विपूल वाहे सर्वदां[1] ॥ १ ॥
ऐशा अजिंक्य गडामाझारीं ॥ बांधिलीं बंकालयें[3] चारी ॥
तेथं सांग वनतस्करीं ॥ उपद्रव कीजे तो काय ॥ २ ॥
योजोन तई बंक[4] चतुर ॥ जे सदां रक्षिती नगर ॥
गड आणि गडशिखर ॥ शांती सपती जई वसे ॥ ३ ॥
बोधाजीराव सेनानी ॥ जो अति दक्ष अरिमर्दनीं ॥
त्याचिया करीं देऊनी ॥ रक्षण करणें तेथिचें ॥ ४ ॥
शमाजी आणि दमाजी॥जे अरिमर्दक आयुधेंच माजी॥
ते हो रक्षण करिती गाजी ॥ चिंता आजी न करीं तूं॥

विश्वक०— बाईसाहेबांस उगीच भीति वाटती. ज्यावेळीं समक्ष देहगड पाहातील त्यावेळीं खात्री होईल, या सेवकानें आपलें कौशल्य, कसें दाखविलें आहे

---

१ माझ्याप्रमाणें. २ खंदक. ३ चौक्या. ४ चौकीदार.

नें. बाईसाहेब, आपण बाल्या किल्याची रचना पाहाल, तर थक्कच होऊन जाल. त्यांत च शांतीआकासह जीवाजी रावांस बसावयास विश्रांतिस्थळ केलें आहे; तें तर परक्यास अगदींच दुर्विज्ञेय असें आहे.

श्लोक. ( शिखरिणी. )

गडामध्यें अंतर्गृह विवर त्या माजी विलसे ॥
गवाक्ष-द्वारानें गमन अभिवेत्ता करितसे ॥
अनभ्यस्ता त्रस्त त्रिदश हि करी मार्ग उलटा॥
जिना वक्राकारी भिवत्रि पद-चारी लटलटां ॥ १० ॥

श्लोक. ( स्वागता. )

भीरु ओंट-वळणी निसणी ती॥
ज्यास पाहिलि न पूर्वि कुणी ती ॥
जाणत्या सुलभ जी गमानाशी ॥
पोंचवी स्वपदिं शीघ्र हि नाशी ॥ ११ ॥

निवृ०— ( आनंद पावून ) एकूण माझ्या शांति बाई करितां आणि तिच्या पती करितां, तुह्मी इतकें उत्कृष्ट, निर्भय, आणि परास दुर्विज्ञेय असें स्थळ बाधलें, त्यापक्षीं तुमची शाबास आहे. आतां माझ्या जिवांत जीव आला, शांतीबाईस तेथें पाठविण्यास.

शिवा०— आतां तुझें समाधान झालेंना, माझे प्राणप्रिये ? जामाताच्या आणि शांतीच्या सुखाची जी सोय केली, ती सर्व तुला मानवली ना ?

निवृ०— ( किंचित् सस्मित ) आह्मा बायकांस काय स-

१ ज्ञानो. २आज्ञान्यास. ३भित्रा. ४वांकडा. ५शार्गीचालणारा.

मजतें ! आह्मी किति झालों तरी आगटींत पांहाणाऱ्या, आपण सर्वज्ञ, दीर्घदर्शी, जें कराल, तें सर्व, सोईवारच असेल. आह्मी तोंडानें मात्र उगीच वटवट करतों समजत नाहीं ह्मणून; जळली मेली बायकांची जात. नाहींतर मजहून शंभरपट आपणास माझ्या लाडक्ये शांतीची काळजी आहे.

( इतक्यांत बोधाजीराव, दमाजीराव, आणि शमाजीपंत येतात. )

बोधा०— ( अभिवंदन करतो ) महाराजांचा विजय असो.

शिवा०— नगरांत सर्वत्र स्वस्थता आहेना ?

बोधा०— होय, आपल्या आज्ञेप्रमाणें या ( हातानें ) दमाजीरावांनीं चोरट्यांस हांकून लाविलें. आणि शमाजीपंतांनीं सर्व पौरवासीजनांस स्वस्थ केलें.

शिवा०— पूर्वीं, तुह्मी ह्मणत असां कीं, नगरांत मांग वगैरे राजाश्रित आहेत ह्मणून त्यांपासून वारंवार जनपदांस उपद्रव होतो, त्यांस तर आतां सरकारांतून नगराबाहेर काढून लाविलें, तत्रापि शहरांत चोरट्यांचा उपद्रव होतो यास काय ह्मणावें ? ( दमाजी रावास अनुलक्षून ) कां, हे चोरटे येतात तरी कुठून ?

दमा०— महाराज ! क्षमा असावी. हें भवारण्य नगरालगत पडलें, त्यांत मांग पेंढारी जे आह्मी नगरांतून काढून लावले, ते आश्रय करून राहिले आहेत, ते कधीं कधीं येऊन असा उपद्रव करितात.

बोधा०— या साठींच मी भवारण्यांत गड बांधून वस्ती करावयाची, ह्मणून स्वामीस विनंती केली आहे ती.

श्लोक. [ स्वागता ]

त्यावनीं वसवुनी जनकोटी ॥
संहरूं अनिति-वर्ति हि पोटीं ॥
ज्यांचिया नयविरुध्दमती ते ॥
वाढवूं प्रभुयशा सुमतीतें ॥ १२ ॥

शिवा०— शाबास सेनापते ! तुमचा उद्देश आणि बेत हीं दोन्ही फारच स्तुत्य आहेत.

क्रिया०— महाराज, देहगड तयार झाला, आतां तेथील अधिकारी, कामदार, यांच्या नेमणुका करावयाच्या, त्या बोधाजीरावांस करावयास सांगाव्या, ह्मणजे शांती आक्काची पाठवणी करावयास झाली.

शिवा०— ( बोधाजीरावांस ) शिल्पकार विश्वकर्मा आला आहे, त्यास विचारून गडाच्या आकृतीप्रमाणें जे जे कामदार योजावयाचे, ते, विचाररावांचे संमतानें योजा, आणि शांतिबाईची वरात नेण्याची तयारी करा. आतां विलंबकरणे ठीक नव्हे.

बोधा०— गडाची आकृति माझ्या च विचारानुरूप आं-खली, त्यावेळीं कोणत्या स्थळीं, कोणाची, कशाक-रतां, नेमणूक करावयाची ही योजना मी करून ठेवली आहे. आज्ञा होईल तर निवेदन करतों.

शिवा०— यालाच पुरें शहाणपण ह्मणावें. धन्य तुमच्या कर्तृत्वाची. मला फारच संतोष झाला, तुमची म-सलत आणि बेत पाहून. ज्या योजना तुह्मी केल्या असाल, त्या बोला पाहूं आतां मजपुढें. त्या यथा-योग्यच असतील यांत संशय नाहीं; परंतु.—

बोधा०—( पुढें होऊन ) महाराज ! किल्ल्याचें रक्षण, आं-

वयांचा इतमाम, आणि सरकारचें नांव, यांजकडे लक्ष पुरवून पाहिलें तर एकमुख्य प्रधान, दोन लेखक, चार बंक, इतकें तर पाहिजेतच पहिल्यानें; बाकी चाकरचुकर दास दासी खासगी कामाकडे लागतील, तीं, वेगळींच सरकार पाठवतील. आणि शिबंदी वगैरे पाहिजे, ती मी पाठवीन.

शिवा०— बरें तर मुख्य कारभारी कोण नेमतां ? कोण, त्या कामास तुमच्या मतें योग्य आहे ?

बोधा०— मानाजीराव फांकडे माझ्या मतें योग्य असून, काम निभावतील सारखें वाटतें. ह्मणून त्यांस योजलें आहे. त्याणी आपल्या पतकासहित देहगडीं जावें, आणि सर्व कारभार सांभाळावा.

शिवा० बरें, लेखक ?

बोधा०— एक चित्रोपंत आणि दुसरा गुप्तोपंत यांणी सर्व जमाखर्चाचें लिहिणें ठेवावें.

शिवा०— बरें, चार ठाणेदार कोण नेमतां ?

बोधा०— हां. आतां ठाणेदार; त्यांविषयीं मी अशी योजना केली आहे सरकार, पहिल्या बंकालयाजवळ घोर रान आहे, तेथें आपले भटोजीबावा[१] ठाणेदार योजावे. दुसऱ्या बंकघरीं संतोजीबावा[२], आणि तिसऱ्यांत रुद्रोजीबावा[३] याप्रमाणें नेमावे. आतां चवथें बंकगृह ह्मठलें ह्मणजे, तें अगदीं वाल्या किल्याच्या पायथ्यांस असून ज्यांत शांतिआका एकांत विलासांत बसणार त्या अंतर्गृहा सन्निध आहे, तेथें ठाणेदार ह्मटला ह्मणजे,

---

१ रजोगुण ब्रह्मदेव. २ सत्वगुण विष्णु. ३ तमोगुण रुद्र.

कोणी तरी स्त्रीच योजली पाहिजे. ह्मणून मी ह्मणतों, अपाली आवडती चतुराऊ हिची नेमणूक तेथें करावी. आणि सर्व अंकगृहांवर तिचा वरिष्ठ अधिकार ठेवावा, ह्मणजे फंद, फितूर देखील होण्याचें अगदीं भय नाहीं.

शिवा०— वाहवा ! नेमणूका तर सर्व यथायोग्य केल्या बोधाजीराव, मला सर्व संमत आहेत. ( विचाररावांस ) कां, तुमच्या मनास कसें काय येतें ?

विचा०— बोधाजीरावांनीं जें केलें, तें सर्व संमत आहे; त्यांत न्यूनाधिक करण्याची अगदीं गरज नाहीं.

शिवा०— बरें तर, देहगडीं जिवाजीरावाची स्वारी शांतिबाईसह जावयाची ह्मणून वाद्यादिकांची तयारी करून मंगलोत्सव करा.

श्लोक. ( भुजंगप्रयात )

पिटा दुंदुभी वाजवा हो तुतारा ॥
वितानें गडाच्छादितें दूर सारा ॥
करा मोकळा मार्ग चालावयाला ॥
चला सर्व आमात्य पाहावयाला ॥ १३ ॥
सर्वे नेमिल्या कामगारीं असावें ॥
गडीं आपलाल्या स्वकार्मी बसावें ॥
जिवाजीस शांतीस रक्षावयाशी ॥
दमादी मदामात्य व्हा रानवासी ॥ १४ ॥

श्लोक ( इन्द्रवज्रा )

रक्षावया देहगडास सेना ॥

---

१ पडदे. २ माझे आमात्य. ३ भवारण्यवासी.

घ्या भीति तद्वासि जना दिसेना ॥
ऐसीं शतें चालवि शांतिजीनी ॥
दुर्गा- भिषेकास कराय रानीं ॥ १५ ॥

( इतक्यांत पडद्या आंत मोठा शब्द होतो )

शांतिबाई आपला प्रियपति जिवाजीराव याजबरोबर देहगडी सासऱ्यांस जाणार, ह्मणून राजाज्ञानुरूप बोधाजीराव सेनापतींनीं सांगीतल्या वरून, समागमें जाण्याकरितां नेमलेले कामगार आपआपल्या पतकां सहवर्तमान, आणि पौरवासी लोक मोठ्या समारंभानें तयार होऊन उभे राहिले आहेत, तर सर्व सभासद हो, तुह्मी ही उठा लौकर त्यांजबराबर जाण्यास, त्वरा करा.

( ऐकून सर्व उठून उभे रहातात )

बोधा०— ( हात जोडून उभा राहतो ) महाराज, सर्व तयारी झाली, चलावें मडळीनें.

( इतक्यांत )

श्लोक ( उपजाति )

नृपाल सौधस्थित दुंदुभी तो ॥
कडाडला ऐकुन लोक भीती ॥
अन्याय- वर्ती सुजनास मोदा ॥
दे शांति-प्रस्थानिं करी निनादा ॥ १६॥

( सर्व चालूं लागतात )

श्लोक ( स्वागता )

धांवती दुडुदुडू तुरगांची ॥
अर्बुदें तशिच हो अनुगांची॥

---

१ शांतीच्या पतीला.

चालती रथरवें नभपोटीं ॥
लागलें दुमदुमो घनकोटी ॥ १७ ॥

( नंतर तुकोजीराव गायकवाड पुढें येतो )

तुको०— ( शिवाजीस अभिवंदन करतो ) हें च भवारण्य, महाराज, ( हातानें ) तो पाहा देहगड, आपण अगदीं सन्निध आलों.

शिवा०—( आनंद पावून ) हा च देहगड, विश्वकर्म्या शिल्पकारानें बांधला तो ! एकुण धन्य आहे त्याच्या कसबाची. आहाहा ! काय हो हें सुंदर काम; ज्याला पाहून स्वर्ग भुवन ही लाजेल ! शाबास विश्वकर्म्या, शाबास.

विश्वक०— ( पुढें होऊन ) महाराजांनीं समक्ष पाहून पसंत केलें माझें काम, इतक्यानें मी कृतकार्य झालों. माझ्या कसबाचें सार्थक झालें, आज.

शिवा०— ( निवृत्तीस आणि प्रधानमंडळीस ) या पुढें, आणि पाहा ह्या देहगडाचें काम, ज्यांत आपली शांति जीवाजी रावांसहवर्तमान राहणार, तें. वाहवा ! कायहो हें गडाचें सौंदर्य स्वर्ग लोकास लाजविणारें ! याची बळकटी पाहा कशी आहे ती. याचा आकार पाहा. तो पाहा बाला किल्ला, ज्यांत रमणीय स्थान माझे शांतीकरतां ह्मणून च केलें आहे; पाहिलेंत ना, तें !

( सर्व, किल्ल्याचें सौंदर्य लक्षपूर्वक पाहून चकित होतात आणि तोंडांत बोटें घालतात. )

निवृ०— ( आनंदित होऊन ) एकूण माझी शांति दैवाची

खरी. ( शिवाजीस ) हें सर्व राज्य माझ्या शांतीला आंदण दिल्हें ना ?

शिवा०— होय, माझे प्राणप्रिये, या सर्व भवारण्याचा उपभोग जीवाजीराव शांतिसहवर्तमान सदैव करोत; ऐकलेंसना ?

( नंतर जीवाजीराव शांतिसहवर्तमान देहगडांत प्रवेश करितो. )

( सर्व प्रधानमंडळी आनंदानें टाळ्या वाजवितात; गडा-वर भेरीचा नाद होतो. )

( हिकडे मायाऊ आणि कामाजी गडावरील वाद्य-ध्वनि ऐकून गडांत राजा स्वतःच राहावयास आला अशा आशेनें आनंदित होतात. )

माया०— ( किंचित् हास्यमुख ) आज राजेसाहेबांचा चेहेरा म्या स्वप्नांत पाहिला, आणि जागी होऊन पाहा-त्यें, तों खरोखरच गडावर स्वारी आली.

कामा०— स्वारी आली सारखें वाटतें खरें, पण आका, ते लबाड कारभारी बरोबर आहेत कीं नाहींत, तें आधीं पाहिलें पाहिजे नव्हे ?

माया०— होय, तेंहीं खरें. जर ते समागमें असले च तर आमची आशा व्यर्थ होईल. पण तें आपणास कसें समजेल ? मी गेल्यें असत्यें, पण कदाचित् कोण जाणे; ते असले च तर लागली च कळ लावतील.

कामा०— तूं सांगशील तर मी जातों, आणि पाहातों स्वारी समागमें कोण कोण आहेत ते.

माया०— पण, तुला कोणी तेथें पाहिलें, तर मग ?

कामा०— जाऊं द्या गे. ते काय मला पहातात ? मी त्यांच्या बापास देखील दिसणार नाहीं.

माया०— बाबा, दिसणार नाहीं कसा ? त्या मेल्यांला शंभर डोळे आहेत.

कामा०— बापडे शंभर सोडून हजार कां असत ना, माझें काय करतात ?

माया०— काय करतात, त्यांचे दृष्टीस पडल्यावर ?

कामा०— पण, दृष्टीस पडेन तेव्हां ना ?

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

गेलीं जरा अंग, अनंग हा मी॥
जाईन सौधीं जरि दुर्गधामीं ॥
कोणी कसा पाहिल डोळयानें ॥
झालों नवा केवळ ही वयानें ॥ १८ ॥

माया०— हाँ; ही गोष्ट खरी. त्या लबाडांनीं तुझें जें अकल्याण ह्मणून केलें, तें कल्याण च झालें. बरें, जा तर तेथपावत, आणि पाहून ये, कोण कोण स्वारीसमागमें आले आहेत, ते, आणि रागरंग ही कसा दिसतो तो. पण सांभाळून जा.

कामा०— फार बरें आका, हा असाच आलों समज, काय आहे तेथें तें पाहून. ( कांहींसा पुढें जाऊन आकाशाकडे पाहतो, इतक्यांत समोरून मोहनाजी आणि कुतकाजी येतात. )

मोहना०— कामाजीदादा ! तुह्मी कुठे चाललां ?

कामा०— त्या गडावर राजाची स्वारी आलीशी वाटती, ह्मणून पाहायास जातों. पण तुह्मी रे कुठे गेलां होतां ?

मोहना०— आह्मी ह्मणशील, तर तेथेंच गेलों होतों.

कामा०— अरे, पण तुह्मास कोणी तेथें वळखलें नाहीं कसें ?

मोहना०— ते काय वळखतात ? मी झालों होतों भट आणि कुतका झाला होता जोशी, ही पाहा, ( हातांत दाखवितो ) घरभरणीची दक्षणा देखील घेऊन आलों.

श्लोक. [ शार्दूलविक्रीडित ]

झालों भिक्षुक भाट मी कुतक ही विद्वज्जनीं ठाकलों ॥
सन्मानें ह्मणतां बसा बसुनियां अन्यांसवें वांकलों ॥
जैसें ते करिती तसें करुनियां ही घेतली दक्षणा ॥
नाहीं पाहियलें आह्मा कुणि तईं उन्मीलुनी ईक्षणा ॥ १९॥

कामा०— वाहवारे ! तुह्मी तर मोठी च ठकबाजी केली. असो, पण जे आमचे वैरी प्रधान ते स्वारीबरोबर नाहींत ना ?

मोहना०— ते तर दुष्ट सगळ्यांच्या पुढें आले आहेत. ह्मणूनच आह्मी पळत आलों, आकाला सांगावयास.

कामा०— ( घाबरून ) चला तर लौकर आपले मायाऊ आकास हें वर्तमान सांगूं. ( असें ह्मणून सर्व मायाऊकडे येतात. )

कुतका०— झालें आतां, घ्या ह्मणावें, करा धांवाधांव. मी अगोदर च सांगत होतों, कीं किल्ल्याचा पायाच खणून टांकू या, तेव्हां ऐकिलें नाहीं ? ( असा बडबडत सर्वांच्या अगोदर धांवत मायाऊकडे जातो. )

माया०—कायरे, राजेसाहेबांची स्वारी आली ती पाहिलीस काय ?

कुतका०— माझें ऐकलें नाहीं, पण आका, घर बुडालें.

( असें ह्मणून रडूं लागतो. )

माया०— अरे झालें काय ? कशानें घर बुडालें ? तूं ह्मण-
तोस तरी काय ? नीट बोल.

कुतका०— श्लोक. [ वसंततिलका ]

आले सचीव करणार सदां अहीतें[1] ॥
अस्मन्नृपाल-अगरुश्रित जे अही[2] ते ॥
दंशावया अरि[3] तदीय वनीं दडाले ॥
हे भेक[4] आह्मी न कसें घर हें बुडालें ॥ २० ॥
मी बोललों गडचि ध्वस्त करा उठा वो ॥
तें ऐकते न मिळता तरि त्यांस ठावो ॥
धिःकारिलें तइं मला नि मदीय वाचा ॥
धोका अतां अपरिहार दिसे जिवाचा ॥ २१ ॥

( हें ऐकतांच सर्व कपाळास हात लावून अधोमुख चिं-
ताग्रस्त बसतात. )

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

अहो, हा शिवाजीराजा सत्यवादी, धार्मिक, न्यायी, आणि स्वसेवानुचरांला अत्यंत करुणान्वित, असा असून त्याच्या आगमनानें तुह्मी वृथा भिऊन शोक करीत बसतां, हें काय ? अहो ! या उदार प्रभूनें जें तुह्मास दत्त केलें, तें कालत्रयीं ही कोणी तुह्मापासून परत घेण्यास समर्थ नाहीं. तुह्मी ज्या देहगडाविषयीं गवगवा करीत आहां तो कदाचित् तुह्मी पूर्वअनुयायी या रानांत अनाश्रमी वणवण करतां

---

१ अकल्याणें. २ सर्प. ३ शत्रू. ४ बेडूक आमच्या राजारूप चंदनाचे आणि.

ह्मणूनच प्रभूनें अंतरीं दयायुक्त होऊन तुह्मांस वसोहती-साठींच बांधला नसेल कशावरून ? तुह्मी ही पराक्रमी, शूर, शक्तिमान, आणि ही मायाऊ तुमची भगिनी तर प्रत्यक्ष त्या प्रभूची चरणपरिचारा असून दुबळ्यासारखे रडत बसतां हें काय ? उठा; पराक्रम करा, पराक्रम करा.

### श्लोक. ( शिखरिणी )

प्रभूनें कारुण्यांमृत[1] उदधिनें दत्त[2] अवघें ॥
भवारण्य माझें अवनितल[3] त्याची न चव घे॥
दुजा कोणी काढा रुदन न करी शक्तिनिमचा[4] ॥
सुखे भुंजों[5] देहाधिप करुन आधीन तुमचा ॥ २२॥

( हें ऐकून सर्व सद्गद होऊन आनंदाश्रु ढाळतात. )

**माया०**— मी ह्मणाल्यें तीच गोष्ट खरी, हा प्रभु मजविषयीं दयाळु आणि अत्यासक्त आहे, हें मी पूर्वींच बोललें होतें नव्हे कायरे कामाजी ? आतां आलेंना तुमच्या प्रत्ययास !

**कामा०**— आका, हा प्रत्यय आतांच आला काय ? अगे तूं आहेस ह्मणूनच हें सर्व सृष्टिचक्र चालविण्यास हा प्रभु समर्थ आहे, हें मला कधीं च समजलें आहे.

**माया०**— तर आतां तुह्मी सर्व आपआपल्या सामर्थ्यास पुढें करून, युक्तीनें या किल्ल्यांत आपला प्रवेश होण्याची तजवीज करा.

**कामा०**— मला सांगशील तर, या प्रधानाची पीडा येथून लौकर जाईल अशी योजना मी करतों; मग आपणास

---

१ दया-सागरानें. २ दिलेलें. ३ पृथ्वी. ४ शस्त्रविशेष. ५ उपभोगा.

गड हस्तगत होण्याची मसलत करावयास नीट सांप-
डेल.

माया०— जा, तसें कर, पण डोळा तर न फुटे आणि कां-
डी तर न मोडे असें कर हां:

कामा०— मी तसेंच करीन. ( असें ह्मणून निघून जातो.)

( नंतर मायाऊ, आणि तिचे बंधु, देहगडाच्या द्वारांचा
शोध लावण्याकरितां अरण्यांत संचार करतात. )

( इकडे शिवाजीराजा आणि निवृत्तिबाई शांतीस पोंच-
विण्यास देहगडीं गेलीं होतीं तीं बालागड पाहून संतुष्ट
होतात. )

शिवा०— ( निवृत्तीस ) हें स्थान परम रमणीय पाहून म-
ला फारच संतोष झाला.

निवृ०— माझें ही मन येथें फारच रममाण होतें. मला वा-
टतें स्वर्गभुवन जें ह्मणतात, त्याला या स्थानानें लाज
आणली.

शिवा०— माझ्या मनांत येथें शांतिबाईच्या घरीं चार
दिवस राहून, पाहुणेचार घ्यावा असें येतें; तुला नीट
वाटेल तर.

निवृ०—माझें ही मन माझ्या लाडक्या शांतीच्या समागम-
सुखानें आणि या स्थानाच्या रमणीयपणानें लालुच-
तें, तसें करण्यास.

शिवा०— तर प्रिये, आपण उभयतां येथेंच राहूं या चार
दिवस.

निवृ०— ( विचार करते. ) तें खरें, परंतु मुलीच्या घरीं ती
पुत्रवती होण्यापूर्वी आह्मा उभयतांस अन्नोदक घेतां
नये कामा; त्याचें कसें ?

शिवा०— असें शास्त्र आहे काय?

निवृ०— शास्त्र तर आहेच. आणि लोकरूढि ही आहे.

शिवा०— जर तसें असेल तर आपण फलाहार मात्र करूं, जेवणार नाहीं, ह्मणजे झालें.

निवृ०— ( विचारांत पडती. )

श्लोक. ( वसंततिलका. )

शांती-समागम अति प्रिय आत्मजांनी ॥
वाणी हि त्यास अनुकूल परि द्विजांनीं ॥
जें शास्त्र-वित्तमिं निषेधियलें कराया ॥
तें आचराय अनुमोदुं मि केवि राया॥ २१ ॥

( इतक्यांत विचारराव हात जोडून पुढें उभा राहून ह्मणतो)

श्लोक. स्वागता.

शास्त्र- यादस-अपांपति-राज ॥
तूं न वर्तसि तसा तरि आज ॥
कासया जन तयां अनुलक्षी ॥
होति ते सहज अस्मृतिपक्षी ॥ २४ ॥

( नतंर पडद्या आंत शब्द होतो )

हे प्रभो, जशीं, चतुर्दश रत्नें क्षीरसमुद्रांतून उत्पन्न झालीं, तशीं सर्व शास्त्रें, नय, आणि नीति, तुजपासून उत्पन्न झालीं असून, जो हा देहगड त्वां शांतीच्या विवाहसमयीं, कन्यादानसांगता ह्मणून, जामातांस सोदक दत्त केला त्याजविषयीं च तुझें मन पुनः लोभाविष्ट होतें हें

---

१ स्वपती. २ शास्त्र जाणत्यानी. ३ शास्त्ररूप जलाधराला समुद्र. ४ शास्त्रप्रमाणें. ५ त्या शास्त्रास. ४ अशास्त्रपक्षकारि.

केवळ क्लिष्ट नव्हे काय? आणि तूं सर्वज्ञ म्हणूनें च असें आचरण केलें असतां, तेंच अनुकरण संपूर्ण जगतास होणार नाहीं काय? बरें, तसें झालें, ह्मणजे संपूर्ण लोक अशास्त्र आणि अनीति यांचें अवलंबन करून कुमार्गवर्ती होतील त्याचा विचार काय?

( कान देऊन ऐकतात )

शिवा०— ( मनांत ) काय मी नय सोडून वर्ततों?( पुनः ) तें कांहीं तरी असो; पण हें बरीक खरें, जर मी आतां देहगडीं राहिलों तर तेंच अनुकरण होऊन, लोक दत्त केलेल्या वस्तूंचा उपभोग पुनः आपण करूं लागतील, आणि कुमार्गवर्ती होतील, यांत संशय नाहीं. यासाठीं येथून शांति बाईस आणि जीवाजीरावांस विचारून आत्मपुरीस प्रस्थान करावें हें बरें.

( इतक्यांत पुनः पडद्याआंत शब्द होतो )

ओव्या.

पाहून कांत जामात-गेहीं ॥ सचीवादि रमलां सर्व ही ॥
स्वराज्य व्यवस्था कांहीं ॥ आणिली नाहीं मानसीं ॥१॥
समहीषी समंत्री सबळ ॥ स्वराज्य सोडून भूपाळ ॥
जातां नगरस्थ स्त्रिया बाळ ॥सोसती हाल अवर्णनीय ॥२॥
राक्षस येउन अशरीर ॥ केल्या यौवना मुग्धाजर्जर ॥
करावया त्याचा प्रतिकार ॥पुरींत धनुर्धर कोणी नसे ॥३॥
उठा सत्वर समंजस ॥ रक्षा भूपाल-स्वजनयश ॥
दंडून तया दुष्टास ॥ करा इष्टास जनपदांच्या ॥ ४ ॥ २८ ॥

( ऐकून सर्व घाबरे होतात )

---

१ राणीसह. २काम.

शिवा०— कोण आहेरे ! बोधाजीरावांस लौकर बलाव

बोधा०—( धांवत येतो )हा, मी स्वामीच्या सन्निधच आहें

शिवा०— काय सन्निध अहां ? ऐकताना, हें काय नगरांत होत आहें तें ?

बोधा०— होय, ऐकतांच स्वामीपाशी धांवत आलों, निवेदन करण्यास.

शिवा० अहो, निवेदन करून फळ काय ? त्याचा प्रतिकार करण्यासाठीं दमाजीरावांस एकक्षणाचा विलंब न करतां जाण्यास आज्ञा सांगा.

बोधा०— क्षमा असावी; या सेवकानें, दमाजीरावांस आणि शमाजीपंतांस तसें करण्यास केव्हांच आज्ञापिलें.

शिवा०— हाँ, फार उत्तम केलें तुह्मी. तर आतां आपली स्वारी परत जाण्याची तयारी करा.

बोधा०— महाराज, सर्व तयारी आहे. आपण शांतिआकाचा आणि जीवाजीरावांचा निरोप घ्यावा, आणि प्रस्थान करावें, ह्मणजे झालें.

शिवा०— ( निवृत्तीस ) चला, आपण मुलीस आणि जांवयांस येतों ह्मणून सांगून त्यांचा निरोप घेऊं.

निवृ०— ठीक आहे ( ही मी सिद्ध आहें. ( उभयतां शांतिबाई, आणि जीवाजी राव बसलीं होतीं, त्यांचे जवळ येतात. )

( त्यांस पाहून जीवाजीराव आणि शांति उठून उभीं राहातात. )

शिवा०— ( जीवाजीस ) ही शांति, माझी लाडकी कन्या तुमच्या स्वाधीन केली आहे, हिला क्षणभरही विसंबूं नका, आणि या भवारण्याचा उपभोग यथेच्छ करून

या देहगडीं सुखानें नांदा. ( डोळ्यांतून टपटपां प्रेमाश्रु येतात. ) ( शांतीकडे पाहून ) माझे लडिवाळे शांती, तूं प्रियपतीबरोबर सदैव आनंद भोग बरें. आह्मास विसरूं नको, आणि पतीच्या अनुरागास पात्र होऊन त्याच्या आज्ञेचें अनुकरण करीत जा. ( गहिंवर सांवरून. )

साकी.

शांति जिवाजी-कारें तुज दिधली आज्ञा पाळीं याची ॥
अनुभव-सुख ध्या समागमाचें आह्मां एक वयाचीं ॥ १ ॥
देहगडीं अविजोडपणानें सुभगे सपती राहीं॥
दासदासी सेवाय ठेवल्या येथें न्यून च नाहीं ॥ २ ॥
ही सुमती त्वत्सखी निरंतर सन्निध तव राहील ॥
हितकर तुज प्रियवार्ता सांगुन मोद मना देईल ॥ ३ ॥
जड अवघड नपरी पडतां निरशन करिति प्रधान ॥
दे जायाला निरोप आह्मा निज नगरा परतून ॥४॥ ॥३२॥

निवृ०— ( गहिंवरून ) शांती, आह्मी येतों बरें आतां, तूं तुझ्या प्रियपतीसह खुशाल राहा; स्वामींनीं सांगीतलें हें लक्षांत ठेव.

श्लोक. ( वरतनु )

निजपति ईश मनीं पतिव्रता ॥
रमत जि मानि त्यजून तीव्रता ॥
इहपरिं हो सुखदा गतापदा ॥
सुरयुवती नमिती तिला सदां ॥ ३३ ॥

श्लोक. ( इन्द्रवज्रा )

तूंही अशा माजि सुकीर्तनीया ॥

होशी असें इच्छितसें मनीं या ॥
ऐकेंन हें तूर्णचि मी स्वकानीं ॥
गाईयलें स्वर्ऋषि-गायकांनीं ॥ २४ ॥

( असें ह्मणून निरोप घेतात. )

शांति.— ( सद्गद होऊन निवृत्तीस मिठी मारल्ये. )

दिंडी.

आई मजवरती लोभ असूं दे गे ॥
फिरुन मजला भेटसी कधीं सांगें ॥
असें ह्मणुनी आलिंगि तीस वेगें ॥
डोळ्यांतूनी जल फार वाहुं लागे ॥२५ ॥

शिवा०— निवृत्ति.— लाडक्ये, आह्मी वारंवार तुला भेटत जाऊं; काळजी करूं नको.

निवृ०— ( साश्रु होती ) सोड आतां, ( निवृत्ति तिची मिठी सोडवती आणि मुका घेती ) सोड आतां, मला जाऊंदे. ( असें ह्मणून उभयतां चालतीं होतात. )

(नंतर जीवाजीराव शांतीसहवर्तमान आसनावर बसतो, आणि मानाजीराव फांकडे प्रधान यांस हांक मारतो )

जीवा०— कोण आहेरे ! मानाजीरावांस लौकर बलाव.

माना०— ( जवळ जाऊन ) हा मी आज्ञाधारक जवळच आहें.

जीवा०— शिवाजीमहाराज, या भवारण्यांत देहगडाचें आधिपत्य मजकडे देऊन गेले, हें तुह्मांस अवगत आहेना ?

माना०— होय महाराज, अवगत आहे तर ?

जीवा०— बरें, तुह्मास येथील माझे प्रधानपणाचें काम सां-

गीतलें आहे, त्यापक्षीं सर्व राज्यव्यवस्था आणि गडाची बळकटी ठेवणें, हें तुमचें काम आहे नव्हे ?

माना०—होय महाराज, प्रभूच्या आज्ञेप्रमाणें सर्व जिकडचा तिकडे बंदोबस्त ठेवला आहे; आपण तिळमात्र काळजी करूनये.

जीवा०— बरें, ठाणेदारांस आणि गडकरी यांस, सक्त ताकीद द्या कीं, गडांत आज्ञेशिवाय कोणास ही येऊं देऊं नये; कांतर, हें भवारण्य ह्मटलें ह्मणजे चोरांचें घर, येथें फार सावधगिरीनें राहिलें पाहिजे.

माना०— खरेंच आहे, परंतु त्याचा सर्व प्रतीकार होण्याजोगत्या सोया मी पूर्वीं च केल्या आहेत.

श्लोक. ( वसन्ततिलका. )

आज्ञेविणें पवन ही न गडांत वाहो ॥
आज्ञापिलें मग वनस्थ कसा नवा हो ॥
येतो कराय अपकार अभेद जागा ॥
झोंपा सुखें तुह्मि सशांति मि आहें जागा ॥ २६ ॥

जीवा०— बरें, माझ्या ही मनांत तसेंच होतें, मार्गांत किंचित् श्रांत झालों, ह्मणून शांतीच्या समागमानें विश्रांति घ्यावी; तर मी आतां अंतर्गृहांत जातों. पण गडाचें सर्व ओझें तुह्मावर आहे हो. ( असें ह्मणून अंतर्गृहांत प्रवेश करतो. )

( मानाजीराव देहगडाचा बंदोबस्त करावयास जातो )

( नंतर मायाऊ आणि कामाजी नाईक येतात. )

---

१ रानांतराहणारा.

कामा०— आका, पाहिलासना माझा पराक्रम !

माया०— तो कोणता ?

कामा०— राजास, प्रधानासहवर्तमान देहगडांतून कसें पळविलें हा, आणखी कोणता ?

माया०—हाँ; एकूण ते इतके त्वरनें गेले याचें कारण तुझें च कृत्य काय !

कामा०— तर काय आणखी !

माया०— नें, कसें काय केलेंस !

कामा०— अगे, मी तर आतां अशरीर आहें, कोणास दिसत नाहींच, तेव्हां हळूच नगरांत गेलों, आणि जसा काय लांडगा मेंढरांचे कळपांत शिरतो, तसा अंतर्गृहांत शिरून बायका निजल्या होत्या त्यांला शरमार केला; त्याबरोबर त्या ओरडत च उठल्या. मग काय पुसतां ! परिचार जनाची एक च दाणादाण झाली जिकडे तिकडे.

## साकी.

रडत रडत कळवाया गेले धांवत क्षोणिपतीला ॥
किति अवसना अशनां टांकुन झाल्या कांचि-गतीला ॥१॥
ऐकुनि हा कोलाहल त्यांचा गडबडले सचिवादी ॥
दोडवती गज अश्व रथोद्धत मारुन चार्मणवादी ॥ २ ॥
गड टांकुन सर्वही पळाले रक्षाया निज लाजे ॥
भूपसहित नगराला गेले अमित्र आपणाला जे ॥ ३॥ २९ ॥

माया०—शाबास ! त्वां मोठेंच काम केलें हें, बरें आतां पाहूं या, तो मोहनाजी गडाकडून येतो आहे, तो काय सांगतो तें !

( नंतर मोहनाजी येतो )

मोह॰— ( मायाऊस ) साप गेला, पण विष राहिलें, आका, ( खिन्न होतो. )

माया॰— विष तें कोणतें राहिलें, सांग पाहूं ?

मोह॰— अगे शांतिबाईचा जीवाजीराव प्रतिनिधी बरोबर विवाह होऊन त्यास हा देहगड राजानें आंदण दिल्हा, ह्मणून तीं उभयतां गडांत राहावयास आलीं आहेत.

माया॰— ( नाक मुरडून ) ती आपली शांति ! फीस्सरे, ती तर माझ्या जुन्हेरांत वाढलेली. आणि जीवाजीराव तर कालचा मुलगा. तीं काय बापडीं, मी आंत गेल्यें तर लागलींच उठून उभीं राहतील.

( इतक्यांत मसाजी आणि कुतकाजी चडफडत येतात. )

मसा॰— सारा दिवस शोधून थकलों गडांत प्रवेश करण्यास कोठेंतरी लहान मोठा मार्ग सांपडेल ह्मणून, पण कांहीं फळ नाहीं; चोहों ही दरवाज्यांवर खबरदार चवक्या बसल्या आहेत त्यांतून वायु ही संचार करायास समर्थ होणार नाहीं. मग आमची काय कथा !

कुतका॰— मी अगोदरच ह्मणत होतों, पण माझें कोण ऐकतों ?

( पूर्वोक्त श्लोक. ह्मणतो )

मी बोललों गड विध्वस्त करा उठावो ॥
तें एकते न मिळता तरि त्यांस ठावो ॥
धि:कारिलें तइं मला नि मदीय वाचा ॥
धोका अतां अपरिहार दिसे जिवाचा

घ्या, त्याचें फळ भोगा आतां सरकार ! तुह्मीच तेव्हां ह्मणत होतां, आपण असें करूं आणि तसें करूं, तें आतां कुठे गेलें ? ( मायाऊकडे धांवत जाऊन ) गनीम तर छाती वर येऊन बसला, आतां कुठे पळतां बिराड घेऊन तें सांगा सकळ वेळीं ?

**माया०**— काय मेला भलभलतेंच बरळतो, कोण आला बापूस तुझा, गनीम आला ह्मणतोस तो ?

**कुतका०**— ( चुरमुरून ) आपला यजमान आणि माझा बापूस काय दोन आहेत ? एकच. मला रागें भरावयाचें सोपें, पण शत्रूंची वस्ती शेजारीं आली हें बरीक पाहात नाहीं.

**माया०**— काय मेला चावट. अरे शत्रु गेले सारे; आतां गडांत ती आपली शांतिआका आणि जीवाजीराव आहेत, तीं तर माझ्या ढोंगच्या लुगड्यांत खेळलेलीं आहेत, तूं कां त्याला भितोस ?

**कुतका०**— ( किंचित् आनंदित होतो ) हें काय मला ठाऊक असें आहे हें ! बरें, पण तो मानाजीराव प्रधान आहेना त्यांचा बरोबर ? तो काय उगीच बसणार आहे ?

**माया०**— ( सानंद आणि साश्चर्य ) काय तो मानाजीराव फांकडा प्रधान आहे जीवाजीरावा बरोबर ? तर मग झालेंच आपलें काम.

**कुतका०**— तर त्याचें तुमचेंही कांहीं संधान आहे काय आका ?

**माया०**— ( सस्मित ) संधान ? कांहीं असें तसें नव्हे, तो माझा आप्तच आहे.

शय्या-पटांतारें अहर्निशि लोळणारा ॥
माझे मृदूत्तम पदांस हि चोळणारा ॥
जो चेटसा ममउरोज करें पुशीतो ॥
त्या आम्र केवि न ह्मणों रमतो मशीं तो ॥ १० ॥

कुतका०— ( आनंदीत होऊन नाचूं लागतो )

## अभंग.

आला देहगड आमुचि या हातीं ॥
मायाऊची ख्याती काय वानु ॥ १ ॥
जिंकु बोधादीक अमित्र[1] आपले ॥
लावूं त्यांचीं पीलें रडावया ॥ २ ॥
कामाजी होईल या क्षोणीचा[2] राजा ॥
सेनानी[3] त्या माजा राघोजी हो ॥ ३ ॥

( असें ह्मणून हें आनंदाचें वर्तमान राघोजीनायकास सांगावयास धांवत जातो. )

( हिकडे देहगडीं मानाजी राव फांकडा दरवाजांचा वगैरे बंदोबस्त ठेऊन नोबतखान्याच्या खिडकींतून भवारण्याची शोभा पाहात एकटाच बसतो )

माना०— ( आपणाशीं ) हें भवारण्य मनोरमणीय आणि सुखोपभोगास उत्तमस्थान, अशी पूर्वीपासून ह्मण आहे तीं कांहीं उगीच नव्हे. पाहा, यांत जसे वीर पुरुष पंक्तीनें उभे राहातात तसे हे नानाप्रकारचे उंचउंच वृक्ष शोभताहेत, आणि जशा जणों पतिव्रता

१ शत्रु. २ पृथ्वीचा. ३ सेनापती.

स्वपतीला आलिंगन देऊन राहतात तशा पुष्पितवल्ली त्यांस आलिंगून राहिल्या आहेत. पर्वतांचे शिखारांवरून निर्झर वाहतात, त्यांतील अंबुकण मंदवायुच्या योगानें जसें कारंजांतून पाणी उडतें तसे उडून आ समंतात-भागांतील झाडांवर बारीक परजन्याप्रमाणें तुषार वर्षताहेत, तेणेंकरून जसा तृषाक्रांत उदकपान करून संतुष्ट होत्साता प्रपाधिपाला मानेनें आशीर वाद देतो, तशीं तीं झाडें डुलताहेत. नानाजातीय पक्षी वृक्षांवर बसून मधुर सुस्वरानें गायन करित आहेत, तें श्रवण करण्यास जणु श्रोतेच काय तसे नानाप्रकारचे मृगसमूह त्या वृक्षांच्या छायेस आंनदानें बसले आहेत. अशांत संचार केला असतां, मनाला खरोखरच नंदनवनांत संचार करण्यां पेक्षांही आनंद होईल, यांत संशय नाहीं; तर आपण मृगयामिषानें एक वेळ यांत फिरावयास जाऊन सुखानुभव घ्यावा. ( असेंह्मणून हातांत काष्ठदंड घेऊन गडा बाहेर निघतो ).

( हिकडे मायाऊ, कामाजी, राघोजी, मोहनाजी, आणि लुमाजी, एकत्र बसून विचार करतात. )

**माया॰**— एक वेळ त्या जिवाजीरावाचें तोंड माझ्या दृष्टीस पडतें तर बरें होतें.

**मसा॰**— तोंड दृष्टीस पडून फळ काय ? जेव्हां आमचा गडांत प्रवेश होऊन तो आपलासा होईल तेव्हां खरें

**कामा॰**— तो जीवाजी तर घटकेंत आपलासा करीन, तूं काय समजतोस ? अरे, या काम्यानें असे पुष्कळ ठकवले आहेत ( मायाऊस) काय आंका ? तो एक ब्राह्मणाचा पोर, काय त्याचें नाव विश्वामित्र नव्हे ?धुळी-

स मिळवून टांकला तो म्यां; दुसरा तो दाहा तोंडांचा रावण पालथा पाडला तो हीम्याच. असे किति सांगू ? मोठमोठाले बामण ज्यांच्या मोठमोठाल्या दाढ्या आणि लांबलांब शेंड्या, त्यांलाही साफ केलं, मग या कारट्याचो काय कथा, जरा हातांत आला कीं केलाच आपला गुलाम त्याला, ह्मणून समज.

राघो०— कामाजी दादा तूं तर वडील, मोठाच पराक्रमी. पण, मीही भल्याभल्यांची खोड मोडली आहे, समजतोस ? एक तो बामण जामदग्नी, त्याची कशी अवस्था केली ती पाहिलीसना ? असे किती भीक मागत लावले आहेत म्यां, तोहा राघोजी; या जीवाजीची आणि शांतीची मुंडी मुरगळुन टांकण्यांस भिणार काय ?

(इतक्यांत कुतकाजी धावंत येऊन मायाऊस सांगतो)

कुतका०— तो पाहा गडांतुन कुणी बाहेर निघाला आहे, तो जीवाजी तर नव्हे ? पाहापाहा; उठा लौकर.

## साकी

काठि करीं लल्लाटें कस्तुरी पाठि पुढें अवलोकी ॥
भीतभीत पद टांकि क्षितीवरि जैसा मृगया-शोकी॥४२॥

मायाऊ.—( त्याहाळून पाहात्ये ) कोणी गडकऱ्यांतूनच असावा तो, असें दिसतें. ( झटकन उठून सुंदर अलंकारांनीं भूषित होत्ये )

जारे तुह्मी सारे जरा दूरयेथून, आणि बसा लपून; मि येत्यें कसा काय रंग आहे तो पाहून तिकडचा.( मनांत ) जर कोणी पूर्व परिचित असेल तर बरें होईल.

( असें ह्मणून जवळच एक कर्दलीवन होतें त्यांत प्रवेश करत्ये )

मानाजी.—( कर्दळीवनाकडे पाहून मनांत ) अहाहा ! काय सुंदर वन दिसतें हें, आपण किंचित् विश्रांति घेण्यास गेलों असतों तिकडे. पण कोण जाणे कोणी चोरटे राहात असतील तर त्यांत? कांकीं, येथें सर्व मांग, रामोशी यांची वस्ती. जर एकादा लटकन आला आणि तरवार काढून झटकन मान कापूं लागलाच, तर काय करणार. ( असें ह्मणून मागें वळतो)

मायाऊ.—( आपणाशीं ) अरेरे ! मसलत फसली, हा तर मागें फिरला, आतां कसें करावें ? मला वाटतें आपण येथें गायनास आरंभ करावा ह्मणजे, याच्या मनाला सहज वेध होईल आणि हा धांवत येईल हिकडे. ( असें ह्मणून गायनास आरंभ करत्ये )

साकी

हे मृग या कर्दली-वनामधिं हरिणी यौवनभारें ॥
करी विहारा कामचारा सेवि निर्जन वारें ॥१॥ ४३॥

मानाजी.— ( गायनध्वनी ऐकून ) हाँ; एकूण येथें कोणी लोक राहातात खरे. माझा तर्क कांहीं खोटा नव्हे; या मंजुळ स्वरावरून, ही कोणी स्त्री गात आहे असें वाटतें. पण या अशा रानटी लोकांस असें सुस्वर गायन कोठून बरें प्राप्त झालें असावें ? (असा विचार करतो इतक्यांत )

मायाऊ०— साकी

धुंडुन गृह गोपुर-सौध ही नाना निबीड रानें॥
येथें विश्रांतीला आली सायुध पंचशरानें ॥ ४४

माना०—( साश्चर्य आणि सभय ) ही येथें कोणीतरी नागर स्त्री गात आहे, यांत अगदीं संशय नाहीं. ( धै-

ये करून ) आपण जरा पुढें तर होऊंया.

( कांहींसा पुढें येती. )

माया०— ( फिरून गाऊं लागत्ये. )

### साकी.

राजरती-कुशला जी किसलेयशय्या-सौख्य पहाया ॥
निर्भयजागा कामजागा या वनिं आलि रहांया॥ ४५ ॥

माना०— ( हें एकून मनांत ह्मणतो ) अहो, ही कोणी राजविलासी बायको येथें स्वेछा विहार करायास आली आहे, तर एकवेळ आपण हिला पाहावेंच जाऊन.

माया०— ( मानाजी आपल्या गाण्यास लुब्ध होऊन कर्दली वनाकडे येतो असें पाहून आपण कर्दली वनाबाहेर मैदानांत येते आणि पुनः गाण्यास आरंभ करते. )

### साकी.

कां अनभिज्ञा परी मनोज्ञा शंकाचीर[२]पुढारीं ॥
करितां या अविलंबित गतिनें घ्या विश्रांति बिढारीं॥ ४६ ॥

माना०— हें तर ओळखीचें खटलें आहेसें दिसतें या ह्रिच्या गाण्याच्या अर्था वरून ( निरखून पाहातो ) अहाहा, कायहो हें सौंदर्य तरी ? ही स्त्री केवळ स्वर्गीतील देवांगनांस लाज आणणारी, ह्मणून मला वाटतें ईश्वरानें या वनांत भूतलावर झुगारून दिल्हेली असावी ( पुढें येऊन न्याहाळून पहातो ) अरे, ही तर आपली मायाऊ ( तिच्या जवळ जातो ) तुह्मी कुठें या रानांत आलां ?

---

१ कोंवळी पालवी. २ वस्त्र.

**माया०**— ( किंचित नटून ) महाराजांनीं आपल्या सेवेकरितां माझी या वनांत योजना केली आहे, हें आपणास अवगत असेलच.

**माना०**— ( कांहीं विचार केलासा दाखवितो ) होय, कांहीं दिवसांपूर्वी गुणगुण आइकली होती खरी राजधानींत. परंतु, याच वनांत तुह्मी असतां हें मात्र मला माहीत नव्हतें.

**माया०**— याच वनांत नको राहूं तर कुठें जाऊं? ज्याप्रक्षीं प्रभूच्या पायांचें दास्य स्वीकारलें त्या पक्षीं तो आज्ञा करील तेथें जाणें प्राप्त आहें नव्हे?

**माना०**— होय, पण प्रभूचा मुख्य उद्देश कोणता असावा बरें, तुह्मांस येथें पाठविण्यांत?

**माया०**— उद्देश हाच, आणखीं दुसरा कोणता! प्रभूच्या मनांत हें भवारण्य वसवावयाचें, ह्मणून, मला एकांतीं सांगितलें कीं," माये तू जा तेथें, आणि वसाहत करण्यास आरंभ कर. माझ्या मनांत शांतिबाईचा विवाह जीवाजी रावाबरोबर करून, त्या दंपत्यास एकांतीं रममाण होण्याकरतां तेथें पाठवावयाचें आहे, त्यांचा समाचार चांगले प्रकारें घे, आणि हा सर्व मंत्र कारभाऱ्यां पासून गुप्त ठेव"

**माना०**— मी ऐकिलें होतें, कीं, तुह्माला कांहीं प्रभूची गैरमर्जी होऊन नगरांतून काढून लावलें, तें कसें काय?

**माया०**— हाँ, बाह्यात्कारीं तसें होतें खरें; पण आंतील गोष्ट ही अशी होती.हा प्रभु कांहीं अंतवंत नव्हे; याच्या मनांतील गोष्ट कोणासच समजावयाची नाहीं.

आणि हा असा सावध आहे ह्मणूनच याचें राज्य अ-
ढळ झालें आहे.

श्लोक. ( शिखरिणी. )

स्वविद्या-सूत्रानें महदुदधि-तोयास गणती ॥
स्वकौशल्यें क्षोणीतल नितलपर्यंत खणती ॥
सुखें नक्षत्रें ही कथिति अवनीचे रज किती ॥
प्रभूचें या कोणी परि ऱ्हदय जाणूं न शकती॥४७॥

माना०— ( मनांत ) अशी गोष्ट तर आहे खरी. या प्रभूचा अंत आपणास कधींच लागला नाहीं ( बाहेर पण, या एवढ्या समारंभास तुह्माला अगदींच गडांत. बलावलें नाहीं हें कसें ?

माधा०—बोलावलें नाहीं कोण ह्मणतो?जसें, मुलीचा आणि जामाताचा समाचार घ्यावयास गुप्त पणें सांगीतलें, तसेंच मला बोलावणें करून गडाच्या बाहेरचा बंदोबस्त ठेवण्यास कधींपासूनच सांगितलें होतें, ह्मणूनच प्रभूची स्वारी इतकी लौकर गेली; कांकीं शांतिबाईच्या समाचार घेण्यासमी खंबीर बसल्यें आहें, हें त्यांचा मनांत चांगलें वागत आहे. नाहींतर या अल्प वयस्क लाडक्या मुलीला एकटी टांकून प्रभु आपण गेले असते काय ?

माना०— ( मनांत ) हें संभवतें खरें. प्रभूनें गडांत त्रिरात्र ही वस्ती न करितां प्रस्थान केलें, त्यापक्षीं अशी पूर्वीं कांहीं तरी तजवीज त्याणें करून ठेविली असावी, यांत संशय नाहीं ( बाहेर ) जर असें आहे, तर फार बरें: तुह्मी आह्मी मिळून गडाचें रक्षण करूं.

श्लोक. [ शालिनी ]

रक्षूं आह्मी देहदुर्गास दीर्घें ॥
द्रव्यें भक्ष्यें मेळवूं ही अमोघें ॥
क्षेत्रें पेरूं काननीं या जिवांचीं ॥
मोटीं सूरमें शालि- नीवारयाचीं॥ ४८ ॥

मायाऊ०— ( आनंदीत होत्ये. ) प्रभूची आज्ञा मलाही अशीच आहे. शांतिबाई वयानें लहान, शरीरानें नाजूक, आणि स्वभावानें पोरकट आहे; ह्मणून जीवा-जीरावाचें मन व्हावें तसें संतुष्ट तिजपासून होणार नाहीं, याजकरितां, मला प्रभु ह्मणाला " माये तूं जीवाजीराव माझ्या ठिकाणीं मान, आणि त्याचें मन सार्वकाळ संतुष्ट ठेव; सेवेस चुकूं नको "—

श्लोक. [ भुजङ्गप्रयात. ]

प्रपंचानभिज्ञा मदीया कुमारी ॥
प्रया पावते लक्षितां जीस मारी ॥
तिला शीकवीं त्या जिवाशीं रमाया ॥
ह्मणाला मला तूं प्रभू सुज्ञ माया ॥ ४९॥

मानाजी०— ( मनांत ) एकूण, या प्रभूची कल्पना आणि योजना अतर्क्य आहे ( बाहेर ) हाँ, असें आहे तर तुह्मी खुशाल गडांत येत जात जा. आणि प्रभूच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करा. ( मनांत ) शांतिबाई अल्पवयस्क आणि नाजूक आहे ह्मणून जिवाजीरावासारख्या पुरुषाची रतीछा संतुष्ट करण्यास समर्थ नाहीं, हें लक्ष्यांत येऊन सर्वज्ञ प्रभूनें हा विचार पूर्वींच करून ठेवला आँ; धन्य आहे या प्रभूची लीला.

---

१ भात. २ तृणधान्य.

मायाऊ०— मी आलें असतें तिकडे, पण शांतिबाई तरुण अनभ्यस्त आणि प्रियपती बरोबर विनोदांत गुंतलेली असेल, आणि अशा समयीं मला तेथें पाहील तर कदाचित् तिला असूया उत्पन्न होईल मजविषयीं, ह्मणून ह्मणत्यें, जर जीवाजी रावाची आणि माझी भेट या कर्दली वनांत होती, तर बरें होतें.

मानाजी.—तिच्या मनांत असूया कशाची उत्पन्न होणार? तुह्मी काय कोणी परकी आहां !

मायाऊ.— तें सारें खरें, पण आमची स्त्रियांची जातच अशी आहे हेवेखोर, त्याला काय करणार ?

मानाजी.— ( मनांत ) तेंही खरेंच. शांतिबाई प्रियपतिबरोबर विलासांत असतां गडाबाहेरचें मनुष्य आंत आलें असें पाहतांच कदाचित् रागें भरूं लागेल. आणि मलाही जीवाजीचे आज्ञे विरहित हिला आंत घेऊन आणणें प्रशस्त नव्हे. ( बाहेर ) बरें तर, मीच जीवाजीरावास खालीं गडांत आणतों आणि तुह्मास सुचना करतों, ह्मणजे तुह्मी तेथें येऊन त्यांची भेट हवी तशी घ्या, मग झालेंना ! पण मग असें तर होणार नाहीं " हाता आली चेड आणि धर मांडवाची मेड" ! तुह्मी उभयतां एक व्हाल आणि मला तोंडाकडे पाहावयास लावाल.

मायाऊ.— छी, असें कसें होईल ! ( त्याचा हात आपले छातीवर ठेवत्ये ) हा काय तुमचा उपकार विसरणार नाहीं. आधीं पूजा नंदिकेश्वराची आणि मग महादेवा-

ची. मी राजदरबारीं कशी काय वागत होत्यें हें तुह्मास माहीतच नाहीं वाटतें ?

मानाजी०— ( मनांत ) ही चतुर आणि प्रामाणिक आहे, यांत संशय नाहीं. ( बाहेर ) मला माहीत तर आहे, पण द्या वचन पाहूं, (तिचा हात आपले हातांत घेतो). वचनबद्ध झालां हो, संभाळा, फिराल. हा मी जीवाजी रावास असाच घेऊन येतों.

( असें ह्मणून निघून जातो. )

( हिकडे जीवाजीराव देहगडाच्या बाले किल्ल्यांत बसून झरोक्यांतून भवारण्याची शोभा अवलोकन करतो.)

जीवाजी.— ( आपणाशीं ) अहाहा कायहो हें अरण्य सुंदर आहे ? प्रभूनें हें केवळ विलासस्थान ह्मणूनच उत्पन्न केलें असावें. यांत वसाहत करण्याविषयीं प्रभूनें आज्ञापिलें आहे त्याप्रमाणें उद्योगारंभ केलाच पाहिजे. ( निरेखून पाहतो. ) मला वाटतें या स्थळीं कांहीं वसाहत झालेली आहे. तें एक मोठें कर्दली वन दिसतें, त्याच्या समीप ती कोणी देवांगनेसारखी वस्त्रालंकारांनीं भूषित स्त्री उभी राहिलेली दिसते, ती बरें कोण असावी ? अप्सरा तर नव्हेना ?

श्लोक. [ वसन्ततिलका ]

जीचा मुखेंदु विधुलांग हि लाज आणी ॥<br>
लावण्य जें ह्मणति या त्रिजगांत कोणी ॥<br>
ही त्याजला प्रसवती युवतींत धन्या ॥<br>
कां या अशा निबिड काननिं आलि मान्या ॥ ५० ॥

कदाचित् कोणी गंधर्वादिक या अरण्यांत क्रीडा करा·

वयास आले असतील त्यांची भियांगना तर ही नसेलना ! परंतु मला तिचे मुखचर्येवरून वाटतें कीं—

श्लोक. [ वसन्ततिलका ]

नाहीं कुणी परिणिली दिसते अपर्णा ॥
भासे विलासिनी न तापसि शुष्कपर्णा ॥
भक्षूनइंद्रिय-मृगांस दमीवणारी ॥
ही सिंव्हिणी हरिणि त्यांस रमीवणारी ॥ ५१ ॥

बरें आपण मानाजी रावांस सांगू या चवकशी करावयास ही कोण आहे ती. ( मानाजीस हांक मारतो )

**मानाजी.**— महाराजांचा विजय असो, हा मी जवळच आहें.

**जीवाजी.**— ( त्याच्या कानांत ) ती, कर्दली वनाच्या जवळील मैदानांत कोणी स्त्री उभी आहे ती कोण आहे बरें ? तिची चवकशी करा.

**मानाजी.**—( मनांत ) वः, कार्य तर सोळा आणे उतरलें. ( बाहेर ) फार उत्तम, हा मीच जातों स्वतः आणि चवकशी करून येतों असाच. ( चालता होतो )

**जीवाजी.**— ( मनांत ) मी यास तिकडे पाठविलें हा माझा केवढा बरें मूर्खपणा ! हें असें त्रैलोक्यसुंदर स्त्रीरत्न पाहून जर या मानाजीचेंच मन तिजविषयीं लाुचलें, तर मग तो आपणास कोठून मिळणार; हा तेथें एकटा जाऊन तिशीं एकांतीं कांहीं हितगुज करील आणि तिला आपलीशी करून टांकील, म्हणजे आपण फसलों किं नाहीं ! अरेरे, त्यास एकटा पाठवूं नये तेथें. ( उतावळीनें उठून मानाजीस मोठ्यानें हांक मारतो ) अहो, जाऊं नका तिकडे; परत या, परत या.

मानाजी०—( घाबऱ्यां घाबऱ्यां परत येतो ) कां महाराज, असें कां ह्मणतां ? मी हा असाच जाऊन आलों असतों.

जीवाजी०— ( आपणाशीं ) पाहा, हा कसा लबाड तेथें जाण्यास उत्सुक झाला आहे तो; याच्या मनांत खचित कपट आहे, ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे.

श्लोक. ( शिखरिणी. )

न लोभे हेमानें रुचिर पटिं कौशेयवसनें ॥
सुभूमी- शय्येनें विविध रस चाखून रसने ॥
सुरत्नालंकारें इतकि हि उदासी नर-मती ॥
परी मृद्वंगीचें वदन अनुलक्षून रमती ॥ ५२ ॥

( बाहेर ) हें अरण्य भयंकर यांत एकल्यानें संचार करणें प्रशस्त नव्हे, ह्मणून तुह्मी एकटे जाऊं नका. तुह्मी आह्मी उभयतां जाऊं या.

मानाजी०— महाराज, आपण गडाबाहेर गेलां ह्मणजे मग अधिकाराचा बूज तो काय राहिला ? आणि आह्मी प्रधान ते काय कामाचे ? तर आपण गडांत बसून आज्ञा करावी, आणि आह्मी ती प्रतिपाळावी, हें योग्य आहे.

जीवाजी०— हें ही खरें. एकवेळ गड सोडून गेलों आणि कदाचित् पाठीमागें कांहीं गडबड झालीच तर मग पंचाईत; आणि प्रभूच्या आज्ञेशिवाय गडाच्या दरवाज्या बाहेर पाऊल घातलें असतां प्रभुही प्रकूपित होईल ( विचारांत पडतो. )

मानाजी०— ( हात जोडून ) महाराज, आपण इतके घों-

टाक्यांत कां पडतां ? आपली मर्जीच असेल तर तिला मी येथूनच संज्ञेनें बलावतों ह्मणजे ती किल्ल्याच्या दरवाज्यापाशीं येईल. मग आपण पाहूं तिला तेथें जाऊन ह्मणजे झालें कि नाहीं ?

जीवाजी०— ( सानंद आणि संशययुक्त ) तुमची तिची कांहीं पूर्वीची ओळख आहे कीं काय, ती तुमच्या संज्ञेनें हिकडे येईल ?

मानाजी०— ( किंचित् सभय होतो आणि मनांत ) मी तिजकडे जाऊन आलों, हें तर याला कळलें नाहींना? ( बाहेर ) महाराज, जर आपणास मजविषयीं असा संशय वाटत असेल, तर मी कांहींच बोलत नाहीं या कामांत; पण ज्या पक्षीं मी तुमचा प्रधान त्यापक्षीं तुमचे मनांत मजविषयीं अगदीं संशय येऊं नये.

जीवाजी०— मी मस्करीनें ह्मटलें तसें. पण तुह्मी पूर्वपरिचित नसतां ती तुमच्या संज्ञेनें कशी बरें येईल हिकडे, तें तर सांगा आधीं ?

मानाजी०— हीं वर्मे आह्मा प्रधानासच चांगलीं ठाऊक असतात, अपरिचितांस परिचित कसें करावें तीं.

जीवाजी०— एकूण, ही बाबा, कांहीं विलक्षण जादूगिरी आहे तुह्मापाशीं, असें मला वाटतें.

मानाजी०— ह्मणूनच तर राजापेक्षां ही प्रधानास मोठा मान आहे तो, समजलां ?

जीवाजी०— बरें तसें कां होईना ? तुमचा मान मोठा मजपेक्षां; पण करा पाहूं काय ती संज्ञा, पण एथूनच, आणि आणा तिला किल्ल्याच्या दरवाजाजवळ एकदां.

मानाजी०—कार बरें ( खिडकींतून मायाऊकडे अनुलक्षून हातानें संज्ञा करतो ) महाराज, चला आतां आपण गडाच्या दरवाज्याजवळ जाऊं. ( उभयतां दरवाज्याजवळ येतात. )

( हिकडे मायाऊ मानाजीची संज्ञा जाणून आपला बंधु कामाजी, यास समागमें घेऊन चमकत चमकत किल्ल्याच्या दरवाजाजवळ येत्ये. )

जीवाजी०—( तिला पाहातांच मोहित होतो. ) ( मानाजीस) धन्य आहे तुमच्या चातुर्याची, कीं असें स्त्रीरत्न हाताच्या संज्ञेनें तुह्मी दरवाजांत आणलें. ( तिचें मुख अवलोकून मनांत )

श्लोक. [ वसन्ततिलका ]

पीयूष जें ह्मणति तें गमतें मनाशी ।।
हीचा मुखाब्जे-मकरंद[1] जरेस नाशी ।।
पाशीं नसोन भरलें स्थळ हें सुवासीं ।।
पानीं[2] अवाच्य सुख केवि न हो जिवासी ।।

श्लोक. [ वसन्ततिलका ]

तूं मत्प्रधान सचिवोत्तम मित्र साचा ।।
जोडीशि मद्रति हिचाशि विचित्र सांचा ।।
जो अप्रमेय हि अवीट चिरायु[3] राहो।।
तुझ्या तरीं वचन- कर्दमि मी वराहो[4] ।।

मानाजी०—( हा हिच्याशीं आतां अभ्यासक्त झाला खरा ) महाराज, या समयीं आपण जें कांहीं बोलतां तें नीटच आहे; परंतु कार्य संपादणी झाल्यावर आह्मीं

---

१ मुख-कमल-संबंधी रस २ प्राशन केल्यानें. ३ निरंतर. ४ डुकर.

सेवक आणि आपण यजमान; आमचें शीर तुमच्या हातांत आहेच. लागलेंच ह्मणणार, " कोण आहे रे, न्या याला, उडवा डोकें याचें. "

श्लोक. ( स्वागता. )

संकटीं नृप सचिव गदार्ता ॥
भेषजज्ञ घन जेवि दवार्ता ॥
मित्र मानिति तदुद्धरणांती ॥
स्वामि सेवक हरी हरणा तीं ॥ ५५ ॥

जीवाजी०— मी वचन देतों. तुह्मी मज बरोबर हिची प्रीति करून द्या, मी तुमचे उपकार विसरणार नाहीं इतकेच नव्हें; पण तुमचा वचनबद्ध होऊन राहीन सार्वकाळ. ( त्याचा हात आपले हातांत घेऊन वचन देतो. )

मानाजी०— ( अत्यंत हर्षयुक्त होऊन मनांत ) वः तिकडून आणि हिकडून दोहोंकडूनही दोघांस वचनबद्ध करून टांकलें; आतां माझें वर्चस्व सर्व राज्यभर होईल, आणि प्रधानपणाचा ध्वज कांहींसा विराजेल खरा.

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो )

श्लोक. ( मालिनी. )

ललित गडमही ही श्रेयदात्री सुवेळा ॥
मदन-जलनिधी-मज्जीत-भूपा सुवेळीं ॥
अनवधि रति संपादून या काननातें ॥
निज शिशुगृह ऐसें वर्णवा कां न नातें ॥ ५६ ॥
विपिनि वसति- वृद्धी सोपरा मार्ग व्हाया ॥

---

१ शोभित २ गडांतील भूमी ३ कल्याणकरणारी. ४ तीर.

कृषिकें हळवि ताळी पेरिं हें क्षेत्रमाया ॥
अगणित फलदात्री सर्वदा यौवनांगी ॥
अनुक-ऱ्हदय-विश्रांतीस दे शीण भंगी ॥ ५७ ॥

जीवाजी०— ( ऐकून कामातुर होतो ) वाहवा. मी तर तसें करण्यास अगदीं आतुर आहें.

मानाजी०— आपण अहां, पण ती मान्य झाली पाहिजे ना ?

जीवाजी०— तें तुमच्या हातांत आहे तिला मान्य करण्याचें.

मानाजी०— होय. तें माझ्या हातांत आहे ह्मणतां तिला माग्य करण्याचें, तर मी मान्य करतों तिला; पण शांतिबाई माझें टाळकें फोडील त्याचें कसें.

जीवाजी०— अँः तिला कशानें समजतें हें ? कोण जाऊन सांगतो मुजरद तिला ?

मानाजी०— अहो मुजरद जावयास नको. हे इतके गडकरी आहेत यांतून एकाद्याची जीभ हालली पुरे.

जीवाजी०— त्याचा बंदोबस्त तुह्मी करा. तुह्मी मुख्य प्रधान खरेना ?

मानाजी०— ( विनोदानें ) आह्मी प्रधान कांहीं अशा कामांतले नव्हों, राजकीय कांमांतले ह्मटलें असतां खरे.

जीवा०— ( आर्जवानें ) आतां गड्या असें करूं नका. हें ही राजकीय कामच समजा, आणि करा एकदां तयारी; मी तुमच्या पायां पडतों.

माना०— बरें तर, गडकऱ्यांचा मी बंदोबस्त करतों. प-

---

१ शेतकरणारा. २ त्वरित पिकणारी. ३ कामातुर.

पण कदाचित् शांतिबाईच जर येथें आली, तर कसें होईल.

जीवा०— ( किंचित् गोंधळून ) तें कसें तरी असो, तुह्मास कळेल तसा बंदोबस्त करा त्याचा, माझ्यानें आतां धीर धरवत नाहीं.

माना०— बरें तर, जा तुह्मी तिच्या बरोबर सुखानुभव घ्या; मी तिची सर्व समजावशी करून ठेविली आहे. मी आतां जाऊन बालेकिल्ल्याच्या दरवाजावर चवकी करीत बसतों, ह्मणजे तिकडून हिकडे कुणी येणार नाहीं, आणि हिकडून तिकडे कुणी जाणार नाहीं.

( जीवाजीची आणि मायाऊची भेट करून देतो, आणि आपण चालता होतो. )

( नंतर मायाऊ आणि जीवाजी एकामेकास गाढ आलिंगन देतात. )

जीवा०— हे प्राणप्रिये, त्वां आज मला कृतकृत्य केलें.

माया०— महाराज, असें ह्मणू नका. आपण ही आपल्या पायांची दासी कृतकृत्य करून, हें भवारण्य आणि देहगड, हीं आज कृतकृत्य केलींत असें मी ह्मणत्यें.

जीवा०— हे प्रियभाषणी, असें कसें माझ्यानें ह्मणवेल ? त्वां आज मला या मदनसमुद्रांतून परतीरास पोंचविलें हा तुझा मजवर केवढा उपकार झाला, हें माझ्यानें उच्चारवत देखील नाहीं.

माया०— हे राजा, आपण हा कांहीं माझा उपकार असें मानूं नये, कां कीं त्या प्रभूनें आपणास देहगडाचें

आधिपत्य दिल्हें त्याच प्रभूनें आपली सेवा करण्याकरितां मला आज्ञापून येथें पाठविलें, ह्मणून हे सर्व त्या प्रभूचे उपकार आहेत असें समजलें पाहिजे.

जीवा०— ( सानंद आणि साश्चर्य ) काय शिवाजीराजानें तुला येथें पाठविलें ! ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे.

माया०— यांत कांहीं आश्चर्य मानण्याजोगतें नाहीं. शिवाजीराजाच्या मनांत या भवारण्यांत वस्ती करावयाची, ह्मणून त्याणें शांतिबाई तुमचे पदरीं बांधून देहगडाचें आधिपत्य तुह्मास दिल्हें. परंतु त्याच्या मनांत मोठीच धुगधुग कीं, तुह्मी उभयतां अल्पवयस्क असून सर्व कार्यांत अनभिज्ञ असतां प्रजावृद्धि होऊन वस्तिविस्तार कसा होतो, ह्मणून मला बलावून ह्मणाला " माये तूं जा तेथें, आणि आजपर्यंत प्रजावृद्धि केली त्याप्रमाणेंच भवारण्यांत प्रजावृद्धि कर; जीवाजीस माझ्या ठिकाणीं मान आणि सुखानें नांदीव " आणखीही ह्मणाला.—

श्लोक. ( भुजंगप्रयात )

प्रपंचानभिज्ञा मदीया कुमारी ॥
भया पावते लक्षितां जीसमारीं ॥
रतीवित्तमा त्या जिवाशीं रमाया ॥
ह्मणाला मला तूं प्रभू सुज्ञ माया ॥ ५८ ॥

जीवा०— ( हर्षयुक्त ) एकुण ही इतकी सर्व योजना दयाळू प्रभूनेंच केली ना ? पण मला एक चकार शब्द देखील बोलला नाहीं याजविषयीं ? .

माया०— महाराज, तुमचें पडलें जांवयाचें नातें, तेव्हां

या गोष्टी त्याच्यानें तुह्माजवळ कशा बरें बोलवतील ? आतां तुमची, आणि राज्याची सर्वकाळजी त्यालाच, ह्मणून ह्या सर्व सोया करून मी पदरची परिचारिका विश्वासु आणि प्रजोत्पादनास सुगम असून राजकाजांत अभिज्ञा, ह्मणून प्रभूनें मला निदेशून पाठविलें येथें.

जीवा०— ( सद्गद होतो ) तर जशी प्रभूनें मला शांति दिल्ही तशीच तूंही मला प्रभूदत्ताच आहेस असें मानलें पाहिजे नव्हे ?

माया०— होय, यांत काय संशय ? तसें ह्मणाल तर तिच्याहि पेक्षां माझा मान मोठा आहे.

श्लोक. [ शिखरिणी. ]

वयानें मानानें रति-अनुभव-ज्ञान-मतिनें ॥
शरीरा-कारानें सुरत अविलंबीत गतिनें ॥
प्रजोत्पत्युत्कर्षे अधिक मि तिच्याहून समजा ॥
भवारण्यामाजी अधिकतर भोगाल गमजा[1] ॥ ५९ ॥

( इतक्यांत एक मनोहर पुत्र आणि कुमारी येऊन जवळ उभीं रहातात. )

जीवा०— ( त्यांस अवलोकन करून साश्चर्य आणि लज्जित होऊन अधोवदन होतो. )

माया०— हीं आपलीं अपत्यें महाराज, यांचा सत्कार पूर्वक स्वीकार करा. खालीं पाहूं नका आतां. पाहा, ह्या आपल्या आलिंगनापासूनच मी हा पुत्र आणि कन्या प्रसवल्यें तर यांस क्षेम विचारा.

जीवा०— ( या अशा भाषणानें मोहित होतो ) हें मंजु-

---

१ मौजा.

भावजी, हीं मुलें माझ्या प्रीतीस पात्र आहेत यांत अगदीं संशय नाहीं, पण मला आश्चर्य इतकेंच वाटतें, कीं इतक्या अगदीं थोडक्या अवधींत तूं प्रजावती झालीस, हें काय ?

माया॰— प्रभूच्या कृपेनें ही कन्या पुत्र तर काय, पण एका निमिषार्धांत आपल्या अंगसंगें करून आज्ञा होईल तितकीं अपत्यें प्रसवून मातक्यान तरुणच राहीन, अशी शक्ती मजमध्यें आहे.

श्लोक ( वसन्ततिलका )

युष्मत्कृपा-नयनवीक्षण या शरीरा ॥
होतां मनेप्सित सुता सुत ही भरारां ॥
होती मदीय वपुपासुन सूक्ष्म मोठीं ॥
कुक्षिस्थिता उघडली जणुं जेवि पेटी ॥ ६०॥

जीवा॰— ( आनंदित होतो ) मी इतके दिवस झाले शांति समागमें विलास सुख भोगतों, परंतु अद्यापि प्रजोत्पती कांहींच झाली नाहीं, आणि तुझ्या आलिंगनावच्छेदें करून कन्यापुत्र उत्पन्न झालीं हें मोठेंच नवल एकुण.

माया॰— क्षमा मागत्यें महाराज, शांति कांहीं प्रजोत्पादनाचे उपयोगाची बायको नव्हे, हें सर्वज्ञ प्रभूस चांगलें माहीत, पण करतो काय; विवाहित तर केली पाहिजे, ह्मणून तुमचे गळीं बांधली, तुह्मी आश्रित पडलां तुमच्यानें नको तर ह्मणवतच नाहीं; आतां, तुह्मी पुढें मुलां बाळां करतां कुरकुर कराल ह्मणून मला येथें पाठवून आपणापासून प्रजा उत्पन्न करवून तुमचें

मन रंजवावें आणि तुम्ही भजावान होऊन संतुष्ट असावें असें प्रभूनें केलें. हा गुप्त मंत्र एक मला मात्र ठाऊक, समजलां !

( इतक्यांत शब्द होतो )

( ही कुमारी मायेपासून उत्पन्न झाली हिचें नाव इछा, आणि हा जो पुत्र झाला याचें नाव अहंकार, यांचा पराक्रम संपूर्ण भवारण्य व्यापून राहील. )

जीवा०— ( परम समाधान पावतो ) ( मायेस ) ह्या अपत्यांस पाहून माझें अंतर तर गार झालें- तुझा समागम इतका सुखकारक आहे कीं, त्याचा वियोग सोसवणारच नाहीं, तर फिरून एकदां आलिंगन दे, आणि माझे मनोरथ पूर्ण कर पाहूं ?

( असें ह्मणून तिला फिरून दृढालिंगन करतो. )

अहाहा, मला वाटतें या सौख्या पुढें स्वर्गसुख ह्मणतात तें तुच्छ आहे.

## श्लोक [ वसन्ततिलका ]

वेडे दिवौकस वृथा भुलले जयासी ॥
कोंडान तो कण अभिज्ञ मि आज यासी ॥
झालों ह्मणून ह्मणतों अनभिज्ञ या जे ॥
ते बापुडे ह्मणति केवि तदीय खाजें ॥ ६१ ॥

( इतक्यांत सुंदर आणि सदृढ असे दोन मूल पुढें उभे राहतात )

माया०— ( सुहास्य वदन ) महाराज, हे आणखी

दोन पुत्र बलाढ्य असे आपणास झाले, यांचें आवघ्राण करा; हे ही महापराक्रमी होतील

जीवा०—( आनंदित होऊन मनांत ) धन्य माझें दैव, कीं इतक्यांत मला चार अपत्यें झालीं. आणि शाबास आहे या मायाऊची, कीं ही अशी अल्पकाळांत बहु प्रजावती होऊन किंचित् ही जिच्या तारुण्याचा नाश झाला नाहीं.

## आर्या.

सदैव तरुणा जीचे रति- गंभीरा उरोज घनवर्तुले ॥
नटले कलश अपत्यां व्याली परि ते न अल्पही हटले ॥६२॥

( प्रीतीनें मुलांचें अघ्राण करून चुंबन करितो आणि त्यांचीं नावें संकल्प आणि विकल्प अशीं अनुक्रमानें मायेच्या सांगण्या प्रमाणें ठेवून संतोष मानतो )

( इतक्यांत राघोजी, मदाजी मसाजी, मोहनाजी, आणि लुभाजी हातांत ढालतलवार घेऊन येतात )

जीवाजा०—( त्यांस पाहून भयभीत होतो ) अगे, हेगे कोण ?

माया०—महाराज कांहीं भीति बाळगावयास नको, हे आपले विश्वासु सेवक आणी माझे प्रियभ्राते आहेत. या भवारण्यांत आपले परित्राणार्थ ह्मणून प्रभूनें माझ्या समागमेंच यांलाहि आज्ञापिलें येथें येण्यास. आजपर्यंत माझ्या सांगण्यावरून हे सर्व देखरेख ठेवित आले. आतां मी आपल्या पदरीं पडल्यें, तेव्हां हे ही आपले सेवकच आहेत असें समजून, यांची योग्य कामीं योजना केली पाहिजे.

## ओंव्या.

देहगडा- रंभापासून ॥ यांही येथें धरलें टांण ॥
प्रभुनिदेश पावून ॥ अरण्यवासी हे झाले ॥
पराक्रमी आणि अनुयायी ॥ सहा माझे सखेभाई ॥
आपली ही आतां सगाई ॥ झाली सोई दैवयोगें ॥ २ ॥
तरी तुह्मी वाढवा तयां ॥ ते तुह्मा आणि देहगडाया ॥
भवारण्यीं रक्षावया ॥ समर्थ आहेत सर्वदां ॥३॥ ॥६५॥

**जीवाजी.**— वाहवा. ही तर फारच चांगली सोई झाली. मला राज्याची काळजी आतां अगदींच करावयास नको.

**माया०**—आपणास श्रम न व्हावे, आपण सुखोपभोग घ्यावा, अशा उद्देशानेंच प्रभूनें या सर्व योजना माझ्या द्वारानें केल्या आहेत.

**जीवाजी.**— तर मग जशी प्रभूनें तुला सुचना केली असेल तशी यांची योग्य कामी योजना तूंच कर, ह्मणजे झालें. मला काय आणखी विचारतीस ?

**मायाउ०**— महाराज, तसें नव्हे, मी किती झालें तरी परिचारिका, आपण धनी आहां ह्मणून आपल्यापाशीं विनंती केली.

**जीवा०**— ( तिच्या गळ्यास मिठी मारतो ) तुला आतां परिचारिका कोण ह्मणेल ? तूं तर माझी प्राणवल्लभा; सगळें राज्य तुजवरून ओंवाळून टांकीन.

**माया०**—( मनांत हर्ष पावते) तें सगळें खरें, पण कदाचित् एकादे वेळीं आपलेच मनांत कांहीं येऊन ही बटीक ? राज्यकारभारांत ढवळाढवळ करते, “ मारा हिला लात, द्या घालवून; ” असें ह्मणाल तें कशास पाहिजे मला,

नाहींतर माझ्या आगांत सर्व राज्यकारस्थान भरलें आहे, आणि त्या मुळेंच मी शिवाजीराजाची ही प्रीत संपादन केली आणि त्यास संतुष्ट ही ठेविलें.

श्लोक. ( स्वागता. )

माझिया करुनिया सलगीतें ॥
गायिला मुनिनि निर्मल गीतें ॥
हा प्रभू रचुनिया रचनेशी ॥
सृष्टिच्या विजयि मद्वचनेंशी ॥ ६६ ॥

श्लोक. ( मालिनी. )

तरि मजवरि सारा भार या काननाचा ॥
वसति विषयीं ठेवूनी तुह्मी कां न नाचा ॥
अति रति- सुख- केली मत्सवें आचरूनी ॥
विगलित भय-शंका दुःख-दुर्गा चिरूनी ॥ ६७ ॥

जीवा०— होय, होय, नाहीं कोण ह्मणतो ? तुझ्या शिरावर दिल्हा सारा भार या भवारण्याचे वस्तीचा, मला कांहीं नको तुझ्या शिवाय. मी तुझ्या बरोबर सुखानुभव भोगून सर्वदां आनंदित राहीन. ह्या देहगडाचा ही कारभार सगळा तूंच चालीव. तूं आतां आपल्या भावांसहवर्तमान देहगडींच राहा.

श्लोक. [ स्रग्धरा ]

सांभाळीं राज्य सारें गड हि तवकरीं दीधला मी हि झालों ॥
आज्ञानूयायि होतों स्मरहुत सुरतीं तो हि तूझा विझालों ॥
आप्तां,भ्रात्यां, अपत्यांसह मम सुखदे देहदुर्गांत नांदें॥
मोदें कोंदे सुखानें मम ह्रदय करीं तूं असें अन्य ना दे॥६८॥

( याप्रकारें जीवाजीची आज्ञा होतांच मायाऊ आपल्या भ्रात्यांसह, देहदुर्गीं प्रवेश करती. )

( नंतर पडद्या आंत थोडा कलकलाट होतो. )

( हिकडे बाले किल्ल्यांत अंतर्गृहीं शांतिबाई निद्रित होती ती जागृत होत्ये आणि आपला प्रियपती जो जीवाजीराव तो जवळ नाहीं ह्मणून घाबरून सुमतीस हांक मारते. )

शांति.— ( रोदन करीत ) अगे उठ लौकर, पाहा सरकार कुठें आहेत ते. अगे ही किल्ल्यांत कशाची गडबड आहे बरें, जा लौकर पाहा. अगे प्राणनाथही येथें नाहींत, हें आहेतरी काय !

## साकी.

उठ सखे जा पाहा आधीं प्राणनाथ कुठे गेला ॥
असतां निद्रावश मि साजणी घात कसा कुणि केला॥६८॥

( असें ह्मणून मूर्छा पावत्ये )

सुम०— ( तिला सांवरून धरित्ये ) बाई, सावध व्हा, घाबरूं नका ( पदरानें वारा घालत्ये ) अहो असें काय करतां, जीवाजीराव आतां येतील, भिऊ नका एकदां डोळे उघडा पाहूं.

शांति.— ( किंचित् सावध होते ) कायगे माझा प्राणनाथ कुठें आहे !

## साकी.

टांकुन मजला निद्रेमाजी कोणदेशिं विहराया ॥
सांग प्रियोत्तम गेला सजणे वास निवांत कराया॥२॥ ॥६९॥
कीं रमला अन्येशिं कळेना टांकुन मज दुबळीला ॥
जी चतुरा मजहून कराया जाणे रतिकेलींला[1]॥ ७० ॥

---

1 रतिक्रिडा.

( मालकन्यास मूर्छा पावते. )

सुम०—( घाबरून साशु होते ) अरे कपाळा, आतां काय करूं ? अगे शांतिबाई, अगे तुला काय तरी झालें हें असें. अरे कुणी त्या मदनाजीरावास तरी बोलावा.

श्लोक. ( वसन्ततिलका. )

धांवा उठा सचिव आणिक दुर्गवासी ॥
कां पाहतां टकटकां अजुनी जिवासी ॥
माझ्या कटार बसत्ये तुह्मी जाणवा जी ॥
त्याला असेल कवणे स्थळिं तो जिवाजी ॥ ७१ ॥

( तिच्या सर्व सख्या एकदम घाबऱ्यां घबऱ्यां उठून उभ्या रहतात, आणि तिच्या आंगावर सीतल पाणी सिंचून वारा घालतात. )

सुम०— ( तिला माडीवर घेते ) अगे ही तर अगदींच काष्ठवत झाली. आतां काय करूं ? ( कपाळावर हात मारून घेते ) अरे दैवा, हें असें काय केलें त्वां. अगे शांतिबाई, ऊठगे उठ लौकर, सावध हो; ( ती सावध होत नाहीं ह्मणून शोक करते.

पद.

शांतीबाई उठगे उठ आई ॥
आचरसी विपरीत ऐसें कांई ॥ धृ० ॥
काय झालें तुजला सांग पाहूं ॥
पहात ना देखील ह्मणत ना हूं ॥
नको आह्मा या अशा दुःखें दाहूं ॥
हो सावध संवगड्या दोघी राहूं ॥ १ ॥
बोलुनिया बोबड्या मर्शी बोलें ॥

बाळपणीं खेळला माझ्या खोळें[1] ॥
काय[2] तुझा मृदुतर हा वेल्हाळे ॥
काष्टवत पाहून चित्त पोळे ॥ २ ॥
विधुलागीं बालेतां लाज आणी ॥
सांद्र[3] सुधाधिक जी तुझी वाणी ॥
बोलेना कां मजशीं यांच क्षणीं ॥
सांग नको रागवूं सौख्यखाणी ॥ ३ ॥
शांती आहे सानंद कीं कुशला ॥
विचारितां असे मी त्या साध्वीला ॥
काय सांगुं सांग गे माउलीला ॥
मोदावे जी ऐकुनी तुझी लीला ॥ ४ ॥
ऐकतांचो विपरीत तुझी गती ॥
होईल ती उदासी स्वजीवीतीं ॥
उठ माझे लाडक्ये आतां शांती ॥
नको दांऊं शोकद ऐसी ख्याती ॥ ५ ॥
लागतों मी साजणी तुझ्या पांयां ॥
क्षमाकरीं माझिये कृत अन्याया ॥
तुझ्यावीण न धरीं घडी काया ॥
प्रभूकृपा दायके रविदासा या ॥ ६ ॥ ७२ ॥

शांति०— त्या सीतलोपचारांनीं किंचित् सावध होते )
कायगे सुमति, माझा कांत कुठेगे आहे ?

सुम०— माझे लाडक्ये, तूं भिऊं नको, तुझा कांत लोकर येईल आणि तुला भेटेल.

शांति०— अगे, तूं असें माझें समाधान करितीस, पण तो गेला आहे कुठे तें तरी मला सांग. मी अशीच त्याज-कडे जाईन.

---

1 पदरा बरोबर. 2 शरीर. 3 निरंतर.

सुम०— अगे, हें रान परम भयंकर; यांत, वेड्यासारखी तूं बायको माणूस, कोणीकडे बरें जाशील ?

शांति.— ( ढळढळां रडत्ये. ) अगे, ज्या भंयकर ठिकाणीं माझा प्राणनाथ असेल तेथं मी जात्यें, माझ्यानें प्रियपतीचा वियोग क्षणभर देखील सोसवत नाहीं. हे नाथ, हे नाथ, ( मोठ्यानें ओरडते. )

सुम०— अशी वेडी होऊं नको, धैर्य धर. जीवाजीराव गडांत काम काजा करितां गेले असतील, ह्मणून त्वां इतका गोंधळ मांडलास, हें गे काय ?

शांति.— अगे, तूं ह्या पोकळ गोष्टींनीं माझें समाधान करतीस काय ? हे प्राणनाथ, मला अनाथाला टांकून आपणच एकट्यानें गमन केलें हें काय ?

## साकी.

स्वशरीराधिक रक्षा हिजला कथिलें जें मत्तातें ॥
शेवट त्याचा केला ऐसा गेलां टांकुन मातें ॥ ७३ ॥
सांगा मज जिवलगा कोणत्या तुह्मी अहां तरिभार्गीं ॥
धांवून येत्यें काय ही नलगे बसत्यें मी अर्धांगीं ॥ ७४ ॥
कीं गेला परलोका टांकुन काननिं या दयितेला ॥
निर्दयपणिं पीयूषतुपाला प्याया टांकुन तेला ॥ ७५ ॥
शांति करुनियां या शांतीची जायाचें मग होतें ॥
ठेवुन गेलां रडत हिला हें केवि न तुह्मां खातें ॥ ७६ ॥
मातातातानीं जो दिधला युष्मत्कांरं हा काय ॥
सुखवाया अणि सांभाळाया नाहीं येथें टांकाय ॥ ७७ ॥

( सुमतीस ) अगे प्राणनाथ अद्याप येत नाहीं, तर आतां माझ्यानें हा वियोगानळ सोसवत नाहीं. मला

विष तरी आणून दे लौकर, ह्मणजे तें भक्षून मी हा देह शांत करीन, आणि प्राणनाथास परलोकीं भेटेन.

सुम०— अहो बाईसाहेब, तुह्मासारख्या सुज्ञ स्त्रियांस हें अविचाराचें भाषण करणें देखील योग्य नव्हे.

शांति.— अगे आतां विचार काय आणि अविचार काय, हें तूं मला नको शिकवीत बसूं. मला हा प्राणपतीचा वियोग सोसवत नाहीं.

श्लोक. [वसन्ततिलका.]

जेथें मदीय तनुमोदकर[1] प्रवासा ॥
गेला तया स्थळि मि जाइन आशु[2] वासा[3] ॥
दे आणुनी मज हलाहल[4] तूं मराया ॥
भेटावया दवडि त्या पति जीवराया ॥ ७८ ॥

सुम०— ( मनांत ) ही तर केवळ प्राणांत करण्याच्या बेतांत आली. हे प्रभो, मला कांहीं सुचत नाहीं, आतां काय करूं. ( उगीच बसत्ये. )

शांति.— ( रोदन करीत ) काय गे, माझा प्राणनाथ गेला ह्मणून माझें कोणीच ऐकत नाहीं औं; हे विपरीत गतीदा देवा जी मी शिवाजीराजाची कन्या, जीवाजीरावाची स्त्री नावानें शांति. अशा स्थितींत असतां तिचें वचन देखील कोणी मानूं नये औं. बरें, जर तुह्मी मला कोणीच विष आणून देत नाहीं, तर मीच स्वतः माझा देहांत करित्यें, परंतु प्राणपतीच्या विरह दुःखानें भाजलेली अशी जी मी, ती एक क्षणभर देखील राहाण्यास समर्थ नाहीं.

---

१ आनंद करणारा. २ लौकर. ३ राहावयास. ४ विष.

श्लोक. ( वसन्ततिलका )

ही मी गडावरुनियां निज देह-पातें ॥
प्राण त्यजीन मज किंचित न त्रपा ते ॥
हा शांतवून तनुमाजि वियोगदाहा ॥
जात्यें पतीसह परत्र गतीस पाहा ॥ ७९ ॥

( असें ह्मणून किल्ल्याच्या खिडकींतून खालीं उडी टांकण्यासाठीं दडदडां धांवते. )

सुम०— ( तिचे कमरेस मिठी मारत्ये ) अगे माझे आई, त्वां हें काय आरंभलें ? अगे असा अविचार करून तूं मला एकटीला या अशा अवघड ठिकाणीं टांकुन कुठेगे चाललीस ? ( मोठ्यानें रडत्ये. )

शांति.— ( तिची मिठी सोडविण्यास प्रयत्न करत्ये ) अगे सोड मला, जाऊंदे लौकर, माझा प्राणनाथ जों फार दूर गेला नाहीं, तों घेऊंदे त्याची भेट. हे प्राणनाथा, जरा धीर धरा, ही तुमची दासी ही समागमें येत आहे. ( मनांत ) मी काय तरी वेडी माझ्यासाठीं धीर धरा ह्मणून प्राणनाथास सांगतें, जो मला टांकून गेला तो माझी वाट कोठून पहाणार ?

सुम०— माझे जिवलगे, मी तुला सोडणार नाहीं, माझा प्राण गेला तरी; तूं प्राणत्याग करणारच तर मजसहवर्तमान कर, मी येथें एकटी राहून काय करूं ? अगे प्राण देऊं नको, ऐक माझे इतकें.

शांति.— ( तिची मिठी सोडवत्ये ) अगे, ही मी तर चालल्यें माझ्या पतीसमागमें. पण तूं माझ्या तातास आणि बयेस इतका माझा शेवटाचा निरोप सांग—

( तातास ) श्लोक. ( वसन्ततिलका )

जी पाळुनी निज सुताधिक शांतिबाळा ॥
जाचे करीं निरवली तुह्मिं तो नृपाळा ॥
भोगुं अकाळिं च परत्र सुखास गेला ॥
शांती हि गेलि सति त्यापथिं सद्‍गतीला ॥८०॥

आणि माझ्या बयेस सांग.

श्लोक. ( वसन्ततिलका )

राहूनियां नव हि मास तुझ्या कुशीला ॥
झाली न उत्तम गुणापरि ही कुशीला ॥
देऊनियां तुज वियोग परत्रगेहा ॥
जाते पतीसह कठोर स्वभाव गे हा ॥ ८१ ॥
तूं बोललीस मज होशील कीर्तनीया ॥
इच्छा तुझे सुखधूंत तदांमनीया ॥
ती पूरवाय अवनींत न वास केला ॥
गेली ह्मणून दिविलोक जिला भुकेला ॥ ८२ ॥

सुम०— ( मोठ्यानें रडूं लागती. ) अगे निवृत्तिबाई, काय गे हें तुझें दैव तरी? अशी ही त्रैलोक्यसुंदरी कन्या प्रसवून शेवटीं तिजपासून असें दुःख व्हावेंना तुला ? अहा प्रारब्धा ! तुझी गती विलक्षण आहे. ( शांतीस ) अगे माझे लाडके, मी तुला आज पर्यंत प्रतिपाळिली आणि तूं मलाही सोडून आतां दीर्घ प्रवास करणार, तर मी कोणाकडे बरें पाहूं ?

शांति.— अगे, जा आतां रडूं नको, माझा निरोप तातास आणि बयेस सांग बरें, विसरूं नको. ( खिडकीकडे गमन करिते. )

( सुमति आक्रोशानें रडूं लागत्ये. )

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

श्लोक. ( वसन्ततिलका )

आहे पती तव सुखी असुखी न तूं हो ॥
संपादितो भवविपीनसुखक्रतू हो ॥
दुर्गातळीं उपरि येईल तूं नभीं गे ॥
होसी सती सुखवती क्षिति या नभीं गे ॥ ८३ ॥

सुम०— ( सद्गद होत्ये ) अगे शांतिबाई, उभी राहा, उभी राहा ( तिजकडे धांवत जात्ये ) जीवंत आहेत जीवाजीराव.

शांति.— ( तटस्थ राहती ) कायगे, तूं माझें समाधान करावयास पाहातेस ?

सुम०— मी शपथ करित्यें.

( पूर्वोक्त श्लोक ह्मणत्ये )

आहे पती तव सुखी असुखी न तूं हो ॥
संपादितो भवविपीनसुख क्रतू हो ॥
दुर्गातळीं उपरि येईल तूं नभीं गे ॥
होसी सती सुखवती क्षितिं या नभींगे ॥

शांति.— ( आनंदाश्रु ढाळत्ये ) अगे खरेंच कायगे मी माझ्या पतीस या डोळ्यानीं पाहीन ? छी, हें स्वप्न तर नव्हेना ?

सुम०— बाईसाहेब स्वप्न नव्हे; खचीतच सांगत्यें, जीवाजीराव जीवंत आहेत आणि तुह्मी त्यांस लौकरच पहाल.

( फिरून शब्द होतो. )

श्लोक. ( मालिनी )

उचित भववनीं जें कार्य संपादनाला ॥
तव पति प्रभु-आज्ञे मोदवाया मनाला ॥
प्रकृति वशपणाने गुंतला तूर्ण येतो ॥
नभि गुरु अनुकंपे स्वीय मोदास देतो ॥ ८४ ॥

शांति०— ( सानंदित आणि संशयित ) येतो येतो ह्मणतां, पण कधीं येणार तें तरी सांगा. काय आहे तों, कीं काय गेल्यावर ?

सुम०—( तिचे अश्रु पुसन्ये ) असें ग काय करतीस, वेड्या सारखी ? काय तुझ्या मतें नवऱ्यानें तुझ्या जवळ बसूनच रहावें सारा दिवस ? त्याला कांहीं राजकाज पाहावयालाच नको ? धीर धर जरा; असे वेडे चाळे करूं नये.

( इतक्यांत चतुराऊ प्रवेश करून पुढें तोंड करून ह्मणते )

चतुराऊ— श्लोक. ( इन्द्रवज्रा )

शांती अशांती न कधीं असावी ॥
तीव्रोष्णता चांद्रमसीं नसावी ॥
भोग्यास भोगून सुखास मानीं ॥
आहे तुझा तात त्वदाभिमानी ॥ ८५ ॥

सुम०— ऐकिलेंस ही आपली वडील चतुराऊ काय ह्मणती तें ? मी आतां मानाजीरावास सांगून कोणी तरी जीवाजीरावाकडे मुजरद माणूस पाठवून ही तुझी अवस्था त्यास कळवित्यें, ह्मणजे तो सर्व कामें सोडून धांवत येईल तुझ्या साठीं.

**शांति०**— बरें तर, माझ्या वयेस आणि तातासही हें वर्तमान सांगण्यास कोणी तरी पाठीव. मी आतां अंतर्गृहांत जाऊन बसत्यें.

**सुम०**— तेंही मी करीन, भिऊं नको. जा, जरा विश्रांति घ्या. आतां मी ही मानाजीरावास हें वर्तमान सांगावयास जात्यें.

( सर्व निघून जातात. )

## अंक साहवा समाप्त.

साहव्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पद. | एकूणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५० | १ | १९ | १ | १२ | १ | १ | ८५ |

# सायुज्यसदननाटक.

## अंक ७.

### स्थळ.

### पात्रें.

| | |
|---|---|
| शिवाजी | सार्वभौमराजा. |
| निवृत्ति | त्याची राणी. |
| मज्ञाऊ. | तिची सखी. |
| तुकोजीराव गायकवाड. | राजाचा सरदार. |
| मायाऊ | राजाची दासी. |
| कामाजी नाईक | मायाऊचा भाऊ |
| राघोजी नाईक | मायाऊचा दुसरा भाऊ. |
| मोहनाजी | तिचा तिसरा भाऊ. |
| मदाजी | तिचा चवथा भाऊ. |
| लुमाजी. | तिचा पांचवा भाऊ. |
| मसाजी. | तिचा साहावा भाऊ. |
| इच्छा. | मायाऊस जीवाजी पासून झालेली कन्या. |
| जीवाजीराव | देहगडाधिपति. |
| मानाजीराव फांकडे | जीवाजीरावाचा प्रधान. |
| शांतिबाई. | जीवाजीरावाची बायको. |
| सुमति. | तिची सखी. |
| चतुराऊ. | तिची दुसरी सखी. आणि देहगडस्थ बंक. |
| अहंकार. | मायेचा पुत्र. |

संकल्प. .. .. .. .. .. .. .. .. .. .. मायेचा दुसरा पुत्र.
विकल्प. .. .. .. .. .. .. .. .. .. तिचा तिसरा पुत्र.
विचारराव . .. .. .. .. शिवाजीराजाचा प्रधान.
बोधाजीराव दाभाडे.. .. .. शिवाजी राजाचा सेनापति.
दमाजीराव घाटगे .. .. ..शिवाजी राजाचा कोतवाल.
शमाजीपंत. .. .. .. .. शिवाजी राजाचा कारभारी.
विवेकराव. .. .. .. .. .. शिवाजी राजाचा प्रधान.
कुतकाजी .. .. .. .. .. .. .. .. राघोजीचा चाकर.

# सायुज्यसदननाटक.

## अंक ७.

( नंतर आसनावर बसलेला राजा शिवाजी आणि राणी निवृत्ति येतात. )

निवृ०— ( कपाळास हात लावून सचिंत आणि साश्रु बसल्ये. ) सांप्रत मला एक घटका ह्मटली ह्मणजे, एका युगाप्रमाणें जाते, काय करूं ? ( उजवा डोळा लवलासें करित्ये. ) हा आणखी माझा उजवा डोळा लवतो, हा काय मला दुःख प्रदर्शित करतो कोण जाणे ?

श्लोक ( स्वागता )

कासया फडा फडां लवतोसी ॥
भीरुला[1] फिरुन भीववतोसी ॥
रे मदिय नयना तुजला न ॥
लाज हि करिशि मन्मुख म्लान ॥ १ ॥

शिवा०— ( तिच्या मुखाकडे पाहून ) हे प्रिये, आज तुझा मुखचंद्र असा मलीन कां झाला बरें ? तुला काय दुःख झालें ? तूं अशी सचिंत कां बसलीस ?

निवृ०— महाराज !

श्लोक ( द्रुतविलम्बित. )

घडि युगासम लोटतसे मनीं ॥ .
न सुख किंचित ही दिनयामिनीं[2] ॥

---

१ भयभीत. २ दिवसरात्र.

अरुचि देति पदार्थ समस्त कीं ॥
बसलि ठेउन पाणिस मस्तकीं ॥

शिवा०— ( मनांत ) आज हिला असें दुःख तें काय बरें झालें असावें ? अहो, जी सदां सार्वकाळ माझ्या सान्निध्यानेंच संतुष्ट असणारी; जींची मनोवृत्ति-रूप गंगा माझ्या मानससमुद्रांत मिळालेली असून आज हें औदासिन्यरूप कश्मल हिला कोठून प्राप्त झालें असावें ? ( बाहेर ) हे साध्वी, ज्या वेळीं ही तुझी मुखचंद्रिका सितल वाक्कीरणें प्रकाशती, त्या वेळीं माझा ह्रद्याराम शांतीप्रत पावतो, असें असतां, त्वां त्यालाच मलीनत्व आणलेंस तर मग कसें होईल ? मला सांग, तुझ्या दुःखाचें कारण, मजकडून कांहीं अपराध तर घडला नाहींना ?

श्लोक. ( वसंततिलका. )

नाहीं तुझें वच अमान्य रतीस केलें ॥
सौख्यास त्वन्मन जई सखये भुकलें ॥
शय्या करून निजलों न मि वेगळाली ॥
बाष्पें त्वदीय नयनांतून कां गळालीं ॥ ३ ॥
नाहीं त्वदन्यकुलजा शिवलों कदां ही ॥
जेणे तुझा कुवलयद्युति काय दाही ॥
नाही मुखा फिरवुनी निजलों निशीतें ॥
कां तूं सचींत बसशी वद गे मशीं तें ॥ ४ ॥

निवृ०— महाराज ! तुह्मी सन्निध असल्यानें मला संपूर्ण सुखें आहेत असें मी समजत्यें, आणि मी तुमच्या सान्निध्यानें सर्वदां प्रसन्न असावें हेंच मला विहित. परंतु काय करूं ? आतांसें मला माझ्या लाडक्या शांतीचें

स्मरण रात्रंदिवस होतें; त्यामुळें मी अगदीं वेडी हो-
ऊन गेल्यें आहे; खाणें पिणें देखील मला सुचत नाहीं.
साधारण मित्राचा विरह ह्मटला तरी दुःखप्रदच आहे,
मग ही तर माझी पोटची पोरी; एक घटका देखील डो-
ळ्यांआड झालेली नाहीं, आणि तिला सासऱ्यांस आग-
ण इतके दिवस ठेवलें, मग तिचा वियोग मला दुःखप्रद
होणार नाहीं कसा बरं?

श्लोक. ( मालिनी )

प्रियजन-विरहाचें दुःख दुःसह्य होतें ॥
मग निजतनयेचें साहवे केवि हो तें ॥
विरहज[1] अतिपोळी दावं[2] हा चिन्मृगाला[3] ॥
ह्मणुन असुख ऐसा काय हा हो उगाला[4] ॥ ५ ॥

शिवा०— हे माझे मानस मराळे, तुझी शांति प्रियपतीब-
रोबर सुखानुभव घेत असेल. आणि तूं येथें वृथा-
शोक करीत बसतीस याला ह्मणावें तरी काय? मुली
वयांत आल्या नंतर त्यांस प्रियतर सुख ह्मटलें ह्मण-
जे पतीसमागम; तो तर तुझ्या शांतीस अति सुगम
असून एकांत ही निर्जन आहे, त्यापक्षीं तुला तिज-
विषयीं इतकी काळजी करण्याचें प्रयोजन आहे असें
मला वाटत नाहीं.

निर्ऋ०— होय, तुह्मां पुरुषांची समजूत तशी आहे ती नी-
टच आहे. पण आह्मी बायका प्रसववेदना सोसतों,
तेव्हां आमचें काळीज रात्रंदिवस धसधसत असतें.
एकटी मुलगी घोर अरण्यांत पतीबरोबर गेलेली अ-

---

१ विरहापासून झालेला. २ वणवा. ३ मनोमृगास. ४ उगीच.

मून तिचा शुध्दसमाचार देखील समजत नाहीं, ते-
व्हां जिवास कशी काळजी नाहीं वाटणार ?

साक्या.

प्राणाधिक नउ मास निजोदरिं वाहुन जीचा भार ॥
अति दुःसह वेणा हि सोसल्या प्रसूत समयीं फार ॥१॥
परि तें पाहतां तनया ॥ नाहीं स्मरलें चित्ता या ॥धृ०॥
निज शरीराधिक पालन जीचें लालन चुंबन केलें ॥
स्वीयें सुखा सांडून सर्वदां स्वांत जिचाशीं ठेलें ॥
नाहीं ऐकत वार्ता ॥ आहे सुखि ती किं गदार्ता २ ॥
मजला सोडुन नाहीं गेली क्षण क्रीडावॅटिकेंत ॥
तीनतीनदां सन्निध लुडवेखं बोले घटिकेंत ॥
नाहीं ऐकत त्या बोला ॥ नेणें तिचिये कुशलाला॥ ३ ॥
अब्द मास किति झाले अश्रुत वार्ता तत्कुशलाची ॥
कोणा मायेच्या स्वांताला नाहिं कशी ती टोंची ॥
गेली स्थानीं भर्यदा ॥ जीची तनया अति सुखदा॥४॥९

शिवा०— ( मनांत ) गोष्ट खरी. आहा आज किती दिवस झाले; मुलीचा समामाचार कांहींच कळत नाहीं. हें भवारण्य म्हटलें म्हणजे, अतिभयंकर, त्यांत आपण देहगड बांधला तोही केवळ नवा; अशांत, वस्तीकरण्यास जीवाजीरावास आणि शांतीस पाठविलीं हें ही म्या विहित केलें असें आतां मला वाटत नाहीं. बरें, सचीवादिकांस देहगडाचें संरक्षण करण्याविषयीं आज्ञापिलें होतें, त्याणी ही इतके दिवस झाले; कांहींच

---

१ तिळका. २ आपल्या. ३ मन. ४ रोगग्रस्त. ५ विलासवनांत. ६ शब्द. ७ वर्षे. ८ भयंकर.

समाचार सांगीतला नाहीं, त्याजवरून कांहीं भय-कारक चिन्ह दिसतें खरें, ह्मणूनच ही निवृत्ति इतकी घाबरली आहे. ( बाहेर ) हे मनोरमे, तूं शांतीविषयीं कांहीं काळजी करूं नको. ती आपला भिपती जो जीवाजीराव त्या सहवर्तमान देहगडीं सुखरूप सुखानुभव घेत आहे, तिचा समाचार आणण्याकरितां मी कोणी तरी पाठवितों आतां, स्वस्थ अस.

### श्लोक. ( विबुधप्रिया )

प्रेषितों[1] अति शीघ्र मी भवकाननीं[2] निज चार[3] गे ॥
शांतिचें सुखवृत्त आणिल शोचि[4] न श्रुतिपारगे ॥
घालवीं शुंचिरंतरांतुन खेद-कश्मल[5] स्वर्धुनी[6] ॥
तूर्ण पाहसि आत्मजा विबुधप्रिया सुखवर्धिनी॥१०॥

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो )

शांतिचें सुखवृत्त तर नाहींच पण दुःखवृत्त आणील खरें.

निवृ०— ( ऐकून गहिवरत्ये ) अरे कर्मा; तर काय माझी शांति अस्वस्थ आहे ? ( शिवाजीकडे पाहून ) अहो, पाहा हा काय अनर्थ ऐकूं येतो तो. माझ्या शांतिची अवस्था तरी काय ? अरे दैवा. ( साश्रु होत्ये )

शिवा०— ( मनांत घाबरतो ) प्रिये घाबरूं नको. धीरधर.

निवृ०— ( दक्षण नेत्र लवलासा करित्ये ) हा पाहा, माझा दक्षण नेत्र लवतो, मला वाटतें, आतां माझी शांति दृष्टीस पडणे अवघड. ( ढळढळां रडत्ये )

---

१ पाठवितों. २ भवारण्यांत. ३ जासूद. ४ पवित्र. ५ केर. ६ गंगा.

श्लोक. ( मालिनी )

स्तन तव वदनीं हा घालुनी वाढवीलो ॥
प्रियतम जननीला त्या तुवां नाठवीली ॥
कसि तरि लडिवाळे सांग गे काय झाली ॥
गति तुझि ममचित्तीं मोर्द-दीप्ती विझाली ॥११॥

श्लोक. ( शिखरिणी. )

कशी [1]स्यां द्वाडिनें भवविपिनिं तूतें दवडिली ॥
अनभ्यस्ता तुझ्या पतिसह न कोणी पढविली ॥
तदां मातें सूज्ञी गुरुजनिं निवाराय तुजला ॥
कसा दुर्दैवाचा अहि च डसला काय मजला ॥ १२॥
मदीये स्नेहाळे गुरुभजनशीले त्यजुनियां ॥
तुला आलों स्नेहा विसरलिस तेव्हां च जुनियां ॥
[2]परत्रां जायाला ह्मणुन मजला नाहिं पुसलें ॥
निघूनी [3]एकांकी मम हृदयसौख्यास पुसलें ॥ १३ ॥

( मूर्छा येऊन भूमीवर पडत्ये. )

( तिची सखी मज्ञाऊ धांवत येऊन तिला सांवरून धरित्ये. )

मज्ञाऊ.—( तिला मांडीवर घेत्ये ) बाईसाहेब, सावध व्हा, सावध व्हा. हें काय तुह्मी अभद्रकर आचरण करतां ?

शिवा०—( घाबरेपणानें निवृत्तीजवळ घेतो ) साध्वी सावध हो, सावध हो, अशी घाबरू नको; कोणतीही गोष्ट वास्तवीक समजल्या वांचून उगाच शोक करितीस हें तुझ्या सारख्या सुज्ञस्त्रीस योग्य नव्हे.

---

१ सर्प. २ परलोकास. ३ एकटी.

प्रज्ञाऊ — ( आपल्या पदरानें वारा घालून्ये ) हे प्राण सखी, हें तुह्मी आरंभलें तरी काय ? आपण पोक्त ह्मणवितां; जड अवघडकाळीं आमचें ही समाधान करित असतां. आणि तुह्मीच आतां असा मोह पावतां हें काय ! महाराज काय ह्मणाले तें तरी ऐका, उगीच शोक करीत बसूं नकां. तुमची शांति तुह्मास सोडून कधीं ही जाणार नाहीं.

•शिवा॰— ( निवृत्तीच्या मुखाजवळ मुखकरून ) हे च्यातुर्यविभवे, अगे हें असें काय त्वां आरंभिलें ? ही तुझी जिवलग सखी प्रज्ञाऊ तुला मांडीवर घेऊन बसली आहे हिजकडे तर पहा. ही काय ह्मणती तें तर नीट ऐक. तुझी शांती तुला सोडून कधीं ही जाणार नाहीं. ती गुरु-भक्ती-विष्णात आहे. ( किंचत् व्यामोह पावतो ) आतां काय तरी करावें हिला ? ( हनुवटीस हात लावतो) हे मनोरमे, हे मधुर भाषणी, हे ममचकोरचंद्रिके, एकवेळ डोळे उघड; आणि पाहा मजकडे. ( साश्रु होतो. )

## साकी.

हो सावध हो सावध साध्वी मोह ऱ्हदय-विवरांत ॥
ठेविं न प्रज्ञा-[१]रविरवि लक्षी नाशकारक [२]ध्वांतें ॥ १४ ॥

## आर्या.

नेत्र उघड सावध हो, शांति सुखी पाहसी, उगी, न, रडें ॥
करितां अपकार तिला काळ हि त्याचें चुरीन मी नरडें ॥१५॥

---

१ प्रज्ञेचा शब्द-सूर्य. २ आंधार.

कोण, असा भुवनत्रयिं आहे, मन्कन्यकेस, दुःखवाया ॥
शक्त, स्वांतपटीं, तूं विमलीं घेशी, मषी, असुख, वांया॥१६॥

निवृ०— ( सावध होऊन पतिमुखाकडे पाहाते ) हे प्राणनाथ, शांतीकरितां माझे प्राण व्याकूळ होतात. ( प्रज्ञाऊस ) हे सखी, अगे माझी शांति मला भेटीव लौकर. मी तुझी मोठी उपकारी होईन.

प्रज्ञाऊ०— भिऊं नको माझे प्राणसखी, तुला तुझी शांति भेटेल बरेना ? लौकर भेटेल.

शिवा०— माझेप्रिये, किंचत् धीरधर; मी शांतीचें कुशल आणवितों. उगीच घाबरी होऊनको. कोण आहेरे ? तुकोजी रावास बलावा.

( नतंर तुकोजी राव येतो. )

तुको०— ( प्रणाम करतो ) स्वामीचा विजय असो.

शिवा०— कोण, तुकोजीराव ?

तुको०— जी महाराज, हा आपला आज्ञाधारक.

शिवा०— ( नवृत्तीकडे हातकरून ) ही पाहा, हिची काय अवस्था झाली ती ?

तुको०—( जवळ जावून) आँ ! बांईसाहेब, हें असें काय ? अहो यांला काय झाले हें ? ( राजास ) महाराज, धगडगत दिसत नाहीं; लौकर कांहीं उपाय करा.

शिवा०— उपाय तुमचे हातांत आहे, ह्मणूनच तुह्मांस बलावलें.

तुको०— काय, माझे हातांत उपाय आहे ! सांगा तर पाहुं कोणता तो ? हा मी अतिउत्कंठित आहें तो करावयास. ( हातजोडून सन्मुख उभा राहतो. )

---

१ त्रैलोक्यांत. २ मनोवस्त्र. ३ निर्मळ. ४ काजळ,

शिवाजी.— श्लोक. ( मालिनी. )

चपल पवनगामी देहदुर्गास जाया ॥
सजवि अजेर वीती स्वार ऱ्हा शिघ्र जा या ॥
पुसुन कुशल शांतीला पतीला तिचा ही ॥
कथि हिस जिववीं मानीं मदीया वचा ही ॥१७॥

तुको०— फार चागलें, हा मी असाच निघतों शांति बाईच्या समाचारास. ( निवृत्तीस ) बाईसाहेब, हा आपला दास असाच परत आला ह्मणून समजा.

निवृ०— ( उठून सानंदित होते ) हाँ, माझे शांतोच्या समाचारास जातां ? तर तिला विचारलें ह्मणून सांगा, आणि तिची मर्जी येण्याची असेल तर बरोबर घेऊनया, बरेंना. हळू जा.

तुको०— बाईसाहेब, तुह्मी निःकाळजी बसा आतां, मी सर्व खुशालीची वार्ता अणतों. ( असें ह्मणून निघून जातो. )

( इतक्यांत शब्द होतो. )

श्लोक. ( शिखरिणी )

खुशालीची वार्ता न परि असुखाची वदसि रे ॥
कशाला उत्साहें करिशि गमना कां न उशिरें ॥
तई जाशी पाहाशिल न तरि शांती सुखवती ॥
गडामाजी तूझे अरि वसति तूतें दुखवती ॥ १८ ॥

तुको०— ( ऐकुन दचकतो ) हा प्रस्थानींच अपशकुन झालासा वाटतें; याजवरून शांतीची अवस्था कठीण

१ वायुसारखा चालणारा २ तरुण ३ घोडा.

दिसते. ( जरा विश्रांति घेतो ) झाली आतां अपशकुनाची शांति. आह्मी राजसेवक, आह्मांस राजाची आज्ञा हाच मुहूर्त, हाच शकून ( असें ह्मणून चालता होतो, )

( हिकडे मायाऊ आपले बंधु आणि अपत्यें यांसहवर्तमान जीवाजीच्या अनुमतानें देहगडांत प्रवेशली होतीं तीं एकमेकांशीं विचार करतात. हा पूर्व कथेचा संबंध. )

माया॰— तुमच्या सुखाकरितांच हा देहदुर्ग प्रभूनें बांधला ह्मणून सांगितलें होतें तें खरेंना ?

कामा॰— } हो आका, सर्व तुझी कृपा, आमचें जीवनदुसरे } मूळ तूं आहेस.

श्लोक. ( इन्द्रवज्रा. )

तूं आमुची जीवनमूळ माया ॥
या काननीं जीव सुखें रमाया॥
होसी दयाळे घनसी तरूतें ॥
आतां कथीं काय आह्मी करूं तें॥ १९ ॥

माया॰— ( सानंद होते ) माझे प्रिय भ्रात्यांनो, हा देहगड आणि हें सर्व भवारण्य आतां तुमचें आहे. तुह्मी याचा उपभोग यथेच्छ करा. हीं माझीं चार अपत्यें ही समागमें घ्या आणि राज्य सांभाळा. परांचा पाय यांत अगदीं शिरकूं देऊं नका. कामाजी आणि राघोजी वडील आहेत, यांच्या अनुसंगानें चाला. मी जीवाजी रावास माझ्या हातांत ठेवितें.

मानाजी तर माझाच आहे. मग तुह्मांस भय तें कशाचें ?

राघो०— ( हर्षित होतो ) आकाचा विजय असो. मला आज्ञा मात्र पाहिजे ह्मणजे मी दाखवीन त्या आह्मांला अपकारकर्त्यांस कसें आहे तें.

श्लोक. [ स्वागता ]

आह्मि जेवि रडलों दिनरात्री ॥
तेवि त्यां रडवुं कानन- धात्री ॥
हिंडतां रुतति तें पदिं कांटे ॥
आठवे अजुन काळिज फाटे ॥

श्लोक. स्वागता.

रोधितों प्रथम दारवठाची ॥
शांतिचा तशि च चार भटांचीं ॥
ठाणि घेउन तयां बसवीतों ॥
रोदना करित मी फसवीतों ॥ २१ ॥

माया०— जा, तसें कर. पण कोणास ह्मणमार करूं नको, हो.-

राघो०— मी तसें कां करीन, आका ? आपला अम्मल मात्र बसवीन.

मोहना०— पण अम्मल बसवण्यास कोणी आडवा आलाच तर मग ?

मंदा०— कोण असा शक्त आहे कीं आकाचें नांव सांगीतल्यावर पुढें हूं ह्मणेल ?

लुमा०— आपण असें कशाला करणार ? युक्तीच्या वाटेनें बंकाल्यांत जाऊन गोड गोड गोष्टी सांगून ते

चौकीदार आपलेसे करावे आणि आपला अम्मल बसलारे बसला ह्मणजे मग त्यांचे हात पाय बांधायास काय उशीर आहे ?

मसा० — असें दीर्घसूत्री आणि भिकड्यासारखें काम करून कांहीं फळ नाहीं. आह्मी अशा मसलती करून काळक्षेप करीत असतां त्या आपल्या अपकाऱ्यांला वर्तमान श्रुत होऊन ते धांवत आले ह्मणजे फिरून रडत बसावें लागेल आपणांस, समजतां ?

लुमा० — तर मग तुह्मी कसें करावयाचें ह्मणतां ?

मोह० — दीर्घसूत्री मसलत चांगली नव्हे खरी. मी ह्मणतों, आपण एकदम जावें आणि साऱ्यांचेच डोळे टांकावें बांधून, ह्मणजे झालें. याला इतका मंत्र तो कशाला पाहिजे ? मग राघोजी दादाला ह्मणावें, चालीव तूं आपली तरवार.

लुमा० — बरें तसें कां होईना ?

राघो० — ( हातांत ढालतलवार घेऊन सज्ज होतो ) हो ऊंद्यां तुमच्या मसलती, मी जरा फेरफटका करून येतों. ( मनांत ) गड्या आपण समोर जाऊन वर बालेकिल्ल्यांत शिरावें पहिल्यानें; आणि तेथील बंकाच्या छातीवर एक झपाटा मारून त्यास बरोबर करावें, ह्मणजे मग वर बंगल्यांत जाण्यास मना कोण करणार आहे ? हीच मसलत बरी. तेथें शांति ही. मनोहरच बायको आहे ह्मणून सांगतात. कदाचित् दोहोंतून एकतरी मसलत साधेल यांत संशय नाहीं- ( पुढें दडदडां धांवत जातो आणि त्याहाळून ह्मणतो ) अहो, येथें तर ही कोणी बाई आहे चौकीदार, आतां

करें करावें? या बायकांवर हात करणें हें काम कांहीं माझें नव्हे. हें कामाजी दादाचें काम. ( स्तब्ध उभा राहतो. )

(इतक्यांत कामाजी नाईक आणि इच्छा दोघें येतात. )

कामा०— मला ठाऊक आहे कीं, या बालेकिल्ल्याच्या पायथ्यास चौकीदार आपली चतुराऊ आहे-माझ्यानें तर तिच्या समोर उभें देखील राहवणार नाहीं, ह्मणून आतां एक मसलत करूंया; ही इच्छाऊ कुमारी वर पाठवूं पहिल्यानें; ह्मणजे ही बायकोमाणूस ह्मणून हिला कोणी आडकाठी करणार नाहीं. मग हिच्या मागून हळूच आपण ही आंत प्रवेश करूं; कां कीं:—

## आर्या.

अग्र सुईचें शिरतां सहज चि दोरा असा शिरे माजी ॥
तशि इच्छा वर जातां समजा गेली च ही तनू माजी॥२२॥

( इतक्यांत राघोजी त्याच्या दृष्टीस पडतो त्यास ) कोण राघोजी?

राघो०— दादा, हा मी तुमचीच याद करीत होतों.

कामा०— कां? कशाकरितां?

राघो०— वर चढण्याकरितां, आणि कशाकरतां.

कामा०— तूंच चढना, वर?

राघो०— तें बायकांकडचें काम, बाबा, माझ्यानें होणार नाहीं. तें तुमचें तुह्मी सांभाळा.

कामा०— ( सस्मित ) तर तुह्मी कोणतें काम करणार?

राघो०— ऐका सांगतों; मी कोणतें काम करणार तें.

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

माखीन ही हेति अरी- रुधीरें ॥
अस्मन्मनें केलि जिहीं अधीरें ॥
कीर्ति-ध्वजा लाविन या जगातें ॥
मी कार्य संपादिन आज गा तें ॥ २३ ॥

कामा०— शाबास वीरा; तुजमध्यें असेंच पौरुष सार्वकाळ राहो.

राघो०— ( वीरश्रीचा हावभाव करून ) दादा, जर मला आज्ञा देशील तर हा गड देखील मी, या ( हाताकडे अनुलक्षून ) बाहुपराक्रमानें शतधा चूर्ण करीन. मग त्या शत्रूंची काय कथा ?

कामा०— तुझा पराक्रम तसाच आहे. ( मनांत ) इच्छा कुमारीचे बरोबर पाठराखा ह्मणून यास पाठवावा ह्मणजे कदाचित् एकादा प्रसंगच आला तर हा दोन झपाट मारण्यास ही मागें सरणार नाहीं. ( बाहेर ) बरें मी असें ह्मणतों, ही इच्छा आपण पहिल्यानें वर घालवूं या.

राघो०— होय घालवा बापडी. मी कुठं नको ह्मणतों ?

कामा०— पण तुह्मी हिजबरोबर हिची पाठ राखावयास ह्मणून जा.

राघो०— दादा, तुह्मीच जाना परते ? तुमच्या मागून मी येतों.

कामा०— गड्या, मी गेलों असतों तेथें हिच्या बरोबर, पण ती तेथें चौकीवाली चतुराऊ आहे.

राघो०— मग तर तुमचें कामच झालें. तुह्मी पहिल्यापासून अंतःपुरांतीलच कारभारी आहां नव्हे काय ?

कामा०— होय, ह्मणूनच माझ्यानें जाववत नाहीं तेथें. ती चतुराऊ मला लागली च ओळखील.

राघो०— हाँ, असें आहे काय ? तर मी जातों. पण तशी वेळच आली तर मी झपाटा मारण्यास चुकणार नाहीं, अगोदरच सांगतों तुह्मांला. आका ह्मणाली हाणमार करूं नको, पण तें कांहीं राहणार नाहीं मग.

कामा०— ( इच्छेस ) पाहा, या राघोजी मामा बरोबर बालेकिल्ल्यांत जा, आणि तुझी मावशी तेथें आहे तिला भेट: कोणी विचारील कुठे जातीस ह्मणून तर सांग मावशीकडे. पण सांभाळ, तुला तेथें कांहीं गुप्त गोष्टी कोणी विचारतील तर सांगूं नको हो. ( राघोजीस ) एकवेळ मार्ग पाहून या, ह्मणजे आपण सर्व जुटानें जाऊं वर.

इच्छा.— ( नटून मुरडून, ) मामा, ही मी सिद्ध आहें जायास, पण मला भूक लागली आहे. कांहीं भक्षावयास द्या आधीं.

### श्लोक. [ वसंततिलका ]

मी काननीं विचरतां श्रमल्यें उषीं[१] या ॥
नाहींच अन्न भरलें पुरतें कुशीं या॥
रिक्ता कसें चढवतें गडमस्तकाशी ॥
प्यायास माध्वि तरि देइं श्रमास्तकाशी[२]॥२४॥

कामा०— अगे, आतां तूं काय माध्वीपान करून वर जाणार ? मग तुझ्या आजानें गडाचे शिखरावर अमृ-

---

१ सकाळि. २ श्रमासनाशणारी.

त कुंभांत भरून ठेवलें आहे तें बरें कोण पीईल ?
तुझ्यानें तर प्राशन करवणारच नाहीं.

इच्छा.— हां, असें आहे ? तर ही मी अशीच चालल्यें. या माझे बरोबर कोणी येत असाल तर, नाहीं तर मी एकटीच जात्यें, आणि सगळ्या अमृताचें तळमूस उडवत्यें. ( दडदडां चालूं लागती. )

( तिच्या मागून राघोजीही धांवतो. )

( इतक्यांत शब्द होतो. )

श्लोक. ( वसन्ततिलका. )

पी तूं सुधेस अधिरोहिणीच्या मुलासी ॥
झोंपोंनि जोंवर तुझ्या स्वघशास लासी ॥
मामासहीत कर शांति महीतळाला ॥
तृष्णे क्षुधाजनित ताप तदां पळाला ॥ २५ ॥

राघो०— }
इच्छा.— } ( ऐकून सद्गद होतात) वः, एकुण आज आपणांस अमृतपान करावयास मिळेल. ( इच्छा ) सगळा घटच पिवून टांकीन मग घ्या ह्मणावें काय घेता तें, आजोबाला. ( कामाजी ) घट देखील फोडून टाकूं, समजलीस ? मागें कांहीं एक ठेवावयाचें नाहीं. ( हळूच इच्छेचे कानांत ) आपण मग अमर होऊं तूं आणि मी. मग देवांस देखील मीठ घालणार नाहीं. त्रैलोक्याचें राज्य आपलेंसें होईल, नाहीं बरें ? ( असें बोलत बालेकिल्ल्याच्या पायथ्याकडे शीघ्रगतीनें जातात. )

---

१ निसण.

( हिकडे सुमति मानाजीरावांस बलावून शांतीची अवस्था कठीण आहे, जीवाजीरावांस लौकर आणावें ह्मणून सांगत्ये. तो फार बरें असें ह्मणून त्वरितगतीनें जीवाजीरावाकडेस येतो, आणि सर्ववृत्त निवेदन करतो. हा पूर्वकथेचा संबंध. )

माना०— महाराज, शांतिबाई फार अस्वस्थ आहे.

जीवा०— ( मायाऊसह मंचकावर बसून ) आँ, काय ह्मणतां ?

माना०— अहो तुमची प्राणवल्लभा कठीण अवस्थेंत आहे, ह्मणून तिच्या समाचारास चला लौकर.

जीवा०— ( मायाऊकडे पाहतो ) ही तर येथें खुशाल बसली आहे आणि तुह्मी कठीण अवस्थेंत आहे काय ह्मणतां ? ( मायाऊस ) कायगे माझे प्राणवल्लभे, तूं स्वस्थ आहेस ना ?

माना०— ( सस्मित ) अहो, ही नव्हे.

जीवा०— तर आणखी दुसरी कोणती ? माझी प्राणवल्लभा ह्मटली तर हीच.

श्लोक. ( वसन्ततिलका )

नाहीं हिच्याहुन मला प्रिय या जगांत ॥
वा[1] नाकिं[2] आणि नितलीं[3] युवतीस[4] गात ॥
स्वर्गी हि मी मग दुजी मज कोण कांता ॥
आमंत्रिता जिस पहाय मदीय स्वांता ॥ २६ ॥

माना०— ( मनांत ) अहो, हें काय ? हा तर अगदीं आपले विवाहित स्त्रीस विसरूनच गेला ( बाहेर अहो

१ अथवा २ स्वर्गांत ३ पातालीं ४ स्त्रिस.

असें काय ह्मणतां? तुह्मी जागृत अहां, कीं निद्रितच, असून असें भाषण करतां हें?

जीवा०—(हळूच)काय हा वेड्यासारखा मला निद्रित ह्मणतो!(मोठ्यानें) अरे हा मी जागृत नाहीं काय? पाहा, हें मला सर्व दिसतें, हा तूं, हा मी आणि ही माझी प्राणप्रिया माझ्याजवळ बसली आहे. आतां तूंच सांग, बरें मी जागृत आहें, कीं निद्रित आहे, तो.

माना०— ( मनांत ) आतां काय करावें! हा गोष्टी तर जागृताप्रमाणें सांगतो आणि आचरण तर निद्रसुप्त्यासारखें करतो. ( बाहेर ) मी काय सांगू, महाराज! जागृताप्रमाणें बोलतां आणि विवाहित स्त्रीस विसरतां. याजवरून मला भ्रांति वाटते तुह्मी जागे कीं निजलां अहां ही.

जीवा०— जर तुला भ्रांति वाटते तर मी काय करूं? तूंच भ्रमिष्ट झालास ह्मणून मी विवाहित स्त्रीस विसरलों असें ह्मणतोस. मी कांहीं विसरलों नाहीं. ही पाहा, माझी प्रियपत्नी ( मायेला आलिंगितो) माझ्याजवळ आहे.

माना०— अहो महाराज! तुह्मी चुकतां; ही तुमची उपांगना आहे, आणि जी तुमची विवाहित स्त्री, ती गडशिखरावर आहे. ती अस्वस्थ आहे.

जीवा०— ( मनांत ) काय लुच्चा पाहा! मलाच ठकवायास पहातो. याचा मनसोबा इतकाच, कीं मला भुलथाप देऊन दुसरीकडे न्यावें आणि आपण हिचा उपभोग करावा. ( बाहेर ) अशीं लबाडीचीं भाषणें करूं नको; जी माझी प्राणाहून ही प्रिया, जिच्या पासून

मला मुलेंबाळेंही झालीं ती माझी स्त्री नव्हे ह्मणून, दुसरीकडे बोट दाखवतोस काय ? अरे लबाडा !

( मायाऊ मनांत सानंद होत्ये आणि मानाजीकडे पाहून डोळ्यांनी कांहीं खूण करित्ये. )

माना०— तिच्या खुणेकडे पाहिलेंसें करून दुर्लक्ष्य करितो. ) महाराज, आतां माझा उपाय नाहीं. अहो तुह्मी राजाची कन्या शांतिबाई विवाहित स्त्री केली ती गोष्ट अगदींच विसरलां यास ह्मणावें तरी काय ?

श्लोक. ( शिखरिणी. )

नृपाळाची कन्या तिहिं भुवनिं मान्या परणिली ॥
तुह्मी पौरीं मंत्रीं सचिव—मुनिनीं ही वरणिली ॥
तुह्मासंगें आली सति विपिनिं जी देहगडिं या॥
स्मराना कां तीतें प्रकृतिवश होऊन गडिया ॥२७॥

जीवा०— ( मायाऊचें आणि मानाजीचें संकेतचिन्ह मनांत स्मरून ) अरे जारे. मी तुझी सर्व लबाडी समजतों. तूं हिला फुसलावावयास पाहतोस नव्हे ? ( मायाऊचे गळ्यास मिठी मारतो ) माझे लाडक्ये, म्या पाहिली, त्याणें तुला खूण केली ती. पण खबरदार; मी तुला क्षणभर देखील सोडणार नाहीं. ( मानाजीस ) तुझ्या या कापल्यास पारच नाहीं. त्वां कायरे ह्मटलें ? कुठचा राजा ! कोणाची कन्या ? कोणी परिणिली ? आणि कोणी पाहिली ? मला अगदीं अश्रुत असून तूं माझ्या केवळ गळींच पडतोस हें आहे तरी काय ? तुझा हेतु इतकाच आहे, असें मला वाटतें, कीं मला अशी भुलथाप देऊन येथून दूर न्यावें

आणि या माझ्या मनोरमेशीं आपण सुख भोगावें न-
व्हे ? अरे कृतघ्ना !

श्लोक. ( चामर )

कोण भूपति कन्यका कथ कोण पणिलि कोणि ती ॥
कोण वर्णिति सांगशी परि इंद्रियें मम नेणती ॥
कासया रचुनी अशी मज सांगशी स्वहिता कथा ॥
रे वृषा प्रिये-वंचका न रमें हिशीं भ्रमसी वृथा ॥२८॥

माना०— ( साश्चर्य तोंडावर हात ठेवितो आणि मनांत ) अहा हा! कायहो विलक्षण चमत्कार हा ? ( बाहेर ) शाबास ! ज्या प्रभूनें हा अपूर्व देहगड तुम्हास बांधून दिला त्याला देखील तुम्ही विसरतां आं.

जीवा०— ( सकोप होतो ) काय म्हणतोस ? कोण प्रभु ? कोणी हा देहगड बांधला रे, वाचाळा सांग पाहूं ? (फु-टफुटतो ) मूर्खाप्रमाणें उगीच बडबड करील.

माना०— अहो महाराज ! असें काय म्हणतां ? तो शि-वाजी राजा ज्याणें हा देहगड निर्मिला तुह्मांकरतां. हें तुम्हास स्मरत देखील नाहीं काय ?

श्लोक ( इन्द्रवज्रा )

निर्मूनियां देहगडास जानें ॥
सौख्यार्थ तूतें दिधला अजानें ॥
त्याला हि तूं नेणसि बा कसारे ॥
पाहून कन्या सुत हे असारे ॥ २९ ॥

जीवा०— अरे स्वकपोलकल्पका ! तूं चुकतोस. शिवाजी

---

१ मित्रास ठकविणाऱ्या. २ जन्ममरण रहीतप्रभूनें. ३ खोटे.

नव्हे तो; जीवाजी, ज्यानें हा देहगड बांधला तो मी, समजलास ?

श्लोक. ( चंचकमाला )

शीन ह्मणे जी टांकुन बापा ॥
तथ्य न गी देइल संतापा ॥
भ्रामकें माझी धी फिरवाया ॥
कां श्रमसी कांमातुर वांया ॥ ३० ॥

माना०— (मनांत) आतां पराकाष्ठा झाली. ( बाहेर ) अहो, तुह्मी खरोखर चुकतां; हा देहगड बांधण्याची तुमची शक्ति नाहीं.

जीवा०— ( मनांत ) कायहो मूर्ख तरी हा ! ( बाहेर ) अरे, जर माझी शक्ती नाहीं ह्मणतोस तर मी हा बांधला कसा, तो पाहा, प्रत्यक्ष.

माना०— अहो, हा तुह्मी बांधला असें ह्मणतो कोण ?

जीवा०— ( दांत चावुन ) मी ह्मणतों, कोण ह्मणतो ह्मणजे! पाहा याचें काय विलक्षण ज्ञान तें ! ज्या गडांत मी प्रत्यक्ष वास करतों, तो मी नाहीं बांधला, आणि तुज्यानें बांधला काय ? वाहवारे शहाण्या !

श्लोक. [ इन्द्रवज्रा ]

सत्यास मिथ्या वदसील मूढा ॥
सत्यत्व मिथ्यास करोशि गूढा ॥
मंत्रीं अशा या तुझिया मि जाणें ॥
राहें न तूं येथ निघोन जाणें ॥ ३१ ॥

१ भ्रम उत्पन्न करणारा. २ बुद्धी. ३ गुप्त. ४ मसलतीस.

माया०—( हें ऐकून अत्यंत हर्षित होते ) याला येथून घालवूनच दिला पाहिजे, फार कंटाळा आला आतां याच्या विनोदाचा.(मनांत) हा एकवेळ येथून गेला ह्मणजे यास एकांतीं नेऊन समजावितें आणि सांगतें कीं तूं हूळ घेऊन जा कसा, निघ येथून आपल्या कामास, ह्मणजे झालें. कांकीं अशा याच्या या लांबट गोष्टींनीं कदाचित् जीवाजीस मागील स्मृति होऊं लागेल, आणि सावध होईल.

माना०—( आपणाशीं ) हरहर! याला अगदींच स्मृतिविभ्रम झाला, यास उपाय तरी काय करावा? तिकडे शांतिबाई तर आतां घटकेवर येऊन राहिली आहे. असो, आपण काय करणार? जर मी कांहीं अधिक उणें बोलेन तर, याची मजवर प्रसन्नता न राहतां या मायाऊचाही शत्रु होईन. तर आपण तरीं असें कशाला करावें? प्रधानाचें काम ह्मटलें ह्मणजे, राजास प्रसन्न ठेवावें आणि राज्यरक्षण करावें. घरांतील बायकांच्या पंचाईती करण्याचें प्रयोजन काय? जी राजाची आवडती ती आपली बाईसाहेब. त्यांत ही या मायाऊचें आणि माझें पूर्वीं वचनप्रमाणही झालेलें आहे. आणि हिलाही शिवाजी राजानेंच जांवयास प्रसन्न राखण्याकरितां ह्मणून मुद्दाम येथें पाठविलें; त्यापक्षीं मी तरी वृथा श्रम कशास्तव करूं या कामांत? परंतु एकदां अगदीं जवळ जाऊन कानांत सांगावें ह्मणजे माझा धर्म मी केला असें झालें. ( असा विचार करून जवळ जातो) महाराज, माझ्या विनंतीकडे लक्ष्य द्यावें जरा.

जीवा०— ( धिःकारून ) जा वाचाळा, निघ एथून; खबरदार, हिकडे येशील तर; हा असा तुझा धीटपणा मला परिच्छिन्न आवडत नाहीं. अरे, आह्मी उभयतां एकांतीं असतां तूं अमर्यादपणानें जवळ येतोस याची तुला लाज रे कशी वाटत नाहीं ?

माना०— ( निराश होतो ) मला क्षमा करा. आज्ञा घेतों. ( असें ह्मणून हळू हळू चालूं लागतो )

माया०— ( सद्गगद होते आणि मनांत) आतां मात्र मसलत साधली. एकवेळ त्या मानाजीस एकांतीं समजाविलें पाहिजे ह्मणजे तो आपलें तोंड देखील हिकडेस दाखीवणार नाहीं. ह्मणजे आपली कार्यसिद्धी झालीच; कांकीं राजास वश करून घेणें ह्मटलें ह्मणजे, आधीं प्रधानास वळवावें लागतें.

## आर्या.

शिव सुप्रसन्न व्हा या आधीं पूजीति नंदिकेशासी ॥
राजित आस्य कराया सुस्नेहें आद्रवीति केंशासी॥२२॥

परंतु जर मी आतां तिकडे गेल्यें, तर याच्या मनांत संशय येईल. बरें यास किंचित् निद्रा लागली ह्मणजे जाईन तिकडे आणि करीन तें सर्व. —

जीवा०— ( आपणांसीं ) गेला एकदां वंचक वाचाळ बेटा. द्वाडानें मला कंटाळा आणला बोलतां बोलतां; हा पाहा माझा घसा कसा अगदीं कोरडा पडला तो. (मायाऊस) थोडीसी मदिरा तरी आण माशनास (तिचा हात धरतो) पण तूं येथून हलूं नको हो. तो पाहा ठक आजून कांहीं दूर गेला नाही, जवळच आहे. त्याच्या मनांत

तुला उपटून मला रडत लावावयाचें होतें, पण मी त्याच्याही पेक्षां पक्का आहें, त्याच्या बापाला देखील ठकला जाणार नाहीं.

**माया०**— ( मनांत ) ठीक होत आहे. ( बाहेर ) तो जरी ठक आहे, तरी तो मला ठकवायास समर्थ नाहीं हें तुह्मी पक्कें समजा.

श्लोक ( वसन्ततिलका )

विश्वास ही ठकविणार ठकावयाची ॥
नाही भवादेश नरांस विकावयाची ॥
मोहे न मोहवि जगत्प्रभुपादचारा ॥
युष्मत्प्रिया न इतरांचि मनीं विचारा ॥ ३१ ॥

(मोहनाजीस) थोडीशी मदीरा आणून दे प्रियास. (तो फार बरें ह्मणून मदिरा आणून मायाऊचें हातांत देतो ती जीवाजी करवीं प्राशन करविन्ये. )

**जीवा०**— ( मनांत. ) मी हिला बोललों तें विषम वाटलें सारखें दिसतें. ( बाहेर ) हे प्राणप्रिये, तूं क्रोध करूं नको माझ्या बोलण्याचा. तूं कांहीं तशी प्रतारणा करणारी स्त्री नव्हस हें मला ठाऊक आहे. पण मानाजी मुळापासून लबाड हें मला माहीत. कदाचित् त्याणें तुला आलिंगिलेंच तर मग काय करणार? त्या लुच्चानें मला वचनबद्ध करून टांकलें आहे तेव्हां माझानें चकार शब्द देखील बोलवणार नाहीं, ह्मणून मी त्याला असें संदिग्ध भाषण करून घालवून दिलें, समजलीस?

**माया०**— ( स्फुंदून ) तें खरें, पण मघां आपण मला ह्म-

---

१ तुह्मा सारख्या.

णालां "मी पाहिली त्याणें तुला खूण केली ती" त्यावरून तर मला जाऊन जीवच द्यावा असें वाटलें त्यावेळीं, पण तुह्मी उघडे पडाल आणि माझ्यासाठीं रडत बसाल ह्मणून मनांत विचार आला, आणि तसें केलें नाहीं.

### साकी

नाहिं तुझां कुणि सांभाळाया यास्तव जीव न दीला॥
झाल्यें होत्यें सिद्ध तदां परि जाया तूर्ण नदीला ॥ ३४ ॥

जीवा०—( गहिंवरून तिच्या गळ्यास मिठी मारतो ) अगे माझे प्राणरक्षके, त्वां असा विचार मनांत आणला होता औं ! अरेरे, हा काय मी अनर्थ केला होता, मुर्खानें भलतेंच बोलून ! मी मोठी चूक केली तुला असें बोललों हें; मला क्षमा कर; मी तोंडांत मारून घेतों ( आपल्या हातानें आपल्या तोंडांत मारतो ) इतःपर चकार शब्द देखील मी तुला बोणार नाहीं, झालें आतां ?

### श्लोक. ( वसन्ततिलका. )

नाहीं कदां किमपि खेदकरी वचां[1] मी ॥
बोलन होउम असेंन त्वदानुगामी[2] ॥
तुझे क्षमा कर मदीय कृतापराधा ॥
झाली तुला इतकि जास्तव तीक्ष्णबाधा[3] ॥ ३५ ॥

माया०—( प्रेमालिंगन देते ) प्राणनाथा, मी आपला विनो-

---

१ वाक्य. २ तुझा सेवक. ३ कठीण दुःख.

द केला. तुमच्या बोलण्याचा मला राग कसा येईल? काय तुह्मी आणि मी भिन्न आहों?

जीवा०— ( चुंबन करितो ) पण कोप शांत झालाना आतां.

माया०— प्रिया, झाला माझा कोप शांत, पुरे आतां. तुह्मास मघापासून बोलतांना फार श्रम झाले आहेत, ह्मणून झोंप येत असेल.

जीवा०—( डुलत डुलत ) होय, झोंप येती तर खरोच.

माया०— तर मग पडा जरासें, झोंप घ्या.

जीवा०— ( हिकडे तिकडे अवलोकून मानाजी जवळसार आहे कीं गेला तें पाहातो ) बरें तर, मी पडतों जरा. ( असें ह्मणून मंचकावर पडतो. )

माया०— ( त्याच्या आंगावर पांघरूण घालते आणि मनांत ) यास आतां गाढ झोंप लागली असें वाटतें. ( हळूच उठते आणि मानाजीकडे जाऊन एकांतीं गोष्टी करूं लागते ) शाबास! बरीच मानकापू विद्या केली, वचन देऊन.

माना०— ( हांसून ) मीही तेंच ह्मणतों. स्त्रियांची जातच अशी विश्वासघातकी, माझी पक्की खातरी झाली.

श्लोक. ( वसन्ततिलका. )

स्नेहार्द्र[1] सांद्र[2] वदती निजईप्सितासी ॥
संपादनार्थ मधुंगी[3] प्रमदा सितां सी[4] ॥
होतां तया मग करीति न मान्य केलें ॥
ऐशां ठकां मन तुह्मां न अतां भुकेलें ॥ ३६ ॥

---

१ स्नेहयुक्त. २ निरंतर. ३ गोडवाणी. ४ खडीसाखरेप्रमाणें.

जो गावला निजकरींत सुटावयाचा ॥
नाहीं करी व्यय तदीय धनावयाचा ॥
ही वागुराधिक भयानक चारुहास्या ॥
जीवां मृगां अपरिहारि शशांक- आस्या ॥ १७ ॥

**माया०**— ( स्फुंदून त्याच्या गळ्यास मिठी मारते ) मी तुला सोडणार नाहीं. ओळखीच्या चोरा, तूं आतां कुठे जातोस ? त्वां मोठीच ठकबाजी माडलीं होती आँ ? मला ठकविण्याची मसलत होती तुझी नव्हे ?

**माना०**— ( मोह पावतो ) माझी मसलत मात्र होती ठकविण्याची, पण त्वां तर मला खरोखरच ठकवलें.

**माया०**— ठकवलें ह्मणूं नको. जर माझ्या मनांत ठकवावयाचें असतें तर मी येथें प्राणप्रियाचा डोळा चुकवून धांवत आल्यें नसत्यें. पण तुह्मी मात्र माझा विश्वासघात करीत होतां खरा.

**माना०**— ( तिचें मुख कुरवाळतो ) सुंदरे, भिऊं नको; माझें कर्तव्य कर्म अनुलक्षून तसें करणें मला अवश्य होतें ह्मणून मी केलें; पण माझी खातरी होती कीं, जीवाजीराव जो तुझ्या प्रीतीपाशांत इतका गुंडाळला आहे तो माझ्या अशा पोकळ भाषणांनीं सुटणार नाहीं.

**माया०**— तें खरें. पण तुह्मी तर आपले गुण उधळीत होतां ! काय मेली पुरुषांची जातच ही अशी बेमान, सांगावयाचें एक आणि करावयाचें एक.

**माना०**— ( मनांत गोंधळतो ) अगे, असा दोषारोप मज-

---

१ हातांत. २ जाळें.

वर करतीस हें तुला योग्य नव्हे. मी इतकी खटपट करून तुझा जीवाजी रावाशीं स्नेह करून दिला त्याचें मला हें बक्षीस देतीस काय? शाबासरे! ती शांतिबाई बिचारी आतां घटकेवर आली आहे, आणि तूं ही मला असें टोंचतीस. एकूण मृदंगास मार दोहोंकडून आँ!

**माया०—** (किंचत् नटून वांकडी मान करून सस्मित.) माझ्या प्रियकरा, मी हा विनोद केला तुमचा. तुमची मी उपकारी आहें. तुमची माझी कांहीं आजची ओळख नव्हे. (त्याचा उजवा हात ओढून आपल्या न्हदयावर ठेविते) माझ्या जिवलगा, हा काय तुझा आहे, आतां कर याचा उपयोग तुला पाहिजे तसा. मी हा नां कांहीं करावयाची नाहीं.

## साक्या.

आधिन झाल्यें तव आतां कर विहित तुला जें वाटे ॥
एकांत स्थल मोद मना दे लावीं विषाद वाटे ॥ ३८ ॥
हो रममाण रुचे तुज जैसें पुरविन तव कामासी ॥
प्रतिदिनिं पक्षीं इच्छिसि मासीं अथवा सा मासांसी ॥३९॥
प्रेम अभेद तुशीं जीवाधिक ठेवुन मी वर्तेन ॥
शपथ उरोज द्वय जामीन हे देन्यें जरि पर्तेन ॥ ४० ॥

**माया०—** (सानंद आणि सकाम) हे माझे मनचकोरचंद्रिके, तुझ्या ह्या सलगीच्या मधुर आणि रसाळ भाषणांनीं मी अगदीं गार झालों, पण अंतरांतील दाह शांत होत नाहीं ह्मणून एकवेळ तुझ्या जलकमलसदृश सीतल हातांनीं मला दृढालिंगन दे. ह्मणजे ह्या तु-

इया उदग्रघनस्तनच्या स्पर्शे करून माझें ऱ्हदय शांत होऊन अंतर्दाह निवेल. ( वेंघ पसरून आलिंगन द्याव-यास पुढें सरसावतो. )

साक्या.

येये लौकर विधुवदने तव विरह दाहतो हाय ॥
जल-कमलासम सीत करांनी आलिंगी हा काय ॥४१ ॥
ऱ्हदय दाहतें घनस्तनाच्या स्पर्शें थंड करीं गे ॥
मेघमाला मज दावांतां तुं मयूरास खरी गे ॥ ४२ ॥

( असें ह्मणून तिला दृढालिंगन करीतो. )

( हिकडे जीवाजीराव मदिरा माशन करून मंचकावर निजला होता तो स्वमांत आपली आवडती स्त्री मायाऊ जवळ नाहीं असें पाहतो आणि सभ्रांत होऊन हातानें हिकडे तिकडे चांचपतो. )

जीवा०— ( आपणाशीं ) त्या लुच्चानें शेवटीं मला फसवून आपला काबू साधला. ( सरोष मंचकावरून चावळ घेतो ) हाँ, ती आंतल्या खणांत कांहीं गुणगुण चा-लली आहे खरी. ( वर उठून कानवा घेतो ) होयरे होय; हीं तींच दोघें तेथें गुह्य गोष्टी करताहेत. बरें, चला आपण तेथें जाऊं, आणि पाहूं काय खलबत चाललें आहे, कीं गलबतच पासलें पडलें खरोखर तें. ( मदिरापानाच्या आणि झोंपेच्या गुंगींत. उठून पाहातो तों निद्रेंत परिधान केलेलें वस्त्र सुटून पडलें. तें फिरून परिधान करावयास जातो आणि जवळच एक मायाऊचें जुनें लुगडें पडलें होतें तें आपलेंच वस्त्र

१ शरीर. २ मेघमंडळ. ३ वणव्याने पीडलेल्या.

समजून परिधान करितो, आणि झेंपावत चपल गती-नें चालूं लागतो. )

( हिकडे मानाजी मायाऊस एकांतीं आलिंगन करीत असतां जीवाजी आपणाकडे धांवत येत आहे असें पाहातो.)

माना०— ( घाबरून मायाऊस ) सोड, सोड, मला, सोड आधीं. ( लटलटां कांपतो. )

माया०— कां, असे घाबरतां कां ? मला वाटतें शांतिबाई-साठीं घाबरे झालां असाल.

माना०— कुठची शांतिबाई घेऊन बसलीस, एव्हां ! तो पाहा आला. सोड मला पळूं दे येथून लवकर, नाहीं तर झालें, तुझें आणि माझें बरोबर.

माया०— असे घाबरूं नका. कोण आला ह्मणतां ? कुठें आहे कोण ?

माना०—( तिचा हात झिटकावतो ) सोड आतां, सोड; तो पाहा जीवाजीराव, हिकडेसच येत आहे.

माया०— ( घाबरेपणानें मागें पाहत्ये ) अरे कर्मा, हें रे काय ! हा हिकडेसच येत आहे, आतां काय करावें ? अहो पळा. मारां धांव. ( त्याची मिठी सोडत्ये आणि जीवाजीची दृष्टि चुकवून गुप्तपणें आपण मंचकावर ये-ऊन निजल्याचें ढोंग करून पांघरूण घेऊन निजत्ये. )

( मानाजीही तेथून पळून दुसऱ्या ठिकाणीं जातो. )

जीवा०— ( डोलत झेंपावत जात असतां पूर्वस्थळीं कोणी हि नाहीं तेव्हां तीं आपणास पाहून पळून गेलीं असा-वी या संभ्रमानें धावूं लागतो. इतक्यांत परिधान केले-लें लुगडें सुटून खालीं गळतें तें सांवरायास जातो तों पाय निसरून आपणच जमिनीवर उताणा पडतो हें

पाहून परिजन मोठ्यानें हास्य करतात ) हे प्राणप्रिये, हे प्राणप्रिये, धांव लौकर. ( मोठ्यानें ओरडतो. )

**माया**•— ( मंचकावरूनच निद्रावशाप्रमाणें ) अहो, कुठे गेलां, अहां तरी कुठे तुह्मी ? मला जरा झोंप लागली, इतक्यांत भांगटाप्रमाणें तिकडे कुठे धांवलां ?

**जीवा**•— ( ओशाळा होऊन मुकाट्यांनीं जाबून मंचकावर बसतो. ) प्रिये !—

## ओंवी.

तूं गेलीस उठोन ॥ ऐसा संभ्रम होऊन ॥
गेलों तुला टांकुन ॥ याची क्षमा मज कीजे ॥४१॥
मी होतों प्यालों मदिरा ॥ तेणें झालों बावरा ॥
चुकलों तुझिया सुमारा ॥ क्षमा करीं मज याची ४४॥

( असें ह्मणून मातक्यान मंचकावर शयन करतो. )

( हिकडे बाले किल्ल्यांत शांतिबाई आपल्या प्राणपतीला मानाजी घेऊन येत आहे असें सुमतीनें सांगितल्यावरून मार्गप्रतीक्षा करीत आहे. हा पूर्व कथेचा संबध. )

**शांति**०— ( सुमतीस. ) अगे सखी, आजून प्राणनाथ येत नाहीं, आतां मी काय करूं ? कोठवर धीर धरूं, तें तरी सांग. माझे प्राण जाऊं पाहतात, त्यांवांचून.

## श्लोक. [ शिखरिणी. ]

नये माझा कांगें प्रियतम सखी आजुन तया ॥
न शोधूनी आणां कुणि जिवउं मद्देह नेत या ॥
किती कंटूं अब्दांहुन अधिक मातें क्षण॰गमे ॥

---

१ नम्र. २ वर्ष.

विर्योगाग्नी दाही तनु त्यजिन आतां मि वियेमें ॥ ४५॥

सुम०— साध्वी धीर धर, तुझा प्राणनाथ लौकर येईल. ( कानवा घेल्ये ) कांहीं गलबा ऐकूं येतो याजवरून कोणी येत आहे असें वाटतें. ( चतुराऊस ) मला वाटतें जीवाजीरावांचीच स्वारी येत आहे ही, अशा झपाट्यानें.

चतुराऊ०— बरें बाई. येवोत जीवाजीराव एकदां, आणि भेटोत शांतीस, ह्मणजे ह्मयशा होऊं आह्मी.

सुम०— ( शांतीस ) खालीं गडांत तुझ्या प्राणनाथाचीच पायचळ वाजते असें वाटतें, पाहा तेच येत आहेत झपाट्यानें. मी मानाजीरावास मुजरद पाठविलें होतें, त्यांस आणण्याकरितां.

शांति०— ( आल्हादून ) माझे प्राणसखी, तुझे उपकार मी कधीं हि विसरणार नाहीं, मला प्राणनाथाची भेट करून दिलीस तर. ( वाम नेत्र लवलासें दाखवन्ये. )

### श्लोक. ( स्वागता. )

वाम नेत्र लवतो सखि हा गे ॥
सांगतो प्रियतमास पहा गे ॥
वाटतें सफल हो तव यत्न ॥
धन्य तूं सखि- शिरोमणिरत्न ॥ ४६ ॥

( इतक्यांत राघोजी नाईक आणि इच्छा बालेकिल्ल्यांत जाऊन अमृतपान करावें ह्मणून दणदणां धांवत सोपान मार्गाच्या पायथ्यास येतात. हा पूर्व कथेचा संबंध. )

---

१ योगसाधनानें.

राघो०— ( इच्छेस ) तूं चढ वर झपाझ्यानें; कांहीं भिऊं नको. मी तुझ्या पाठोपाठ येतों.

इच्छा०— ( पुढें सरून न्याहाळून पाहत्ये. ) ही तर मोठी खिंड आहे येथें.

राघो०—असेना कां खिंड, तुला काय त्याचें ! चल तूं पुढें निर्भयपणानें.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

मामा तुझा तुजसवें अहि पाठराखा॥
हा मी यथेच्छ भयहीन सुधेस जा खा॥
ते वंक[2] भेक[3] करिती अवरोध तूतें॥
खङ्ग तरी करिन शत्रुवधं- क्रतूतें[4]॥ ४७॥

इच्छा०— ( कांहींशी पुढें होत्ये ) अरे, हें तर विवर आहे. निबीड आंधारांत जातां तरी कसें येईल ! ( राघोजीस ) मामा, कांहीं दिसत नाहीं पुढें. आतां कसें करूं ?

राघो०— बाहु थोपटून पुढें होतो आणि पायरीस अडखळतो ) अगे, इथे ही पायरी आहे. हीच वाट मला वाटते वर जावयाची. काढली तर खरी शोधून. ये हिकडे, चढ आतां वर.

इच्छा०—( कांहीं अंतरावर जाऊन ) कांहीं दिसत नाहीं आशा, पुढें जावून. ( मोठ्यानें ओरडत्ये. )

राघो०— ( आश्वासून मोठ्यानें ) लाडक्ये, भिऊं नको, हा मी आलों.

१ सर्प. २ चौकीदार. ३ बेडूक. ४ शत्रुधावध हाच यज्ञ.

## आर्या.

भीरु नभीं हा आलों धीर धरीं घाबरूं नको लव ही॥
पीयूषपान दोघें करुं ज्याची पाहिली न कधिं चव ही॥४९

( हिकडे हा शब्दध्वनी जिवाजी रावाचा असें समजून सुमति आनंदित होत्ये आणि शांतीस ह्मणत्ये. )

सुम०— प्राणसखी, हा तुझा कांत आला बरें, ये इकडे दाखवित्यें.

शांति०— ( आनंदित होते आणि वर उठत्ये. ) कायगे, खरेंच प्राणनाथ आला ? ( धांवून तिच्या गळ्यास मिठी मारत्ये. )

## साकी.

प्राणमीन- जीवनपति दावीं ज्यास्तव तळमळ मोठी ॥
करित्यें सत्वर झाल्यें जर्जर वाहुन चिंता पोटीं ॥ ५० ॥—

सुम०— ( तिला घेऊन दरवाज्याजवळ येत्ये आणि दोघी मोठ्या औत्सुक्यानें जीवाजीरावास पाहतात ) तो पहा खालीं, तुझा प्राणनाथ येतो आहे. आतां ह्मणाला तुला, भिवूनको, हा मी आलों; मी ऐकिलें.

शांति०— हाँ. प्राणनाथानी मला असें अश्वासिलें आँ, घाबरी झाल्यें ह्मणून ? ( खालीं सोपानाच्या पायरीवर टोंकावून पाहात्ये आणि मोठ्यानें किंकाळी फोडत्ये ) अगे धांवा, हा कोणी राक्षस आहे येथें. अहा दुर्दैवा ! घात झाला; ( असें ह्मणून धाडकन भूमीवर पडत्ये. )

सुम०— ( मोठ्यानें हंबरडा फोडत्ये ) अहो धांवा, धांवा लौकर, घात झाला. अगे माझे शांति बाई, कुठे आहेस तूं ?[1] ( तिच्या गळ्यास मीठी मारत्ये )

---

१ जिन्याच्या.

चतु०— ( धांवत येत्ये ) भिऊं नको, भिऊं नको; ही मी आल्यें.

( दरवाज्याजवळ जाऊन एक मोठा लोहदंड घेऊन इच्छेच्या आणि राघोजीच्या मस्तकावर तीक्ष्ण प्रहार करित्ये. ) अरे दुष्ट कृतघ्ना ! हें स्थळ अन्यास अगम्य असोनही तुम्ही असा प्रमाद करितां ओं ? ( तिच्या त्या लोहदंडाच्या तीक्ष्ण प्रहारें करून राघोजी आणि इच्छा मुर्छागत होऊन घडघडत खालीं पडतात त्या चा ध्वनि मेघनादासारखा घुमघुमतो )

कामा०—( ध्वनि ऐकून घाबरत येतो आणि त्यांस मूर्छागत पाहतो ) अहा विपरीत गती हा दैवा ! आज त्वां आह्मावर इतका कोप कशाकरतां केला ? (राघोजी जवळ जातो) ऊठ माझ्या प्रिय भ्रात्या, ( त्यास अचेतन पाहून शोक करतो.)

श्लोक. ( शिखरिणी )

अहा बंधो ह्माया अमर पिउनी पीयुष वरी ॥
निघालासी मूर्च्छा कसि जपुन तैं होति नवरी ॥
वराया तीच्या तूं कवित पडलासी हतविधी ॥
त्वदीयेच्छा नाहीं पुरलि गमि झाली अशि मधीं ॥ ५१॥

( मोठ्याने रडूं लागती ) हे अग्रज प्रिया, ऊठ लौकर, ऊठ. मला आलिंगन दे.

( नंतर मायाऊ, जिवाजी आणि मायाऊचे बंधु तेथें येतात आणि राघोजी आणि इच्छा मूर्च्छांगत पडलेलीं पाहून शोक करितात. )

माया०—( इच्छेस मांडीवर घेते आणि तिच्या डोळ्यांस

शीतळ पाणी लावल्ये ) हे लाडक्ये, हे त्रिभुवनपराजिते, तुझी अशी अवस्था कशानें झाली ? मजबरोबर एक वेळ तरी बोल. (तिचें चुंबन करिते. ) हे लडिवाळे, डोळे उघड आणि पाहा मजकडे एकदां.

जीवा०— ( ढळढळां रडतो ) अगे माझे प्रियतमे, तूं इतकी निष्ठुर कां झालीस. ही तुझी प्रिय आई, आणि हा मी तुझा प्रियतात तुला इतकें विचारित असतां तु शब्द देखील बोलत नाहीस; अगे डोळे उघड एक वेळ, आणि पाहा तरी आह्माकडे.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

कां बोलसी न जननीशी मशि पित्याशी ॥
नैष्ठुर्य योग्य न कराय अह्मां पित्यांशी ॥
ऐसें दयाधुनि तुझ्या सरखोस बोला ॥
बोलें मुखा उघडुनी त्यजुनी अबोला ॥ ५२ ॥

साकी.

मागसि तें मी देतों तुजला ऊठ अतां स्नेहाळे ॥
रुसवा दवडुन बस या अंकीं तुज साठीं जो हाले ॥ ५३ ॥
ज्याणें अपकारिलें तया मी शासीन स्वकारानें ॥
प्राणधना वेचुनी तयांला फिरविन भयदें रानें ॥५४ ॥
नेत्र उघड तुझी आई करिती विलाप तिजला पाहीं ॥
रोदने जीच्या भासति मजला शून्य दिशा ह्या दाही ॥५५॥

माया०— अहा दुर्दैवा, माझी एकटी आवडती मुलगी असून तिची अशी दशा व्हावी काय ? ( ऊरबडविते ) अगे माझ्ये आवडत्ये, तुझ्या शिवाय हें भवारण्य

ओसाड दिसते; ऊठ वर; ऊठ एकदां, आणि तुझ्या तातास आणि मातास पाहा; ज्यांची सर्व आशा तुजवर आहे. (राघोजीकडे पाहून) हे माझ्या प्रियबंधो, तूं ही माझ्या लाडक्ये मुलीस घेऊन गमन करतोस हें तुला योग्य नव्हे. त्वां आजपर्यंत माझें वचन कधीं ही अमान्य केलें नाहींस. तर, फीर मागें एकवेळ.

विइया.

माहि अमान्य मद्वचन कधीं केलें ॥
तुवां आतां हें काय कसें झालें ॥
फीर मागें जाई न आण माझी ॥
येई उतरीं मारून शत्रु ओझीं ॥ ५६ ॥
तुझ्या वांचुन तव बंधु दीन झाले ॥
करित रोदन सन्नीध तुझ्या ठेले ॥
त्यांचि वदनें दिसति काकुत वाणी ॥
उठुन बोलें त्यांजशीं मधुर वाणी ॥ ५७ ॥
तुझ्या वांचुन भवरान शुन्य वाटे ॥
आठवूनी तव गूण कंठ दाटे ॥
तुझ्या नामें अरिवर्ग ऱ्हदय फुटे ॥
येई खड्गा हातांत त्वरित ऊठे ॥ ५८ ॥

( नंतर राघोजी आणि इच्छा मूर्च्छा जाऊन सावध होतात. )

माया०—( राघोजीस आलिंगन करून भाग्या, ) खुशाल आहेसना ! ( इच्छेस पोटाशीं धरून ) माझे लडिवाळे, त्वां तर माझ्या तोंडचें पाणी पळविलें होतें.

जीवा०—( हृदयीं पोटाशीं धरून चुंबन करतो ) माझे लेंकरा, मला सोडून तूं कुठे वरें जात होतीस ? अगे, माझे प्राण तुझ्या करितां अगदीं व्याकुळ झाले होते. ( फिर फिरून तिचे चुंबन करतो. )

राघो०—( हातांत तलवार घेऊन क्रोधाच्या आवेशानें ) या किल्ल्याचे जर तुकडे तुकडे करून टांकीन तर माझें नांव राघोजी. काय, वर जाण्यास मार्ग नाहीं ! ( तलवारीस अनुलक्षून ) ही माझी तलवार मला सुलभ मार्ग करून देईल वर जाण्यास - ( मायाऊस ) आका, तूं आतां मला निवारूं नको; करूंदे मला एकदां येथें आमचें मागांचें स्वकर्म.

( पूर्वोक्त श्लोक ह्मणतो ) ( इंद्रवज्रा. )

माखीन ही हेति अरी- रुधीरें ॥
अस्मन्मने केलों जिहीं अधीरें ॥
कीर्ति- ध्वजा लाविन या जगातें ॥
मी कार्य संपादिन आज ना तें ॥

इच्छा०—( मायाऊस ) आई ! मी बाले किल्ल्यांत जाऊन शांति मावशीचें दर्शन घेणार आणि अमृतपान करून अमर होणार; मामास सांग, मला वर घ्या ह्मणून.

माया०— श्लोक. [ शार्दूलविक्रीडित. ]

होतां वर्षशतें विधीस हि गिळी योग्यां बुधां आंवळी ॥
पाताळीं क्षितिच्या तळीं भ्रमति जे व्योमीं हि तेजी बळी ॥
काळीं त्यांस हि आंवळून वदनीं दंष्ट्रा- कराळीं चुरी ॥

---

१ ब्रह्मदेवास २ आकाशीं ३ चंद्र सूर्यादि प्रकाश करणारे.

कृष्णू हा परि निर्जरे तरविये इच्छे न तूंत हरी ॥ ५९ ॥

जीवा०—( हर्षित होतो ) एकूण माझी इच्छा अमर आहे ओं. ( मायेस ) मोठें आमचें दैव कीं, अशी कन्या आह्मास प्राप्त झाली, नव्हे बरें !

मता०—( ऐकून धांवत येतो. ) आका, आमची इच्छा अमर आहेना ! तर आतां आह्मी पाहिजे तसा विजय संपादन करूं. ( राघोजीस आणि कामाजीस हांक मारतो ) अहो उठा, बसूनका आतां, मायाऊ आका तर अमर आहेच, आणि हिची कन्या इच्छा ही अमर आहे; आणखी तें काय पाहिजे आपणास ? चला हल्ला करूं.

( सर्व बंधु आनंदित होऊन नाचूं लागतात. )

( हिकडे शांतिबाई मूर्च्छागत झाली होती तिला चतुराऊ सावध करिते. )

चतुरा०—( सुमतीस आणि शांतीस ) तुह्मी स्वस्थ असां, ही सर्व मात्र आहे. येथें येऊन तुह्मास अपकार करण्यास कोणी ही समर्थ नाहीं. ( शांतीस ) ऊठ सुकुमारे, भिऊंनको.

( इतक्यांत पडद्याआंत शब्द होतो. )

अहो देहगडवासी माधानादि बंक हो, तुह्मी सर्वत्रच निद्रावश झालां काय ? अहो, हा जोवाजीराव आपली विवाहित स्त्री शांति असतां तिचा परित्याग करून अगदीं माया वश होऊन राहिला आहे. आणि मायाऊचे बंधु कामाजी, राघोजी, मत्साजी, मोहनाजी, लुभाजी, आणि मदाजी, यांस गडांत आणून त्यांच्या आधीन होऊन शांतीस

शोकसमुद्रांत निमज्जन करीत आहे हें तुह्मी कोणीच पाहात नाहीं काय? शिवाजीराजानें तुह्मास रक्षणार्थ ह्मणून पाठविलें असून तुह्मी अशी वर्तणूक करितां हें तुमच्या मनास तरी कसे वाटतें? पाहा! राजांने शांतिबाईच्या समाचारास पाठविलेला हा आतां दूत येत आहे, तो ही तिची अशी दशा आणि तुमचें अनाचरण पाहून तुह्मास स्वस्थ बसूं देईल काय? तर उठा लोकर, सावध व्हा, सावध व्हा.

( ऐकून सर्व घाबरून सैरावैरा धांवतात. )

जीवाजी०— ( मायाऊचे गळ्यास मिठी मारतो ) मला सोडून जाऊं नको. मी प्राण देईन तुझ्या साठीं. शांति मेली तर मरूं दे. पण मी तुला सोडणार नाहीं, आतां.

माया०— ( कामाजी, राघोजी आदिकरून बंधूंस ) तुह्मी आपल्या कामी तत्पर राहून देहगडाच्या दरवाज्यांचें रक्षण करा; कदाचित् कोणी आंत येऊं लागला तर त्यास प्रतिबंध करा. सावध राहा. ( जीवाजीस) तुह्मी भिऊं नका. हे माझे बंधू गडाचें रक्षण करतील, आणि तुह्मांस वाजता वारा आणि तापतें उन्ह देखील लागों देणार नाहींत; समजलां? सर्व देहगड यांच्या स्वाधीन करत्यें मी आतां.

जीवा०— मी तुझा आज्ञांकित आहें, तुला पाहिजे तसें कर. मी नकार शब्द देखील बोलणार नाहीं, पण मला सोडूं नको.

श्लोक. ( शिखरिणी. )

नको सोडूं मातें तव अनुचरातें प्रियकरे ॥

गडस्थानें बंकालय सगळें तुझ्या भुजकरें ॥
सुदक्षे संरक्षीं मज निजदुकूलांत लपवीं ॥
मम त्रोणीं शत्रू- परिभवि गमे जें मज पेवी॥६०॥

( डळडळां रडतो. )

माया०—( प्रेमालिंगन करित्ये ) प्रिया, तुह्मी स्वस्थ असां. हे पाहा माझे बंधु एकाहूनएक पराक्रमी साहाजण सायुध येताहेत, हे मनावर घेतील तर त्रैलोक्य जिंकितील; हा मेरुमांदार फोडून चूर्ण करितील. हीं तुमचीं च्यार अपत्येंहि त्रैलोक्यास अपराजित; असें असतां तुह्मी उगीच घाबरे कां होतां !

( इतक्यांत मोठा भयंकर कलकलाट होतो. )

जीवा०—( ऐकून लटलटां कापूं लागतो ) मला सोडून जाऊं नको, माझे प्राण रक्षके;

( कलकलाटा नंतर शब्द होतो )

भिऊं नका भिऊं नका. अहो, या मायाऊच्या आज्ञेकरून त्रिभुवनास अजिंक्य असे तिचे साहा बंधु ज्याणीं या देहगडाच्या रक्षणा करितां सायुध होऊन आगमन केलें आहें, आणि सर्व दरवाजे अवरोधून आपल्या परवानगी शिवाय वायूही गडांत संचार करण्यास समर्थ नाहीं असा त्याणी बंदोबस्त केला असतां तुह्मी उगीच भिऊन लटलटां कापतां कशाकरितां ! तुमच्या केसासही धक्का लावण्यास कोणी समर्थ होणार नाहीं. तर वृथाभीती न बाळगतां सुखक्रीडा करा. दुश्चीत्त होऊं नका.

जीवा०- (सानंद) माझे मनोधारिणी, धन्य आहे तुह्मी. तुझे

---

१ चोकया २ बंधूंचे हातें ३ वस्त्रांत ४ रक्षणीं ५ बळ.

अतुलपराक्रमी बंधु दीर्घायु होवोत ज्यांणीं तुझ्या वचनाबरोबर मला निर्भय केलें. मी त्यांचा सर्वदा दास होऊन राहीन.

( नंतर राघोजी नाईक हातांत ढालतलवार घेऊन शब्द करीत येती. )

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित )

जो त्रैलोक्य पलार्ध ही न लगतां नेत्राग्निने संहरी ॥
ज्याचे दास उदास होउन उभे सृष्टा पुढें ही हरी ॥
त्यारुद्रांबक- वन्हि- उद्भव- वपू ज्याचें न जाळी कसा ॥
लोकां विक्रम केंसरी मनिं गणी हा शत्रु जंबूक सा ॥ ६१ ॥

( सर्व भयभीत होऊन पळूं लागतात. )

राघो०— अहो देहगडवासी, भीऊं नका-- मी तुह्मांस आपकार करणारा नव्हे. पण, या गडाचें रक्षण करण्यास मवृत्तझालों आहे, तर खबरदार, ( बंकांस ) कोणासही गडांत येऊं देऊं नका. दरवाजे खबरदारीनें रक्षण करा; जर फंद फितुर कराल, तर मात्र ( हातांतील तलवारीस अनुक्षून ) या माझ्या हातांतील तलवारीनें तुमचा मोक्ष होईल; समजलां १ हा कामाजी नाईक ( हातानें ) युवराजा आहे. मी सेनापति आहें. आतां उभयतांची आज्ञा सर्वत्र मान्य करा; नाहींतर हीं, ही पाहीलीतना १ ( तलवार दाखवितो. )

मता०— मदा०— मोहना०— लुभा०— } जर कां कोणी दादाचें ऐकलें नाहीं, तर आह्मी त्याची नर्डी पिळूं. ( राघोजीस ) दादा, तुह्मी काळजी करूं नका; उभे मात्र राहा. आह्मी सर्व मिळून या गडाचें रक्षण करूं.

१ अलवेष.

श्लोक. [ शालिनी ]

रोधूं द्वारें आंतलीं आम्हि सारे ॥
या दुर्गाचीं कोण येतो कसारे ॥
वारायाला पाहुनि हेति-पाणी ॥
हा तूं काळा भीद ही शौर्य-खाणी ॥ ६२ ॥

अहंकार.— ( बाहू थोपटून पुढें येतो ) अहो, तुह्मी सर्व स्वस्थ असा; मी एकटाच तुमच्या सकल शत्रूंचा नाश करतों.

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित )

हा मी सर्व अमित्र-शर्व निरसाया मित्रें पाहें उभा ॥
या क्षोणीतलि मत्समान न दुजा वीर्यें खुजें या नभा ॥
मानीं या भुवनत्रया करतलीं कंदूक सा झेलिता ॥
तो सारे अरि संहरी प्रगटुनी शार्दूलविक्रीडिता ॥ ६३ ॥

( नंतर तुकोजी राव गायकवाड गडांत प्रवेश होत नाहीं ह्मणून बाहेरून प्रदक्षिणा करून विचार करतो. )

तुको०— शिवाजीराजानें शांतिबाईचा समाचार घ्यावयास पाठविलें ह्मणून आलों, पण काय करूं? ती साध्वी माझ्या दृष्टीस कशी पडल्ये असें झालें आहे. गडाचे सभोंवती तीन प्रदक्षिणा झाल्या, परंतु गडांत प्रवेश होत नाहीं. जिकडे जावें तिकडे खबरदार चोप असें ह्मणतात. पहिल्या चवकीदारांतून कोणीच दृष्टीस पडत नाहीं. सर्व नवा कारभार झाला आहे. कोणी मला ओळखत नाहीं. आणि मी को-

---

१ तलवार हातांत घेतलेला. २ काळास. ३ भयदेणारा. ४ शत्रुरूप आंधार. ५ सूर्य.

णास नाहीं ओळखत; तेव्हां माझा प्रवेश तरी आंत कसा होतो ? बरें, शांतिबाईस भेटल्या शिवाय परत गेलों तर निवृत्ती राणीसाहेब प्राण देतील, आणि प्रभूचाही मजवर अनिवार कोप होईल; आतां कसें करावें ? तो मानाजीराव जर दृष्टीस पडता तर कार्य झालें असतें; पण तोही कुठे दिसत नाहीं (किंचित् विचारकरतो ) हाँ, आतां अशी मसलत करूं या. मला ठाऊक आहे, कीं हा बालेकिल्ला शांतिबाई करितां म्हणूनच बांधला होता, तेव्हां तो त्यांतच असेल. तर आपण त्याच्या खालीं उभें राहून मोठ्यानें आरोळी मारावी, म्हणजे कदाचित् तिच्या कानीं जावून ती ओ म्हणेल. अथवा सखी सुमति तिच्या समागमे आहे ती तरी माझा शब्द ऐकून पुढें येईल. म्हणजे आपलें कार्य झालें. ( बालेकिल्ल्याखालीं उभा राहतो आणि मोठ्यानें आरोळी देतो. )

## पद. ( रागसोहनी )

हा चोर शांतिस शोधीत आहे ॥ धृ० ॥
जी प्रियप्रभू-तनुजा उमजा तुह्मी निवृत्ती-कुक्षींत होती ॥
दर्शनें शांतवि आधिव्याधि त्रितापज सर्व अहो ती ॥ १ ॥
पाणी-ग्रहणीं जिचे प्रभू. प्रतिनिधी जाहला जीवाजी देही ॥
कां जी तुह्मी तदीयानुचर होऊनि दावान कोण्या ती गेंहीं ॥२॥
स्वामि-कथित मज विदित खरें परि त्रिपुट-शिखरें वसे ती ॥
होईन उपकारि मि त्यांचा जे सदनीं तिच्या मज नेती ॥३॥

---

१ जाणून. २ पाणिग्रहण करून. ३ देहगडाधिकारी. ४ तिचे सेवक. ५ घरांत.

बहु अमलों तिज वांचुन धुंडुन सफल न जाहलें येणें ॥
दाउं कसें मुख रविदासप्रभुलागिं मि हें दीनवाणें॥४॥ ॥६४॥

( असें ह्मणून वर पाहतो. )

( नंतर शब्द होतो. )

कुटची रे शांति तुझ्या दृष्टीस दृडणार बावा!

**श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )**

झाली सुक्ष्मतमा न जीव धरि ती शांती कुठे पाहसी ॥
दासी ही सुमती स्थितीसच तिचे लक्षून हो साहसी ॥
किंवा जा परतोन स्वामि-सदना दीनापरी येवुनी ॥
लक्षीं नीरसचार शी हुतवहार्पीता गवाक्षांतुनी ॥ ६५ ॥

तुका०— तर काय शांतिच नाहीं !

( आकाशाकडे पाहून मोठ्यानें रडूं लागतो. )

**साक्या.**

काय सांगूं माउलीला तुझें कुशल आतां मी ॥
जाउन जी अनुलक्षित बसली मदा-गमना धामीं॥१॥
ज्या तोडें मी तूर्ण आणितों शांतीच्या कुशलासी ॥
वदलों त्याणें कशी कथूं ही स्थिति तनूदया लासी॥२॥
निजकांतिला प्रभु अश्वासी शांति सुखी पतिगेहीं ॥
आहे न शोचीं विपरित आतां ऐकुनि कैसें साही ॥ ३॥
प्रस्थानीं दुश्चिन्हें झालीं मी न मानिलें त्यांला ॥
परी न टळला दुर्दैवाचा अति शोकद जो घाला ॥ ४ ॥
आश असुखाची वार्ता कथण्यांहून मरण मज वाटे ॥

१ अमर्दीकुरा. २ साहस करणारा. ३ मुकलें गवत. ४ अग्नीला आर्पित. ५ झरोका.

मधुंतर सुज्ञ समहिषी प्रभुचें ऐकुन काळिज फाटे॥५॥७०

तर आतां आपण प्रभूकडे जाऊन अशी दुःखप्रद वार्ता कथन करून त्यांस शोकार्णवांत बुडवावें त्या पेक्षां येथेंच प्रायोपवेश करून प्राण द्यावा हें बरें. ( असा विचार करतो )

[ इतक्यांत पडद्या आंतशब्द होतो. ]

अरे, तूं सर्व सत्ताधारी प्रभूचा चार ह्मणवितोस आणि असा व्यामोह पावतोस, हें काय ? मूर्खाप्रमाणें तूं प्रायोपवेश करणार यांत तुझा पुरुषार्थ तो कोणता? तर असा भ्रम पावूंनको; सत्वर येथून जा, आणि शांति बाईचें सर्व वृत्त प्रभूस निवेदन कर, ह्मणजे सर्व शक्तीमान प्रभु लागलाच ज्याणी हा देहगड बळकावला आहे त्यांस शिक्षा करून या मायाऊच्या प्रीतिपाशांत गुंडाळलेला जीवाजी यास मुक्त करील, आणि शांतिबाईच्याही प्रांणाचें रक्षण होईल. उगीच येथें प्राणत्याग करूं नको.

श्लोक. [ शिखरिणी ]

नको प्राण त्यागूं प्रभुअनुचरा जा कथ तया ॥
प्रभूला त्वन्माया अपेरिहर लोकीं वसतयां ॥
तिणे गुंडाळूनी निज करवींच जीवाजि समन ॥
निजभ्रात्यांहातें करि सकळ देहस्थदमन ॥ ७१ ॥
द्विसेनाशा झाल्या नयनिं सदया शांति सुमती॥
तयां कारागारीं खडकवुनि आत्मीय कुमती ॥
निरोधूनी द्वारें करिति चहुंकोनी दवडची ॥
स्थिती आहे ऐशी अति भयकरा देहगडची ॥ ७२ ॥

---

१ अतिगोड. २ अनिवार. ३ बंदिशाळेंत. ४ आपली.

तुकोजी.अरेरे; एकूण हें सर्व कृत्य त्यां चांडाळी मागणीचें आहें औं! बरें काय चिंता आहे !हा मी असाच जातों, आणी सर्व वृत्त प्रभूला सांगून या दुष्टेला वस्तीस ठिकाण नाहींसें करून टाकतों. बरें शांती बाई अद्याप जीवंत आहे, हें एक मोठेंच भाग्य समजलें पाहिजे. आतां उशीर लावूंनये; लौकर जावें येथून.(असें ह्मणून निघून जातो. )

( नंतर राघोजी आणि कुतकाजी येतात )

राघो०— कायरे कुतका, तो क्लीब कायरे बडबडत गेला ?

कुत०— दादा, जाऊ द्या मेल्याची हूल. त्याचें नाव तरी कशास घेतां.

राघो०— पण आपला बंदोबस्त तर चांगला होता, ह्मणून त्या वंचकाची टांकीच रुतली नाहीं.

कुत०— दादा, आपली वीरमाता जर आपणांवर प्रसन्न आहे, तर मग अशा या मुरकुटास कोण मीठ घालतो ?

राघो०— ( वीरश्रीचा आवेश आणून ) कुतका, ऐक.

श्लोक. ( वसन्ततिलका )

याम[1]झिये असिन मी अतिविरकोटी
एक्या क्षणीं निवटितों न हि गोष्ट खोटी ॥
हा एकला मम करांतुनिया पळाला
ज्याचा पराक्रम मला पहतां गळाला ॥ ७३ ॥

कुत०— महाराज, ती वेळ आतां जवळच आहे.

राघो०— ती कोणती !

कुत०— अतिवीर कोटी निवटण्याची, आणखी कोणती ?

---

१ तलवारीनें.

राघो०— तीरे कशी ? हा एक लुच्चा आला होता, तो तर मागच्या पाईच मागें पळाला; तूं पाहिलासना ? आतां काय आहे ?

कुत०—तुमचें कर्म आतां तुह्मास रडविणार, आणखी काय ?

राघो०— आमचें कर्म ? तेंरे कोणतें ?

कुत०— कोणतें ह्मणजे, मागाचें !

राघो०— जें आमचें कर्म ह्मणतोस, तें आह्मास रडवील कशाकरितां ?

कुत०— तुह्मी त्याचा अवमान केला, ह्मणजे तें तुह्मास रडविल्याशिवाय सोडील काय ?

राघो०— काय ह्मणतोस ? आह्मी आपल्या स्वकर्माचा अवमान केला ! सांग पाहू कसा तो !

कुत०— ऐका सांगतो, तुह्मी अवमान कसा केला तो; तो राजदूत एकाकी इतका तुमच्याजवळ आला असून तुह्मी निजून राहिलां. आणि त्यास जिवंत जाऊं दिलें, हा त्या तुमच्या माग-कुलसंवर्धनी देवतेचा अवमान नव्हे काय ?

राघो०—(किंचित् गोंधळांत पडतो ) होय, तसें दिसतें खरें; गड्या, माझा अदमास चुकला जरासा; पण तो काय, गरीब बिचारा ह्मणून जाऊं दिला. समजलास; नाहीं तर, लागलाच केला असता बरोबर त्याला.

कुतका०— शाबास ! तो गरीब बिचाराह्मणतां काय ? पाहाल आतां, तुमच्या जिवावर कटार घेऊन कसा येईल-तो. अहो, तो त्यासेनापतीचा गुप्त हेर होता. तुह्मांस या देहगडाच्या आश्रया खालीं पांहतांच त्याच्या आ

गाचे तिलपापड झाले, आणि तो तसाच चडफडत गेला, पाहिलातनां ?

राघो०— हाँ, असें होतें काय ? तर गड्या मसलत फसली खरी; अरेरे, म्या मूर्खानें त्याला जीवंत जाऊंदिलें हें चांगलें नाहीं केलें. असो, होणारास उपाय नाहीं. तो द्वाड येथील सर्व वृत्त त्या सेनापतीला निवेदन करून कदाचित् आह्मास संकटांत घालील, यांत संशय नाहीं.

कुतका०—महाराज कदाचित् ह्मणूं नका. संकटांत घातलेंच असे ह्मणा.

श्लोक. ( वसन्ततिलका. )

हा आमचा सबल देहगडांत वास ॥
ऐकुन दाहिल तदीय बहू जिवास ॥
सेनानि घेउन असह्य दमादि सेना॥
येतो गती उपरि या बरवी दिसेना ॥ ७४ ॥

राघो०— कुतका, तूं भिऊंनको; जरी ते सेनापति आदि करून ससैन्य आले, तरी ते करणार काय ? आह्मी त्यांस गडांत येऊं देऊं तेव्हांना ? गडाचीं द्वारें बंद केली, ह्मणजे त्यांच्या बापाच्यानेंही आह्मांस अपकार करवणार नाहीं. एक वेळ आमच्या हातीं लागलेला गड त्यांला परत मिळेल ही गोष्ट विसरा आतां. जरी ते आले, तरी शेवटीं कंटाळून कपाळास हात लाऊंन रडत जातील, समजलास ?

कुतका०— ( खालीं पाहून मुरमुरत ) कोण जाणें रडत जातील, कीं रक्त घालवितील.

---

१ सेनापतिबोध. २ दुःसह.

( इतक्यांत मोठा भयंकर ध्वनि होतो. )

राघो०— ( किंचित् मनांत दचकून ) कायरे, हा इतका भयंकर ध्वनि कशाचा असावा बरें ?

कुतका०— पाहातों महाराज ! कशाचा ध्वनि आहे तो. ( हिकडून तिकडे धांवून वर आकाशाकडे पाहतो ) हाँ; मला वाटतें हा ध्वनि देवदुंदुभी सारखा भयंकर आहे, हा दुसऱ्याचा नव्हे. शिवाजी राजाच्या. सैन्यांतील भेरीचाच आहे, यांत संशय नाहीं.—

श्लोक. ( वसन्ततिलका )

जो कानिं संचरुन धैर्य-गडास दारि॥
जो वीरवृत्ति अबला करुनी विदारी ॥
शत्रूंचिये ऱ्हदय -संपुटिं हा न आन ॥
त्या भूपती-वरुथिनि-स्थित भेरिध्वान ॥ ७५ ॥

राघो०— कायरे कुतका ! एव्हां, हा असा राजाचा दुंदुभि कशासाठीं बरें वाजला असावा ?

कुतका०— कशासाठीं कां वाजेना; आपल्याला काय त्याचें ?

राघो०— अरे, त्या लुच्चानें तर कांहीं कलागत लावली नसेल ना ?

कुतका०— कोणी ?

राघो०— तो, नुकताच एक क्लीब चडफडत गेला एथून, त्याणें ?

कुतका०—हाँ, त्याणें ह्मणतां ! ( वर आकाशाकडे पाहू-

---

१ फोडी. २ अन्य. ३ शिवाजीराजाच्या सैन्यातील. ४ नोबतीचा नाद.

न ) होय गड्या. कांहीं तसेंच दिसतें खरें. पण आपण त्याची कांहीं काळजी करीत नाहीं.

राघो०—असें कां ह्मणतोस, कदाचित् तसें कांहीं खरोखर-च असलें तर ?

कुतका०—अहो, आपण शतवीरकोटी निवटणारे आमचे यजमान समक्ष असतां आह्मी कशाला भ्यावें, कांहीं तसें असलें तरी ?

राघो०— ( सस्मित आणि सक्रोध ) तूं जाणतोस कुतका? ही माझी तलवार मी खरेंच सांगतों, ज्याच्या मस्त-कावर पडेल, त्याला मोक्षासच पोंचवील, तुला दाखऊं याचा प्रत्यय आतां ! ( तरवार परजावयास लागतो. )

कुतका०— ( कांहीं मागें सरतो ) महाराज क्षमा करा, आणि हात आवरा आपला जरासा; मला भय वाटतें.

राघो०— हा वेड्या भ्याडा ! अरे, तुला भय कशाचें ?

कुतका०— नाहीं महाराज ! मला भय, तुह्मी जवळ अ-सता. पण ह्मटलें कोण जाणे, प्रत्यय दाखविण्याचा प्रसंग कदाचित् मजवरच गुदरों लागेल ?

राघो०— छी वेड्या, असें कसें होईल ? मी आपला उ-गाच बोललों तुला; पण ( स्वबाहुस अनुलक्षून ) हे माझे बाहु फुरफुरतात त्या शत्रूंची कोंशिबीर कराव-यासाठीं. काय सांगु रे ? (दांत चावतो आणि वीरश्रीचे हावभाव करतो. )

( ध्वनीनंतर मोठा शब्द होतो. )

अहो सकळ राजकार्यप्रमुख वीर हो, संपूर्णस्थावर जंगमाचें पालन करणारा, दयालु, न्यायी, आणि नीति-

मानू असा जो शिवाजीराजा त्याची आज्ञा अशी आहे कीं, " बोधाजीराव सेनापति आदिकरून सर्व वीरांनीं सायुध आपआपल्या पतकांसहवर्तमान भवारण्यांत देहगडीं स्वारी करावी, आणि पूर्वीं पुष्कळ राजद्रोह केल्यावरून काढून लावलेले रामोशी पेंढारी इत्यादिकांनी तेथें मोठें बंड करून जीवाजीरावास पराजित केलें आहे त्याची सुटका करून पतिवियोगामुळें अत्यंत शोकाकुल झालेली अशी जी शांति, तिजसहवर्तमान निजसुखासनीं स्थापन करावें." तर सर्व सेनानायक योधहो, सर्वशक्तिमान प्रभूच्या आज्ञेस अनुलक्षून सिध्दता करा. उठा लौकर.

### आर्या.

मायोजित[1] जीवाजी मुक्तकरा जा दमादि सेनापें[2] ॥
बोध निदेशें प्रभुच्या भववनि शांती करा विगततापं[3] ॥ ७६॥

(ऐकून सर्व घाबरतात आणि सैरावैरा धावूं लागतात.)

कुतर्का०— दादा घात झाला, धांवा लौकर. निवटा शतवीरकोटी आतां.

राघो०—( घाबरेपणाने ) रोधा रोधा सारीं द्वारें देहगाचीं; पाहाता काय, खबरदार, ( बंधुजनांस संबोधून ) आंत येऊं देऊं नका कोणासही. हा मी हत्यारबंद चहूंकडे फिरतों. ( तलवार लटकावीत हिकडून तिकडे फिरतो. )

### पद. ( राग लिलांबरी. )

रोधा रोधा हो सारे देहगड-दरवाजे ॥ धृ० ॥
बोध नका मधिं येऊं देऊं ॥ जो कां घर घेऊं ॥ १ ॥
मत्सर कामा मदमोहादि ॥ उभवा तुह्मी मादी ॥ २ ॥

---

१ मायेनें जिंकलेला. २ सेनापति. ३ तापरहीत.

रविदासमभू-बोधाऽगमनीं॥अ॥त्यां न ठाव जनीं॥३॥७७॥

( हे ऐकतांच कामाजी, मदाजी, मसाजी, मोहनाजी आणि लुभाजी सर्व तलवार हातांत घेऊन हिकडेतिकडे फिरतात, आणि मोठ्यानें ओरडतात.) खबरदार, खबरदार.

**राघो०**— ( मिशांवर ताव देतो आणि फुटकुटत पूर्वोक्त श्लोक ह्मणतो. )

श्लोक. [ इन्द्रवज्रा. ]

माखी न ही हेति अरी-रुधीरें ॥
अस्मन्मनें केलि जिहीं अधीरें ॥
कीर्तीध्वजा लाविन या जगातें ॥
मी कार्य संपादिन आजगातें ॥

**जीवा०**— ( घाबरून मायेस ) पाहा प्रियकरे, मला टांकून जाशील तर सांभाळ. मी तुझा आहे सर्वस्वीं.

( नंतर संकल्प आणि विकल्प येतात. )

**संकल्प०**— ( मोठ्या आविर्भावाने जीवाजीस. )

श्लोक. ( मालिनी. )

जरि दम शतकोटी बोध येती जिणाया ॥
परतुन नच जाती शांत होती रणा या ॥
नभि नभि अजि तेजां जो दिसे जीवराया ॥
निजहित करुं शत्रू आणुं तो संहराया ॥ ७४ ॥

**विकल्प०**— अरे, इतकी खटपट कशाला पाहिजे? मी एकटाच हें सर्व भूमंडळ पालथें घालीन, इतकी शक्ती मजमध्यें आहे. तुह्मी कोणी भिऊं नका, स्वस्थ असा. हा तर काय, पण असे शेकडों देहगड, मी क्षणांत

१ शत्रूच्या रक्तानें. २ सूर्य.

बांधीन, आणि उद्ध्वस्त करूनही टांकीन.

श्लोक. ( वसन्ततिलका )

हा काय देहगड अर्बुद[1] मी रचीन ॥
ऐसे क्षणांत रवि मेदिनितें खचीन ॥
तारांगणें कवळितों मि दुकूलखोलीं[2] ॥
नेतों जरी ह्मणतसां नितळांत[3] खोलीं[4] ॥ ७८ ॥

जीवा०— या पुत्रांच्या भाषणानें सानंदित डोलतो) शा-बास; पुत्र हो, तुह्मी दीर्घायू व्हा. आतां मी कळि-काळास देखील भिणार नाहीं ( मायाऊस ) हे सुभ-जावती सुभगे, या तुझ्या उदरसंभव वीरपुत्रांनी माझी भीति दिगंतरास घालविली. चला आपण आतां सु-खविलास करूं. ( असें ह्मणून निघून जातात. )

( नंतर बोधाजीराव, दमाजीराव, शमाजीपंत, विचा-रराव, आणि विवेकराव येतात. )

बोधा०— देहगडाच्या द्वारांचा अवरोध केला आहे त्या लुच्चांनी; त्यापक्षीं आंत आपला प्रवेश होण्याचा सं-भव दिसत नाहीं, यास काय करावें ? ( विचाररावांस) तुह्मी आह्मापेक्षां पोक्तबुद्धीचे आहां; पाहा बरें कृ-पा करून, गडांत प्रवेश होण्यास कांहीं युक्ति सुचेल तर.

विचार०— मी ह्मणजे आपणापेक्षां कुशाग्रबुद्धी आहें असें नाहीं. परंतु विवेकरावांस बोलावून सर्वसंमतें एकादि युक्ति शोधुन काढूं या; आणखी काय ?

---

१ संख्याविशेष. २ वस्त्राचे पदरांत. ३ पाताळीं. ४ खालीं.

दमा०— ( बाहू थोपटून पुढें होतो ) मला आज्ञा करावी महाराज ! मी एका क्षणांत गडांत जाण्यास मार्ग करतों.

श्लोक. ( मालिनी. )

क्षिति अरि[1]रुधिरानें[2] तर्पिल्यावीण ये ना ॥
जड गड करिं येथें स्वस्थ बैसून सेना ॥
तरि मज करिं आज्ञा खंडुं[3] पाखंड-रोधा[4] ॥
सणणण अनुयोजीं व्हावया मार्ग बोधा ॥७९॥

शमा०— मलाही असेंच वाटतें. दमाजीराव ह्मणतात हा उपाय केल्यावांचून देहगडांत आमचा प्रवेश होईल असें दिसत नाहीं. मी गडाच्या सभोंवार प्रदक्षिणाकरून आलों, परंतु कुठे कांहींच संधी मिळण्याजोगती नाहीं.

विवेक०— तें तर खरें. परंतु पहिल्यानेंच आपण होऊन युध्दप्रसंग करावा हें चांगलें नव्हे. गडांत जीवाजीराव तर प्रभूचे जामात, आणि शांतिबाई तर लाडकी कन्या; आणखींही प्रभूच्या पदरचे लोक आहेत, न होऊन एकाद्यास गोळी लागलीच तर शोकप्रदच व्हावयाचें. याजकरितां रक्तपात न होतां किल्ला हातीं येण्याची मसलत साधेल तर बरें.

विचार०— विवेकराव ह्मणतात हें फारच सोईचें आणि शहाणपणाचें भाषण आहे, असें मला वाटतें.

बोधा०— होय, तें सर्व खरें. पण अशी कांही युक्ती केली पाहिजे नव्हे काय ?

---

१ पृथ्वी. २ शत्रूच्यारक्तानें ३ फोडण्यास. ४ अडकाव.

विचार०— युक्ति तर केलीच पाहिजे. बरें, चला आपण सर्व एकवेळ देहगडाच्या चौफेर फिरून येऊं, आणि पाहूं कांहीं मार्ग मिळेल तर ?

( असें ह्मणून सर्व देहगडासभोंवतीं फिरावयास निघतात. )

( नंतर शब्द होतो. )

श्लोक. ( भुजङ्गप्रयात. )

न सामें न दामें अरी हे वळाया ॥
करा यत्न लोकांस कीर्ती कळाया ॥
विमर्दावया शक्त आहे दमाजी ॥
निदेशीं तया कां करीतां श्रमा जी ॥ ८० ॥

( ऐकून सर्व तटस्थ होतात. )

बोधा०— ( विचाररावास ) देहगडस्थ शत्रु जिंकून जीवाजी रावास विमुक्त करण्याचें यश दमाजीरावासच मिळावें असें लोकपाळांच्याही मनांत आहेसें दिसतें. धन्य दमाजी राव, शाबास तुमची ! पाहा, हे लोकपाळ देखील तुह्मांसच अनुकूल असें भाषण करतात.

विचार०— ( दमाजी रावास ) या हिकडे, सिद्ध व्हा. आज सर्व लोकपाळांच्या मनांत तुह्मांस विजयी करावें असें आहे; तर युद्धाची तयारी करावयास आपले सेनापति बोधाजी राव आज्ञा करिताहेत.

बोधा०— तुह्मी आपल्या पतकासहवर्तमान पुढें व्हा, आणि पहिल्यानें देहगडावर विजय ध्वज चढवा पाहूं ? ह्मणजे आह्मास सर्व सैन्यास आंत प्रवेश करण्यास सुलभ मार्ग होईल.

श्लोक. ( मालनी. )

हळु हळु पञ्च देहीं संचराया करावा ॥
प्रकृति-बल विमर्दूनी स्वव्यूहा भरावा ॥
आलि सह परिवारें ही विचारादि सेना ॥
करुं अरि समुदाया त्याक्षणीं सा दिसेना ॥ ८१ ॥

दमा०—( अभिवंदन करितो ) आज आपल्या कृपेनें त्या प्रभूच्या धवळ यशाचा ध्वज देहगडावर चढवीन, तरच माझें नांव दमाजी. ( सैन्यांस ) माझी सर्व युद्ध-सामग्री समागमें घेऊन देहगडावर स्वारी करून कामाजी, राघोजी, आदिकरून मांग लोकांचा उच्छेद करण्यास सिद्ध व्हा.

श्लोक. [ वसन्ततिलका ]

वज्र[1]योग शर ने[2]म अणी नि[3]याम ॥
जीं आयुधें मम हठा[4]दिक यो[5]ग या[6]में ॥
तीं व्यक्त सं[7]गरिं सुपून वधा पडारी ॥
घ्यावीं मदीय र[8]थि सेवक सुज्ञ सारीं ॥ ८२ ॥

पद. ( धनाश्री. )

सकलहि चला चला अरि मारा ॥ धृ० ॥
ज्यांणीं होउन सबल धरीला देहगडामधिं थारा ॥ १ ॥
जीवा निजवश ठेउन देहीं करिती स्वैर विहारा ॥ २ ॥
रोधुन रडविति क्रूरपणानें शांति-सुमतिच्या दारा ॥ ३ ॥
रविदास-प्रभु-वार्गपराजित पुढें करा तलवारा ॥ ४ ॥ ८३ ॥

---

१ वज्रासन. २ व्रतादि साधनें. ३ तपादि साधनें ४ हठयोग. ५ योग विशेष. ६ चांगलीं. ७ युद्धांत. ८ वाणीला अजिक्य.

( नंतर मोठा भयंकर भेरिध्वनि होतो. )

( इकडे शांति आणि सुमति मूर्छित झाल्या होत्या त्या सावध होतात, हा पूर्वकथेचा संबंध. )

सुम०— हा असा भयंकर ध्वनि शिवाजी राजाच्या सैन्यांतील भेरिनादासारखा कशाचा बरें असावा ? ( कानदेऊन ऐकती. )

शांती०— अगे सखी, तूं माझें समाधान करण्यासाठीं अशा वृथा कल्पना कां करतीस ! ह्या तुझ्या कल्पनांनीं काय व्हावयाचें आहे-?

सुम०— ही माझी वृथा कल्पना आहे असें कां ह्मणतीस बरें ? अगे, तुझ्या क्लेशांचा परिहार होण्याचा समय आला असें मला खरेंच वाटतें.

शांती०— क्लेशांचा परिहार लौकर होईल हें मला समजलें आहे; सर्व क्लेशांचें आयतन असे जें शरीर तेंच गेलें, ह्मणजे मग क्लेश कोठून राहणार ?

सुम०—(तिला अश्वासून) प्रिये, अशी उदास होऊं नको. मी खचित सांगत्यें कीं, हा भेरनाद शिवाजी राजाच्या सैन्यांतील आहे. तुझ्या प्रियपतीच्या शोधार्थ त्याणें सैन्य पाठविलें असावें; त्या सैन्यानें स्वागमन सूचक हा दुंदुभि पिटला, यांत अगदीं संशय नाहीं. कांकीं:-

श्लोक. [ वसंततिलका ]

मेघध्वनीहुन भयानक जो अमित्रां ॥
अश्वासिता प्रभू-पदाब्जरतां सुमित्रां ॥

१ मेघगर्जनेहून. २ भयंकर. ३ शत्रूंला.

जो मन्मना सुखवि ऐकुन कानिं हा न॥
सामान्य भूपति-चमूंतिल भेरिध्वान ॥ ८४ ॥

शांति०—( सानंद ) काय, माझ्या ताताच्या सैन्यांतील दुदुभि वाजतो हा ! ( निजल्या जागींच कानवा घेते ) माझ्याही मनास कांहींसा आनंद वाटतो खरा, पण माझें हतभाग्येचें कुठचें इतकें दैव ! ( मातक्यान मोह पावते ) शांतीची शांति होण्याचा समय हा जवळच आला आहे आतां; आणखी काय !

सुम०—( गवाक्षांतून दीर्घ दृष्टीनें पाहते ) अगे सखी, तो पाहा अमल ध्वज दूरून विराजतो.( सानंदित ) हा तुझ्या ताताच्या सेनेचाच ध्वज आहे, समजलीस ! आतां तूं अगदीं काळजी करूं नको; थोडक्याच वेळांत तुझी आणि तुझ्या प्रियपतीची भेट होईल.

( इतक्यांत मोठा तुंबळ संग्राम होऊं लागतो. दुंदुभिनादानें गगन भरून जातें. देहदुर्गावर शरवृष्टि होऊं लागते; जिकडे तिकडे रहंवरांची दाटी होते; देहगडांत कामाजी, राघोजी आदिकरून अगदीं घाबरून जातात, चहूंकडे ओरडा ओरड होते. )

श्लोक. ( मालिनी. )

घणणण नभं भेरि-ध्वानिं संरोधियेलें ॥
सणणण शरजाळीं दुर्ग आच्छादियेलें ॥
खणणण यमशक्ती फोडिती दुर्गदारें ॥
ठणणण करिती ते शत्रु साही कुकारे ॥ ८५ ॥

---

१ साधारण. २ भेरिनाद. ३ आकाश. ४ चौघडीच्या नादानें. ५ भरलें. ६ बाणजाळानें,७.व्रतादिकेंकरून इंद्रियनिग्रह. ८ षड्रिपु.

शांति ( अत्यंत भयभीत होऊन कांपूं लागत्ये ) अगे सुमती, हा कल्पांतानलासारखा भयंकर संग्राम पाहून मला कंप सुटला. कदाचित् हा देहगड देखील रसातळास जाईल, असी ही शरवृष्टि होत आहे. मी अत्यंत सूक्ष्म झाल्ये आहें. मला वाटतें, माझा आतां प्राणांत होणार.

सुम०— प्रिये, तो पाहिला त्वां, तुझ्या ताताचा अमलध्वज ( हातानें दाखविती ) कसा विराजतो आहे तो ?' तूं आतां उगीच घाबरूं नको.हा गड कामाजी, राघोजी आदि करून मांगांनीं बळकावून तुझ्या प्राणप्रियास हीं बंदींत ठेवलें होतें, ह्मणून त्याचे मुक्ततेंकरितां तुझ्या ताताच्या आज्ञेनें हे सेनानायक हा तुंबल संग्राम करीत आहेत. याजपासून आपणास किमपिही भीति बाळगण्याची गरज नाहीं, समजलीस ?

शांती०— ( साश्रु आणि सहर्ष होते ) एकूण हें सर्व सैन्य माझ्या दयालु तातानें माझ्या सुखवर्धनाकरितां पाठविलेंना ? आहारे ताता ! तूं किती तरी दयालु हा ? या मंदभागिनीकरितां त्वां आपलें सर्व सैन्य संग्रामास प्रवृत्त केलें, आँ !

( हिकडे देहगडाच्या द्वारांवर यमशक्तीचे तडाके बसून द्वार उघडण्याच्या बेतांत आलें, तेव्हां गडांतील सर्वत्रांची दाणादाण झाली आणि ते सैरावैरा धावूं लागले. )

कुतर्का०—(पांचजन्य करित धांवतो ) अहो धांवा ! घ्या पळ. हा दरवाजा उघडतो देहगडाचा आतां. धांवा लवकर; रक्षण करा.

राघो०— भिऊं नको कुतका, हा मी आलों; अरे मी जीवंत असतां तूं कशासाठीं भितोस ? ( बाहु थोपटीत पलायन करण्याच्या बेतांत) धीर धर, घाबरूं नको.

कुतका०— दादा, अहो मला धीर धरूं सांगता आणि तुह्मी कुठें ही धांव मारतां ?

राघो०— मूर्खा, ही सांगण्याची वेळ नव्हे. उगीच वटवट करूं नको. जाऊं दे मला आधीं, संगळ्यांच्या पुढें. मी कांहीं युवराजा नव्हे. कामाजी युवराजा. तो तुझें रक्षण करील आतां. ( गडाच्या अधोभागीं गमन करितो. )

( इतक्यांत संकल्प आणि विकल्प यांस नियामशक्ति लागून ते मूर्छित पडतात )

कामा०—
मत्स०—
मदा०—
मोहना—
लुमा०—
(एकदांच आक्रोश करून पळायन करण्याच्या बेतानें धांवतात.)खबरदार ! भिऊं नका, भिऊंनका.

(इतक्यांत इच्छा,शक्तीचा झपाटा, लागून विकळ होते.)

माया० ( शोककरिते ) हे माझे अपत्यांनो, आतां त्या कोणास आलिंगन द्यावें बरें ? ( त्यांस सावध करिते ) चला आपण हा देहगड सोडून जाऊं. आतां येथें राहून आपणांस सुख होणार नाहीं. ते आपले जन्मवेरी आमचा आतां उच्छेद करतील, येथें येऊन.

जीवा०— ( तिला दृढ आलिंगून ) प्रिये, मला सोडून जाऊं नको. कदाचित् जाशीलच, तर मलां तरी समागमें घेऊन जा. ( ढळढळां रडतो.)

माया०—( तिरस्कारानें ) जा मेल्या गोंसामच्या, तुझी काय गरज आतां मला? सर्वस्व देऊन नागवा झालास. आतां बस रडत, दांत वांसून.

( त्याची मिठी निकरानें सोडवून मस्तकावर लत्ताप्रहार करिते आणि निघून जातें )

( जीवाजीराव मीठी सोडतेवेळेस तिच्या दुकूलास झोंबला होता त्या मायापटांत गुंडाळेला लत्ताप्रहारानें मूर्च्छा पावून अचेतन भूमीवर शयन करतो. )

दमा०—
शमा०—( देहगडांत प्रवेश करून बोधादिकांस ) हा मार्ग मोकळा. केला, या आतां, ससैन्य सेनानायक; आणि लावा विजयध्वज ( मोठ्यानें हांका मारतो. )

( बोधाजीराव, विचारराव, आणि विवेकराव सैन्या सह देहगडांत प्रवेश करतात )

बोधा०—( दमाजीरावास आलिंगन करतो ) ह्या तुमच्या अशा अवर्णनीय शौर्यानें हा देहगड आमच्या हातीं लागला.

विचा०—दमाजीरावांचें शौर्य आणि साहस हीं, आजच्या आमच्या विजयास कारणभूत झालीं पाहिजेत.

विवे०— होय, त्यांच्या अतुल पराक्रमानेंच आपण आज विजयी झालों. पण, ते कामाजी, रागोजी आदिकरून सर्व मांगांचे नायक कुठे आहेत? त्यांला जीवंत सोडूं नका.

बोधा०— अहो पाहा, पाहा कुठे आहेत ते. धरा त्यांला आणि ठारच करून टाका एकदां, ह्मणजे फिरून त्यांचें नांवही घ्यावयास नको.

## श्लोक. [ शार्दूलविक्रिडीत. ]

मारा त्यां वन-तस्करां[1] भगिनिच्या साह्यान[2] जे मातले ॥
जे अस्मद्रिपु ते सदा अघ निधी-[3]माजी च संभूतले[4] ॥
जे जीवाजिस बांधुनि भ्रमपथीं शांतीस शोकार्णवीं[5] ॥
घालूनी अपणास ही भ्रमविलें जे सिह रानीं भवीं[6] ॥ ८६॥

दमा०—मी विजयानंदाच्या भरांत त्या लुच्चांस अगदींच विसरलों. ( शमाजी पंतास) धांवा लौकर, त्या लुच्चांस एकदम धरून आणा. जीवंत न मिळतील तर त्यांचा शिरच्छेद करून टांका.

( हिकडे मायाऊ, कामाजीनाईक, राघोजीनाईक इत्यादि सर्व समुदायासहवर्तमान देहगडांतून अधोमार्गानें पलायन करतात. )

शमा०— ( जी आज्ञा ह्मणून निघतो ) इतक्यांत पळाले बेटे, आं. ( चहूंकडे अवलोकून शोध करितो आणि परत येतो ) महाराज, ते गडांत नाहींत. गड सोडून अरण्यांत गेले.

दमा०— काय पळून गेले ! घ्या सेना, जा शोधा अरण्य; आणि जेथें ते सांपडतील तेथेंच शिरच्छेद करून टांका, त्यांचा.

विचा०— अहो, तें सर्व यथावकाशानें होईल. पण आधीं शांतिबाईची आणि जीवाजी रावांची कुशल वार्ता ऐकून घेऊन राजाकडे चार पाठविला पाहिजे, हें सर्व वृत्त निवेदन करण्यास, नव्हे काय ?

---

१ वनातील चोरांस. २ साह्य. ३ पापसमुद्रांत. ४ उत्पन्न झाले. ५ शोकसमुद्रांत. ६ भवारण्यांत.

## आर्या.

शांति पहा कुशला पतिसह जीस्तव अजि अमात्यसेना ही॥
आली प्रभु-आज्ञेनें प्रस्तुत कर्तव्य हें दुजें नाहीं ॥ ८७ ॥

बोधा०— खरी गोष्ट; जें मुख्य कार्य तें एकीकडेच राहिलें. चला आपण वर बाले किल्ल्यांत जाऊं, आणि शांति बाईस भेटूं आधीं.

विचा०—अहो,पण जीवाजीराव दिसत नाहीं कुठे, हें कसें?

दमा०—ते त्या चोरांच्या हातून सुटून, वर शांतिबाईकडे गेले असतील.

विचा०—असें असेल खरें, तर मग उभयतांची फार दिवसांनीं भेटी झालेली यामुळें तीं समागमसुखांत निमग्न असतील. ह्मणून आतांच आपण तेथें जावें हें विहित नव्हे. (बोधाजी रावांस) जाऊं द्या चार प्रभूकडे, विजयवार्ता कथन करण्यास. आपण जरा अवकाशानें शांतिबाईस भेटूं.

बोधा०— फार बरें. तसेंच करूं या. (ह्मणून चार रवाना करतो.)

(नंतर सुमति वरून डोकावून बोधाजीराव आदिकरून अमात्यमंडळीस पाहाती)

सुम०— अगे शांतिबाई, ऊठ वर; हे पाहा, तुझ्या ताताचे बोधाजीराव आदिकरून अमात्य खालीं आले आहेत.

शांति०— (सद्गद होऊन उठवत नाहीं तरी हातांत काठी घेऊन उठत्ये.) आँ काय ह्मणतीस, माझ्या ताताचें अमात्यमंडळ आलें आहे ! खरेंच ते येथें आले आहेत !

सुम०— अगे, खरेंच नाहीं तर काय खोटें ? तुझ्या गळ्याची आण; ते पाहा प्रत्यक्ष.

श्लोक. ( वसन्ततिलका. )

तो बोध तो दमथ तो शम तो विचार ॥
तो भूपति-प्रिय विवेक हि आणि चार ॥
आले बहूत कुशलास तुझे पुसाया ॥
ये ऊठ पाह चल कांतसवें बसाया ॥ ८८ ॥

शांति०— ( आनंदाचे भरांत उभी राहात्ये ) अगे चल दाखव मला कुठे आहेत ते; पाहूं दे त्यांला एकदां. ( उभें राहावत नाहीं ह्मणून ) जळोगे मेलें, माझ्यानें उभें देखिल राहवत नाहीं.

सुम०— ( तिचा हात धरित्ये ) प्रियसखी, चल मी तुला सांभाळून नेत्यें. ( तिचा हात धरून टेंकित टेंकित तिला खालीं आणते. )

( पाहातांच सर्व उठून उभे राहतात. )

बोधा०— ( अभिवंदन करतो ) शांतिआका, खुशाल आहेसना ?

शांति०— ( शरीराकडे अनुलक्षून ) ही मी अशी आहें, पण माझा प्राणनाथ कुठे आहे ? ( चहूंकडे पाहते ) हे प्राणनाथ, मला अनाथाला टाकून तुह्मी कुठे गेलां ? ( असें ह्मणून मूर्च्छा पावत्ये. )

सुम०—( कपाळास हात लावत्ये ) अरे कर्मा ! ( बोधाजीस अनुलक्षून ) अहो प्रधान हो, तुह्मी ज्याची मुक्तता

करावयास आलां, तो जीवाजीराव कुठे आहे ? ( रडूं लागती. )

बोधा०— } ( दमाजीरावाच्या मुखाकडे टकटकां पाहा-
विचा०— }

तात ) दमाजीराव ! —

दमा०— ( चकित होतो ) हें मोठें आश्चर्य झालें. ( शामाजीस ) अहो पाहा, किल्ल्यांत सर्व ठिकाणीं शोधून; ( उश्वास टाकतो ) आहारे विधी[1]! ज्यासाठीं इतका प्रयत्न केला, त्याचाच अभाव,[2]ओं ?

( सर्व सचित, साश्चर्य आणि तटस्थ होतात. )

सुम०— ( शांतीस मांडीवर घेऊन सावध करित्ये ) ऊठगे, ऊठ आई; असें काय करतीस तूं. अहो संपूर्ण लोकपाल हो, ही माझी प्रियसखी, शांति आपल्या प्रियपतीकरितां अत्यंत शोकाकुल झाली आहे, तर कृपा करून तुह्मी तरी त्याचा शोध सांगा. अहो, ही सर्व जगताचें पाळण करणारा जो प्रभु त्याची प्रियकन्यका जगतास शांति देणारी, या अशा शोकानलांत दहत आहे, हिला पतिशुभसूचक जीवनानें थंड करा.-

( नंतर पडद्याआंत शब्द होतो. )

श्लोक ( वसन्ततिलका )

माया-पटांत निजला विगतासु[1] सा जो ॥
पाहा गडांत अंधें त्वन्मति हि न लाजो ॥
जाया मिळेल गत जीवित अंत[3]भुकतो॥
ज्यासांठि शोक[4]निधि-मज्जित सर्व हो तो ॥८९॥

( सर्व कान देऊन ऐकतात. )

---

१ मेल्यासारखा. २ खाली. ३ पीडाग्रस्त. ४ शोकसमुद्रांत विमग्न.

शमा०— ( सवेग अर्धी जातो आणि चहूंकडे न्याहाळून पाहून आपणाशीं ) अहो तो कोण बरें, कृष्णांबर पांघरून निजला आहे ? वस्त्र तर स्त्रीप्रमाणें दिसतें, आणि शरीराकृति पुरुषाची भासती हें कसें काय ? (अगदीं जवळ जातो) श्वासावरून ही स्त्री आहे किंवा पुरुष आहे हें अनुमान करतां येईल- ( कान जवळ करतो ) श्वासोश्वास तर मुळींच नाहीं. मला वाटतें याला गाढ निद्रा लागली आहे, हा जीवाजीच आहे. ( हातानें तोंडावरचें वस्त्र एकीकडे करतो ) अहो, हा तोच. ( मोठ्यानें ) अहो रडूं नका. हा आहे जीवाजी येथें. स्वस्थ राहा.

( ऐकून सर्व सानंद उठतात आणि अर्धी जाऊं लागतात. )

क्षमा०— आतां माझा प्रयत्न सफळ झाला.

बोधा०— तुमचा प्रयत्न सफल तर काय. पण आमचें सर्वांचें तोंड उजळ झालें.

विचा०— होय, नाहींपेक्षां मोठी पंचाईतच होती, आम्हास हे कृष्णवदन घेऊन परत जाण्यास.

सुम०— ( सद्गद होती ) अगे माझे दैवाचे शांतिबाई, अगे हा पाहा, तुझा प्राणनाथ जीवंत आहे. अगे ऊठ, उघड डोळे. शोक नको करूं आतां.

शांति० —( सावध होऊन ) अगे सखी, तूं अशा भाषणांनीं माझें समाधान करतीस काय ?

बोधा०— ( धांवत तिच्या जवळ येतो ) शांति आका, अहो मृषा नव्हे, हा जीवाजीराव खालीं आहे. तो पाहा, शमाजीपंत हाक मारून सांगतो.

शांति०— ( सानंद सुमतीस मिठी मारती ) अगे, तर आज मी प्राणनाथ याच डोळ्यांनीं पाहीनना ? हें केवढें मोठें माझें भाग्य ! ( आनंदाश्रूंनीं डोळे भरतात. )

सुम०— अगे, तूं मोठी दैववान ( तिचे अश्रु पदरानें पुसत्ये ) आतां माझ्या जीवांत जीव आला. माझे सखी ! आज तूं आपल्या प्रियपतीबरोबर सुखानुभव घे, बरेंना.

( सर्वत्र जीवाजी रावाच्या जवळ जातात. )

बोधा०— जीवाजीराव, उठा वर उठा. अहो, अद्याप तुह्मी झोंपेंतच आहां, हें काय ? ( तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून त्याच्या आंगावरचा मायापट काढतो ) अहो उठा वर, ही तुमची प्रियपत्नी शांतिबाई तुह्मास भेटावयास आली आहे. ( हातानें दर्शवितो. )

शांति०— ( जीवाजीच्या सन्निध जात्ये आणि त्यास स्वकरानें जागृत करत्ये ) अहो प्राणनाथ, या तुमच्या प्रियपत्नीकडे पाहा. ( तो अचेतन झालासें पाहून ) अरे कपाळा, हें काय ! ( मूर्च्छा येऊन धाडकन भूमीवर पडती. )

( सर्व घाबरून जीवाजीच्या हातपायांस चेपून नाडी पाहातात. )

सुम०— ( जीवाजीचें शरीर पाहात्ये. ) अहो हा तर अगदीं काष्ट होऊन पडला, आतां आशा कशाची. ( ढळढळां रडत्ये आणि शांतीस पोटाशीं धरत्ये. )

( सर्व साश्रु होतात. )

बोधा०— ( सकंप ) अगे असें काय करतां ? कोणतीहि गोष्ट पक्की समजण्यापूर्वीं शोक करीत बसूं नये. ( सु-

मतीस) अगे आण सीतळ पाणी, आणि लाव त्यांच्या डोळ्यांस. त्यांला भयंकर समर पाहून मूर्च्छा आली आहे, आणखीं काय ! (मनांत) वेळ तर मोठी वाईट दिसत आहे.

दमा०— (कपाळावर हात मारतो) हे दुदैवा ! हा काय अनर्थ केला त्वां ! ज्यांच्या साठीं हा सर्व सेनाभार घेऊन आलों, युद्धप्रसंग ही तुंबळ करून गड हस्तगत केला, त्यांचीच अशी दशा व्हावी काय ?

शमा०— कायहो दुर्दैवाची गतिही ? इतका प्रयत्न करून शेवटीं तुस कांडून हाताला फोड मात्र, तसें झालें हें. (रडूं लागतो)

विचा० (विवेकास) आतां प्रभुला वदन कसें दाखवावें ? प्रसंग मोठा कठीण दिसतो.

सुम०— (सीतळ पाणी आणून जीवाजीच्या आणि शांतीच्या आंगावर शिंपिल्ये.) सावध व्हा, महाराज ! सावध व्हा. (शांतीचे चुंबन करून) अगे माझे प्राणसखी, मी तुला आतां कुठे पाहूं ? तूं उठून एकदां तरी मजशीं बोल.

## दिंडी.

कसें कोसळलें गगन तुझ्या डोईं ॥
अथवा झाला हा वज्रपात काईं ॥
तुला पाहूं मी आतां कुठे आई ॥
ऊठ मुजपाशीं बोल कांहीं सोई ॥ १ ॥ ९० ॥

श्लोक. ( शिखरिणी )

कसें काळें तुझ्या गगन शिरिं हें कोसळविलें ॥
शरत्काळीं मेघ-द्युतिन विधु-बिंबा मळविलें॥
महा सिंधू-तो यातरून घननीरांशयिं बुडे ॥
तसा भूमिशय्या करून तव हा कांत पहुडे ॥ ९१ ॥

( तिच्या नाकाजवळ पाहून ) ही आतां कोठची उठ:-वयाला. हाय हाय ! ( ऊर बडविल्ये ) अगे, मी तुझ्या आ-ईला काय तरी सांगूं आतां ? अगे सखी ! अगे शांतो ! असें काय केलें हें ? आजपर्यंत मी तुला सांभाळली, पण, शेवटीं त्वां मला कसेंगे ठकविलें.

( सर्व अधोमुख रोदन करूं लागतात )

( नंतर भालदार ललकारतो )

श्लोक. ( मालिनी )

सकल जग जयाची स्वीय लीला विराजे ॥
स्थिर चर लघु मोठे माजि त्या रंक राजे ॥
समर्हिषि वनिं आला या उठा मान याला॥
निज प्रियतनुजा-जांनी सुखी पाहयाला ॥ ९२ ॥

बोधा० — आहाहा ! काय संकट हें ! हा प्रभु नि-वृत्तीसहित आला, आणि आतां शांतीचा आणि जी-वाजीरावाचा समाचार विचारील त्यास काय तरी सांगावें ?

दमा०— अहा दुर्दैवा ! त्वां सर्व दुःखसमुद्र तारून शेवटीं या थिल्लरोदकांत बुडविलें ना ? आतां प्रभूला सां-गावें तरी काय ?

---

१ पावसाच्या सांचलेल्यापाण्यांत. २ राणीसह. ३ जांवई. ४ सांचलेलेपाणी.

( विचारराव, विवेकराव, आणि शमाजीपंत सर्व स्तब्ध होतात. )

( नंतर राजा शिवाजी आणि राणी निवृत्ति नरयानांत बसून येतात. )

( सर्व उठून खालीं मान करून स्तब्ध उभे रहतात. )

शिवा०— मी तुह्मा सर्वांचा मोठा आभार मानतों, कीं तुह्मी दुर्धर शत्रु जिंकून हा आज जय संपादन केला. तुमचा हा अतुल पराक्रम आणि शुद्ध स्वामिभक्ति हीं सदैव अमतीम राहोत त्रिभुवनांत; ( कोणीच मत्युत्तर करीत नाहींसें पाहून त्यांच्या मुखाकडे पाहतो, आणि मनांत) आज हे विजयानंदांत डुलत असावे तसे नसून सचिंत से कां दिसतात ?

निवृ०— ( शाशंक ) काय, बोधाजीराव ! जीवाजीराव कुठे आहेत ? ( सुमतीस ) कायगे, त्वांही मौन धरिलें ! अगे माझी शांति कुठे आहे ! खुशाल आहेना ! अशी गे काय करतीस; बोलत देखील नाहींस ?

सुम०—( मोठ्यानें हबंरडा फोडून ) काय बोलूं, माझें कपाळ ! ह्या येथें पडल्या आहेत शांतिबाई. ( ऊर बडवित्ये)अगे शांतिबाई ! ऊठगेऊठ. अगे ही तुझी माउली आली आहे हिजकडे तरी पाहा, एकदां डोळे उघडून.

निवृ०— ( गहिंवरून धांवत जवळ जात्ये ) अगे सुमति ! हिला काय झालें असें !

( शांतीस उंचलून मांडीवर घेत्ये. )

सुम०— ( रडत रडत जीवाजीराव पडला होता तो हाता-

ने दाखविल्ये ) हा पाहा, काय अनर्थ तो; दुसरें काय आणखी होणार ? हें झालें.

निवृ०— अरे विपरीतगतिदादैंवा ! हें काय संकट मला प्राप्त केलें त्वां ? अहो जीवाजीराव ! अगे माझे लडिवाळे शांति ! मला टांकून तुह्मी कुठे गेलां ( मूर्च्छा पावल्ये. )

सुम०— ( तिला सावध करिल्ये ) बाईसाहेब, सावध व्हा. ( पदरानें वारा घालल्ये ) अहो, तुह्मीच असें करूं लागलां, तर मग आह्मी काय करावें ?

निवृ०— ( किंचित् सावध होऊन शोक करल्ये. )

साक्या.

हा दुर्दैवा कसा घातला मजवरती हा घाला ॥
पीयूशास्तव कूपा खणतां हालाहलधि निघाला ॥ १ ॥
हा दुर्दैवा या जगतींत्रंय कैसी स्त्री मि कुशीला ॥
गेली अकाळीं कन्या झाली होती जीचे कुशीला॥ २ ॥
हा दुर्दैवा प्रसवुन शांती लावियलें रुदनासी ॥
ठेवियलें तरि कां मज्जीवित शोकाग्नित दहनासी ॥ २ ॥
हा दुर्दैवा उपटुन माझा स्वांत-सौख्य-तरु-रोपा ॥
रडविशि मातें अदयपणानें नगणशि कांहिच पापा ॥४॥
हा दुर्दैवा तनुजा जामातास सुखी पाहाया ॥
आलीला तन्निधन दाउनी बैसविसील रडाया ॥ ५ ॥
हा दुर्दैवा क्रौर्याची तव तुलना कोण करितो ॥
क्षुत्पीडित जरि अर्भंयस कधिही वन्यें न मारि हरी तो॥१८

---

१ अमृत. २ विहीर. ३ विषसमुद्र ४ वाइट. ५पोटीं. ६ जळावयास. ७ मानसिक सुखाचा वृक्षरोपा ८ त्यांचामृत्यु. ९ क्रूरपणाची. १० भुकेने पिडलेला. ११ अर्भक. १२ रानात राहाणारा १३ सिंह.

शिवा०— ( तिचें समाधान करितो ) हे साध्वी, तूं सर्वज्ञ असून हा इतका शोक करितीस हें तुला योग्य नाहीं.

निवृ०— प्राणनाथा ! माझे प्राण या शांतीकरितां व्याकुल होतात, यामुळें योग्यायोग्याचा विचार माझ्या मनांत देखील येत नाहीं. जरशांति नसेल तर माझ्यानें प्राणधारण होणार नाहीं.

शिवा०— हे संपूर्ण जगताचे स्वामिणी, भीऊं नको. चला आपण या उभयतांस अशींच वर बालकिल्लयांत घेऊन जाऊं.

निवृ०— क्षमा मागत्यें, महाराज ! मी वर आल्यें असतां मला अधिक दुःख होईल, शांतीचे शृंगारादि पदार्थ पाहून.

शिवा०— अगे माझे परमप्रिये ! मी सांगतों हें मान. तूं अधिकतर सुखी होशील, तेथें जातांच.

सुम०— ( सानंद ) बाईसाहेब, स्वामीचें वचन कधींही मिथ्या व्हावयाचें नाहीं.

### श्लोक. ( शिखरिणी. )

जयाचे दृष्टीनें अमरपण पीयूष मिरवे ॥
जयाचे तेजानें रविस जग तेजाळ करवे ॥
जयाचे वाणीनें निगम[1] पढला सत्सुचिरगी[2] ॥
नहो मिथ्या त्याचें वचन सुखि होशी चल उगी ॥९९॥

निवृ०— बरें तर, जशी स्वामीची आज्ञा. ( पदरानें अश्रु पुसत्ये. )

---

१ वेद २ सत्य आणी निर्मळ वाणी.

शिवा०—( बोधादि प्रधानांस ) जीवाजीरावास आणि शांतीस वर आणा.

( सर्व आनंदानें उठून उभे राहतात. )

बोधा०— जी आज्ञा, ( जीवाजीस आणि शांतीस घेऊन सर्वत्र वर बालेकिल्ल्यांत प्रवेश करतात. )

चतुरा०—( पुढें येऊन शिवाजीस अभिवंदन करत्ये ) महाराजांचा विजय असो.

शिवा०—( चतुराऊस जवळ बलावून तिचे कानांत ) जा, तो अमृतकूप उघड, आणि त्यांतील अमृत आणून या उभयतांचे तोंडांत घाल.

चतुरा०—फार उत्तम(धांवत जाते आणि अमृतकूप उघडून त्यांतील अमृत घेऊन शांतीच्या आणि जीवाजीरावाच्या मुखांत घालत्ये. )

(तीं तत्काळ सावध होऊन उठतात.)

( बोधाजी, दमाजी आदिकरून सर्व आनंदित होतात आणि मुखानें जयजय शब्द करीत टाळ्या पिटतात.)

शांति०—( शिवाजीस आणि निवृत्तीस अभिवंदन करत्ये ) आज मला जीवदान आणि चुडेदान दिलें.

निवृ०—( सद्गद होते ) माझे लडिवाळे, आजचा मोठा सुदिन कीं, तूं माझ्या दृष्टीस पडलीस. ( एकमेकीस प्रेमालिंगन देतात. )

जीवा०—( सानंद आणि सलज्ज शिवाजीस आणि निवृत्तीस अभिवंदन करतो. )

पद. ( रागधनाश्री. )

माझिये क्षमा करीं अपराधा ॥ धृ० ॥

बाटविला मायावश होउन शांति-सुखाचा रांधों ॥ १ ॥
झालों कामादिकअरि-आधिन करुन घेतली बाधों ॥ २ ॥
इच्छा ऽहंकारा आलिंगुनि दूर दवडिली मेधों ॥ ३ ॥
भागविलें यावया तुझाला रविदास-प्रभू शोधोंॱ॥ ४ ॥ १०० ॥

शिवा०— (शांतीचे चुंबन करतो) मुली, सुखी झालीसना ? भेटला तुझा प्रियपति ? आतां यथेच्छ समागमसुख चिरकाळ भोग बरें ना. ( जीवाजीस ) या शांतीसह- वर्तमान चिरकाल सुखी नांदा बरें. ( निवृत्तीस ) प्रिये, आतां झालीस तूं सुखी !

शांति०— ( आनंदाश्रु ढाळते ) मला अनाथेला आज सनाथ केलें,

निवृ०— ( शिवाजीच्या पायांस हात लावते ) हे पाय आज या महाविपदार्णवांस नौका झाले.

जीवा०— ( पायांस मिठी मारतो ) हा दासानुदास स- र्वापराधी आहे, यास क्षमा असावी.

श्लोक.) उपजाति.)

दयानिधे या शरणागतासी ॥
करू कृपा तूंझि पुनीत कासी ॥
केले प्रमादें अपराध भारी ॥
करीं क्षमा स्वीय ध्वजा उभारीं ॥ १०१ ॥

शिवा०— ( जीवाजीस प्रेमानें आलिंगितो ) तुह्मास आणि शांतीस त्या दुष्टांनीं फार त्रासविलें ह्मणून त्यांला या माझ्या बोधादि मंत्री जनांनीं दिगंतास हांकून

---

१ स्वयंपाक. २ पीडा. ३ आस्तिक्य बुद्धि. ४ पावन.
५ आत्मतत्वाची.

दिल्हें; ज्या मायेनें तुझांस इतकें अमान घातलें तिला ही दिगंतास लावला. आतां आणखी ही जी तुमची इच्छा असेल ती पुरविण्यास मी सिद्ध आहें.

जीवा०— ( सद्गद होतो ) हे करुणार्णवा, तूं अनंत शक्तिमान् प्रभु, तुझ्या इच्छामात्रें करून संपूर्ण स्थावर जंगमसृष्टिक्रम चालत आहे त्या तुजपाशीं मी दुबळ्यानें मागावें तें काय ?

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

केलें दुर्धर अति-मुक्त विशदा शांती सुखाला दिलें ॥
मातें स्वीय सुखासनीं बसविलें सत्कार्य संपादिलें ॥
जें दुःसाध्य घडावया युगशतें तापोनियां काननीं ॥
मागूं काय अधीक याहुन अतां मी दीन या आननीं॥१०२॥

श्लोक. [ शिखरिणी. ]

प्रसन्ना विश्वेशा अपरिहर शत्रु-प्रशमना ॥
न माझे अन्याया गणुन मज सायुज्यसदना ॥
सुखी केलें शांती सहित निज सौख्यास दिधलें ॥
न मागाया कांहीं अधिकतर याहून उरलें ॥ १०३ ॥

( तथापी भगवान् प्रसन्न होऊन देतात तर हें द्यावें. )

श्लोक. ( मदिरा. )

हा दम हा शम बोध विचार विवेक सहीत इथे वसिजे ॥
ही तुमचीं अति मोदकरें पदकंजफुलें कधिं नाकसिजे ॥
फीरुन षड्रिपु या वपु-दुर्गिं न संचरती भल पाडिजती ॥
रूप तुझें अनुलक्षुन हें मन दृष्टि न तेथुन काढिजती॥ १०४॥
या निरुपाधि निरंतर शाश्वत रूपिं विराजविं जीवगडी ॥
सैंधव सिंधुजळीं मिळतें तसि शांतिसुखासह मारु बुडी ॥
मीळणि ऐक्यरसीं नग कांचनिं होउ.तयापरि आत्मपदीं ॥

तूट पडो न अवीटपणें घट मातिच हो अनुपाधि कधीं॥१०५॥

भरताचें वाक्य.

पद.

जगदीशा यादीनातें ॥
देतां तरि हें द्या मातें ॥ धृ ॥
व्हावा विद्वत्प्रिय भूपाल ॥
न्यायी दीनालागिं दयाल ॥
करी विद्या शस्यसुकाल ॥
जो चिरकाल आह्लाला ॥ १ ॥
वाहो सत्कर्माची चाड ॥
होवो मति दुष्कर्मीं भ्याड ॥
निंदाद्वेषाचें कवाड ॥
कधीं ह्वाड नच पाहो ॥ २ ॥
संतत साधूंचा सहवास ॥
घडो शांतीसौख्य जिवास ॥
लोकीं संपादुत विभवास ॥
या कविरवास गाउनियां ॥ ३ ॥
धरून प्रभु भक्तीची कास ॥
स्मरून सद्गुरुच्या वाक्यास ॥
मिळणी होवो चिदैक्यास ॥
मी परक्यास विसरुनियां॥ ४ ॥
सदैवशुचिरंतर निःसंग ॥
होवो भवभयाचा भंग ॥
रविदास प्रभूनामीं दंग ॥
हो हा अभंग आनंदी ॥ ५ ॥ १०६ ॥

शिवा०— तथास्तु ( तसेंच असो. )

( असें बोलून सर्व निघून जातात. )

**श्लोक. ( वसंततिलका. )**

श्रीराम*-कृष्ण-शुभजन्म-दिनिं प्रभावें ॥
जो पीयुषोद्गम शुचिर्हरि-पायिं भावें॥
आरंभुनी गुरुकृपे परिपूर्ण झाला ॥
ग्रंथाब्धि[1] हा ग्रेह[2] वसू[3] मुनि[4] भू शकाला ॥ १ ॥

---

१ नऊ. २ आठ. ३ सात. ४ एक. *राम नवमीस आरंभ आणी जन्माष्टमीस संपूर्ण.

## अंक सातवा समाप्त.

सातव्या अंकांतील पद्यें.

| श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पदें. | एकुणपद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ६१ | ७ | २६ | ४ | २ | ० | ६ | १०६ |

## एकंदर ग्रंथांतील पद्यें.

| अंक. | श्लोक. | आर्या. | साक्या. | दिंड्या. | ओंव्या. | अभंग. | पदें. | एकुण पद्यें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २४ | ३ | ९ | २ | १० | १ | १ | ५० |
| २ | ३४ | १ | १३ | १ | १३ | ३ | २ | ६७ |
| ३ | ३१ | ३ | ४ | ४ | ६ | २ | १ | ५१ |
| ४ | ३२ | १ | ८ | ३ | ४ | १ | १ | ५० |
| ५ | ४४ | १ | ५ | २ | ५ | ० | १ | ५८ |
| ६ | ५० | १ | १९ | १ | १२ | १ | १ | ८५ |
| ७ | ६१ | ७ | २६ | ४ | २ | ० | ६ | १०६ |
| | २७६. | १७. | ८४. | १७. | ५२. | ८. | १३ | ४६७. |

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६ | २४ | मथन | मंथन |
| १० | २ | राहण | राहणें |
| १६ | १० | तटांटां | तटाटीं |
| २१ | ११ | फरच | फारच |
| २२ | ९ | त्याचा | त्यांचा |
| २३ | २ | वेधकमानस | मानसवेधक |
| २८ | ११ | होऊन | होउन |
| ३२ | १० | मायाउ | मायाऊ |
| ,, | १३ | मायाउ | मायाऊ |
| ३६ | ११ | आला | आलों |
| ,, | २३ | वेगी | वेगीं |
| ३७ | ४ | संचरे | संचरें |
| ,, | ७ | बसाव | बसावें |
| ३८ | ४ | रारव | रौरव |
| ४० | ९ | छपाटा | झपाटा |
| ,, | १९ | हाय | होय |
| ४१ | २ | मर्दनां | मर्दनीं |
| ४४ | ११ | लाकाचा | लोकांचीं |
| ,, | २१ | मूखा | मूर्खां |
| ,, | ,, | अन्यायाच्छर्दी | अन्यायाच्छादीं |
| ४५ | १७ | विज्ञापनाकडे | विज्ञापनेकडे |
| ,, | २१ | ही | हीं |
| ८० | ८ | सुआपगा | सुरापगा |
| ८४ | २३ | लाकर | लौकर |
| ८७ | ९ | त्यास | त्यांस |
| ९१ | ९ | ॐ | ॐः |
| ९२ | १ | कडा | करा |
| ९४ | ६ | पागावी | मागावी |
| ,, | ८ | आहा | आहों |
| ९९ | ९ | पद | पद ( धनाश्री ) |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १०० | ७ | लाभाजी | लुभाजी |
| १०६ | १२ | गुंफुनीया | गुंफुनीयां |
| १०६ | १८ | येईल | येइल |
| ११२ | १ | हा | ही |
| ,, | १० | जाली | जाळी |
| ११७ | १६ | त्यांची | त्याची |
| ११८ | १० | स्तिथ | स्थित |
| ,, | २० | तइ | तईं |
| १२१ | १८ | बाहु | बाहु |
| १२५ | २३ | पूर्वोक्त श्लोक ह्मणतो | ( पूर्वोक्त श्लोक ह्मणतो ) |
| १२७ | ४ | मांगास | मांगांस |
| ,, | ९ | पूर्वोक्त साकी ह्मणतो | ( पूर्वोक्त साकी ह्मणतो ) |
| ,, | ११ | निचभगिनी | निजभगिनी |
| १३१ | १५ | तों | तो |
| १३२ | ७ | कदाचित् | कदाचित |
| १४३ | ४ | येऊन | येउन |
| १६१ | ६ | हटियांला | हटियाला |
| १६६ | ८ | नासी | नासाडी |
| १६८ | १४ | शत्र | शत्रू |
| १७५ | २ | वातें | वाटतें |
| १७६ | ६ | कहुकहु | कुहुकुहु |
| १७८ | २१ | लाकीं | लोकीं |
| १७९ | ४ | पाहुनियां | पाहूनियां |
| १८४ | २२ | भुंभुंरवें | भूंभूंरवें |
| १८८ | १४ | सांगतल्या | सांगीतल्या |
| १९० | ३ | वसाहात | वसाइत |
| १९२ | १९ | वालागड | वालेगड |
| १९३ | ७ | दारववली | दारवली |
| १९६ | ६ | आह्नि | अह्नि |
| २०१ | १६ | दासो | दासि |
| ,, | १९ | तुह्मी | तुह्मि |
| ,, | २४ | तुह्मी | तुह्मा |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २०५ | १६ | सुदीन | सुदिन |
| २०९ | ७ | तुह्मी | तुह्मि |
| २०९ | ८ | आणि | अणि |
| ,, | १० | आणि | आणि |
| २१० | २२ | जाणें | जाणे |
| २११ | २३ | काही | कांहीं |
| २१२ | ११ | पद | पद ( धनाश्री ) |
| २१३ | २४ | वातें | वाठतें |
| २१८ | १५ | सुधो | सुधो |
| २२३ | १ | बाल्या | बाळे |
| ,, | १७ | इतेके | इतकें |
| २२६ | २२ | बाल्या | बाळे |
| २२८ | २० | बाळा | बाळे |
| २३३ | ९ | आह्मी | आह्मि |
| २३४ | ७ | दत्त | देत्त |
| २३५ | ९ | बालागड | बाळेगड |
| २३६ | १७ | नर्तर | नंतर |
| २३९ | ५ | गहिंवर | गहिंवर |
| ,, | १५ | गहिंवरून | गहिंवरून |
| २४१ | १६ | आहें | आजि |
| २४६ | १४ | कारजांतुन | कारंजातून |
| २५१ | ७ | बाईच्या | बाईचा |
| २५५ | ५ | विलासिनी | विलासिनि |
| २५९ | ५ | सध्विव | सचीव |
| २६६ | ११ | अघ्राण | अवघ्राण |
| २६८ | ११ | विपर्यी | विपर्यिं |
| २७० | ,, | रहतात | राहतात |
| २७१ | ६ | यांच | याच |
| ,, | ७ | अैसे | ऐसें |
| २७२ | १८ | गेला | गेलां |
| ,, | २३ | तह्मा | तुह्मा |
| ,, | २१ | नाहीं | नाहिं |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| २७५ | ४ | भोगुं | भोगूं |
| २७६ | ६ | येईल | येइल |
| २८३ | ७ | बर | बरें |
| २८४ | १७ | झालें | झाले |
| २९० | २३ | अनुसंगानें | अनुषंगानें |
| ३०४ | २३ | सदिग्ध | संदिग्ध |
| ३१३ | १८ | वाटते | वाटतें |
| ३१४ | ३ | ध्वनी | ध्वनि |
| ३१६ | ११ | जननीशी | जननीशि |
| ३१८ | १४ | केलीं | केलिं |
| ३२४ | २१ | गेह्रीं | गेह्रीं |
| ३२५ | २२ | आश | अशि |
| ३३१ | २१ | मीझें | माझे |
| ३३२ | ११ | सित्धता | सिद्धता |
| ३३७ | ४ | ।वचारादि | विचारादि |
| ३३८ | १३ | असे | असें |
| ३४७ | १४ | हे | हें |
| ,, | १६ | हाक | हांक |
| ३५० | ३ | तरून | तरुन |
| ,, | ४ | करून | करुन |

# या ग्रंथास ज्या उदार गृहस्थांनी आश्रय दिला त्यांचीं नावें.

| | |
|---|---|
| रा० रा० विनायकराव जगन्नाथजी शकरशेठ .. .. .. | ५० |
| मेहेरबान आ क्राफर्ड साहेब . .. .. .. .. .. | २० |
| रा० रा० वासुदेव बाबाजीनवरंगे बुकसेलर .. .. .. | १० |
| ,, ,, बाळ मंगेश वागळे एम. ए. एल्. एल्. बी... .. | ७ |
| मेहेरबान ज. फ्लीन साहेब .. .. .. .. .. .. | ५ |
| रा० रा० नारायण दिनानाथ .. .. .. .. .. | ५ |
| ,, ,, विनायक वासुदेव .. .. .. .. .. | ५ |
| डाक्तर भाऊ दाजी .. .. .. .. .. .. | ५ |
| रा० रा० येशवंतराव बळवंत .. .. .. .. .. | ५ |
| ,, ,, नारायण महादेव परमानंद .. .. .. .. | ५ |
| ,, ,, सखाराम नारायण व शांताराम नारायण .. .. | ५ |
| ,, ,, नारायण वासुदेवजी .. .. .. .. .. | ४ |
| ,, ,, हरिचंद्र सदाशिवजी .. .. .. .. .. | ३ |
| ,, ,, माधवराव नारायण शिरगांवकर .. .. .. | २ |
| ,, ,, रामचंद्र विष्णु मांडगांवकर. .. .. .. .. | २ |
| डाकतर आत्माराम पांडुरंग . .. .. .. .. | २ |
| रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक . .. .. .. | २ |
| रा० रा० जनार्दन गोपाळ .. .. .. .. .. | २ |
| शेट वरजीवनदास माधवदास .. .. .. .. .. | २ |
| डाक्तर मोरेश्वर जनार्दन जोशी .. .. .. .. | २ |
| रा० रा० जगन्नाथ सदाशिवजी .. .. .. .. .. | २ |
| ,, ,, भगवंतराव रामचंद्रजी .. .. .. .. .. | २ |
| ,, ,, चिंतामण गंगाधर जोशी .. .. .. .. | २ |

| | |
|---|---|
| रावबहादुर मोरोबा कानोबा .. .. .. .. .. | २ |
| शेठ गंगादास तुळसीदास .. .. .. .. .. .. | १ |
| शेठ लीलाधर उत्धवजी .. .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० विश्वनाथ गोविंद चोळकर .. .. .. .. | १ |
| ,, ,, गणपतराव भास्कर .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळकृष्ण त्रिंबक .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, मोठाभाई रघुनाथजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, विठ्ठल नारायण शहाणे .. .. .. .. | १ |
| ,, ,, भाई वामनजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, सखाराम हरजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, ह० मुकुंदजी .. .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळकृष्ण नारायण .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण बाळाजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, काशिनाथ मुकुंदजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, मोरोबा दामोदरजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, त्रिंबक बापुजी मायदेव .. .. .. .. | १ |
| ,, ,, सर्वोत्तम सखाराम .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, अनंदराव गणपत .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, सदाशिव बाळकृष्णजी .. .. .. .. | १ |
| ,, ,, शिवराम भास्कर .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, कृष्णाजी विनायक .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, विनायक सखाराम पराडकर .. .. .. | १ |
| शेठ गोवर्धनदास लखमीदास .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० रामचंद्र विश्वनाथ लिमये .. .. .. | १ |
| मेहेरबान. वि. मेडमेंड साहेब .. .. .. .. | १ |
| ,, च. डरहाम साहेब .. .. .. .. .. | १ |

| | |
|---|---|
| मेहेरबान अ. मिनेस साहेब .. .. .. .. .. .. | १ |
| शेट नसरवानजी कोयाजी .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० कृष्णराव रामचंद्र .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, गोविंदराव रामशंकरजी .. .. .. .. | १ |
| ,, ,, दादाजी भानजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, पुतोबा श्रीकृष्णाजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, विठोबा झावरोजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, दौलतराव नानाभाई .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळकृष्ण मोरोबा .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, भास्कर विष्णु फडके .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, वासुदेव लक्ष्मणजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळकृष्ण सदाशिव भिडे .. .. .. .. | १ |
| ,, ,, पुरुषोत्तम जनार्दनजी .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण बल्लाळ .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, रामचंद्र हरजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, शामराव बास्कर .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण पांडुरंगजी .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, जनार्दन पांडुरंग जोशी .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० खंडेराव चिमणराव एम. ए एल्. एल्. बी. .. .. | १ |
| रा० रा० हरिश्चंद्र शामराव .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० बाळ भास्कर सित्रे .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० श्रीधर नारायण आठवले .. .. .. .. | १ |
| रा० रा० आबाजी बळवंतराव .. .. .. .. .. | १ |
| रा० रा० बाळकृष्ण अमृतराव .. .. .. .. | १ |
| रा० रा० रामचंद्र दि- वेलणकर .. .. .. .. | १ |
| ,, ,, भगवतराव आत्माराम कर्णिक .. .. .. | १ |

| | | |
|---|---|---|
| रा० रा० बंधुजी बाळकृष्ण | .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण बाळाजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, शंकर बाळाजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, निळोबा गणपतजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, अंताजी शिवजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, रावजी नारायण | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, दिनकर बल्लाळ | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, कृष्णाजी विठ्ठल | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळाजी दि. .. | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, रावजी गणेश .. | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण रंगोबा . | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, महादेव जनार्दन | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, बाळकृष्ण मोरोजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, आनंदराव साबाजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, गजानन आबाजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, काशिनाथ भाऊ | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, गोविंद पांडुरंगजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, सदाशिव शामराव पि. | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, शिवराम रामचंद्र | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, जगन्नाथ विसाजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, नारायण रघुनाथ | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, काशिनाथ केशवजी . | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, पांडुरंग बाबुजी | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, गणपतराव पांडुरंग | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, गोपिनाथ दामोदर | .. .. .. .. .. | १ |
| ,, ,, महादेव गोपाळ | .. .. .. .. .. | १ |

रा० रा० वासुदेव पांडुरंगजी .. १

" " हरिश्चंद्र मोरोजी .. १

" " द्वारकानाथ विश्वनाथ .. १

" " माधवराव गणोबा .. १

" " बापुजी दिनानाथ .. १

" " सदानंद रामचंद्रजी .. १

" " गोपीनाथ रंगोबा .. १

आजम डानियल सालेमन .. १

डाक्तर अनंता चंद्रोबा .. १

रा० रा० बाबा रामचंद्र .. १

" " आत्माराम जगन्नाथ .. १

" " वासुदेव जगन्नाथ .. १

" " वसंतराव बाळमुकुंद .. १

" " गणपतराव श्रीकृष्णजी .. १

" " परशराम कुशाबा .. १

" " वसंतराव आत्मारामजी .. १

" " हरिशंकर बाळकृष्णजी .. १

" " मोरोजी काशिनाथ .. १

डाकटर भिकाजी अमृत .. १

रा० रा० मुक्ताजी आपाजी .. १

" " हरिबाळकृष्ण लिमये .. १

" " काशिनाथ विठोबा .. १

" " बालकृष्ण आनंदराव .. १

" " श्रीधर बापु .. १

" " वजाबा आनंदराव .. १

" " महादेव मोरोबा .. १

रा० रा० हरिश्चंद्र मुकुंदजी .... .... .... .... ... १

,, ,, शामराव पांडुरंग . .. .. .. .. .. १

,, ,, पांडुरंग दिनानाथजी .. .. .. .. .. १

अजम ब. र. कोतवाल.. .. .. .. .. .. १

रा० रा० मोरोबा विनोबा .. .. .. .. .. १

,, ,, हरिश्चंद्र कृष्ण .. .. .. .. .. .. १

,, ,, कृष्णराव गणेश.. .. .. .. .. .. १

,, ,, रावजी पांडुरंग.. .. .. .. .. .. १

,, ,, शिवशंकर आनंदराव .. .. ... .. .. १

,, ,, गोविंद गंगाधर .. .. .. .. .. .. १

डाक्तर शांताराम विठ्ठल . .. .. .. .. .. १

रा० रा० सखाराम परशराम .. .. .. .. .. १

,, ,, सखाराम विठ्ठल.. .. .. .. .. .. १

,, ,, कृष्णराव भाऊ सकोजी. .. .. .. .. १

,, ,, रामकृष्णपंत .. .. .. .. .. .. १

,, ,, मुकुंद रामचंद्रजी .. .. .. .. .. १

,, ,, शिवशंकर मलोजी .. .. .. .. .. १

,, ,, गणेश सदाशिव सहस्रबुद्धे .. .. .. .. १

,, ,, हणमंत रंगो मुतालीक देसाई .. .. .. ... १

,, ,, जनार्दन रामचंद्र .. .. .. .. .. १

,, ,, शामराव मोरोजी .. .. .. .. .. १

,, ,, श्रीधर लाडको.. .. .. .. .. .. १